अविद्यादृष्टीनें जें जें कांहीं विविध भासतें तें तें सर्व विद्यादृष्टीनें अखंड ब्रह्मच आहे. त्यां-करितांच बृहदारण्यकांत 'जेव्हां द्वैताचा आभास होतो तेव्हां एक दुसऱ्या सर्वांना आप-णाहून भिन्न जाणतो; पण जेव्हां या अधिकारी जीवाला सर्व आत्माच आहे, असें क-ळतें तेव्हां तो विद्वान् कोणत्या साधनानें कोणाला पाहणार?' अशा क्रमानें अविद्या-दृष्टि व विद्यादृष्टि दाखविली आहे. )

'असो पण विष्णुपुराणांत 'प्रकृतिः पुरुषश्चैव नित्यौ कालश्च सत्तम' म्ह० हे श्रेष्ठा, प्रकृति, पुरुष व काल नित्य आहेत असें म्हटलें आहे,त्यामुळें द्वैताला विद्यादृष्ट्याही ब्रह्म-रूपत्व नाहीं, असें ठरतें' म्हणून कोणी म्हणेल, तर तें बरोबर नाहीं, असें या पुढील दोन ऋचांत दाखवितात—

> सर्वे निमेषा जज्ञिरे विद्युतः पुरुषादधि ।
> कला मुहूर्ताः काष्ठाश्चाहोरात्राश्च सर्वशः ॥ ८ ॥
> अर्धमासा मासा ऋतवः संवत्सरश्च कल्पताम् ।
> स आपः प्रदुघे उभे इमे अन्तरिक्षमथो सुवः ॥ ९ ॥

**अन्वयार्थ**—'सर्वे निमेषाः विद्युतः पुरुषात् अधि जज्ञिरे -' ( निमि या नांवाचा जनकाचा आद्य पूर्वज होता. त्याच्या नांवावरून निमेष हा शब्द रूढ झाला आहे. देवां-च्या वरामुळें तो डोळ्यांच्या उघड-झांपीचे ठिकाणीं राहतो. म्हणून त्यांना निमेष म्हण-तात. डोळ्यांचें पातें स्वभावतःच मिटून उघडण्यास जो काल लागतो त्या सूक्ष्म कालाला निमेष म्हणतात. ) सर्व निमेष स्वयंप्रकाश परिपूर्ण पुरुषापासून आधिक्यानें उत्पन्न झाले आहेत. 'काष्ठाः कलाः मुहूर्ताः सर्वशः अहोरात्राः, अर्धमासाः, मासाः, ऋतवः, संवत्सरः च कल्पताम्' निमेषाहूनही काष्ठा हें कालाचें अधिक परिमाण आहे. कारण अठरा निमेषांची एक **काष्ठा** होते. तीस काष्ठांची एक **कला**; तीस कलांचा एक क्षण; बारा क्षणांचा एक **मुहूर्त**;तीस मुहूर्तांचा एक **अहोरात्र**; पंधरा अहोरात्रांचा **अर्धमास**;दोन अर्धमासांचा एक **मास**, दोन मासांचा एक **ऋतु** हे सर्व त्या परमेश्वरापासून उत्पन्न झाले. सहा ऋतूंचा एक **संवत्सर**ही त्याच्यापासून झाला ( 'कल्पन्तां' असें बहुवचन कित्येक म्हणतात.वास्तव तसा पाठ घेतल्यास 'निमेषादि सर्व कालविशेष त्या स्वप्रकाश परमेश्वरामुळें आपापलें प्रयोजन सिद्ध करण्यास समर्थ होतात,' असा अर्थ समजावा 'सर्वशः' या पदानें लव, त्रुटि इत्यादि कालाचे सर्व भेद घ्यावे. ) 'सः आपः प्रदुघे' स्वतः निर्माण केलेल्या या कालभेदरूपी उपाधीनें युक्त असलेला **परमेश्वर** त्या त्या कालाला उचित *असलेलें आपाप्लें (म्हणजे जलोपलक्षित पृथ्वीचें) दोहन करता झाला. म्हणजे प्राण्यांना* ज्याची अपेक्षा आहे असें सर्व प्रकारचें भोग्य त्यानें पृथ्वीमध्यें संपादन केलें. 'अन्त-रिक्षं अथो सुवः इमे उभे प्रदुघे-' तसेंच, अन्तरिक्ष हें एक स्थान व स्वर्ग हें-दुसरें, अशा त्या दोन स्थानांचें दोहन केलें. ( म्हणजे त्या स्थानांमध्येंही भोग्य वस्तूंचें संपादन केलें. तात्पर्य, विष्णुपुराणांत कालाला जरी नित्य म्हटलेलें असलें, तरी पुराणेंही अविद्यादृष्टी जनांकरितांच असल्यामुळें तो परम सिद्धान्त होऊं शकत नाहीं, अशा अभिप्रायानें येथें विद्या-दृष्ट्या कालही ब्रह्मरूप आहे, असें सांगण्यासाठीं ब्रह्मापासून त्याची उत्पत्ति वर्णिली आहे.)

परमात्मा ऊर्ध्वत्वादि आकारांनीं रहित असल्यामुळें काल, लोक इत्यादि सर्वांचें कारण आहे; व त्यामुळेंच सर्वांमध्यें अनुगत असलेल्याही त्याचें प्राण्यांना साक्षात् ज्ञान होत नाहीं, असें पुढील दोन मंत्र सांगतात.—

नैनमूर्ध्वं न तिर्यञ्चं न मध्ये परिजग्रभत् ।
न तस्येशे कश्चन तस्य नाम महद्यशः ॥
न संदृशे तिष्ठति रूपमस्य न चक्षुषा पश्यति कश्चनैनम् ।
हृदा मनीषा मनसाभिक्लृप्तो य एनं विदुरमृतास्ते भवन्ति ॥

अन्वयार्थ—' ( कश्चित् ) एनं ऊर्ध्वं तिर्यञ्चं मध्ये वा अवस्थितं न परिजग्रभत्.' कोणीही पुरुष या परमात्म्याला स्तंभाप्रमाणें ऊर्ध्वाकारानें किंवा घरावरील वाशाप्रमाणें तिरकस आकारानें किंवा पांत असलेल्या घराच्या धन्याप्रमाणें ग्रहण करावयास समर्थ होत नाहीं. ( कारण त्याच्या ठिकाणीं ते ते आकार नसतात. ) ' तस्य कश्चन न ईशे.' कोणीही पुरुष त्याचें ग्रहण करतां यावें म्हणून तूं अमुक आकाराचा हो, असें त्याचें नियमन करूं शकत नाहीं. ' ( अत एव ) तस्य महद्यशः इति नाम (संपन्नं) ' म्हणूनच त्या परमात्म्याचें ' महत् यशः ' असें नांव पडलें आहे. ( कारण तो अत्यन्त स्वतन्त्र असल्यामुळें त्याचें यश सर्वांहून अधिक आहे. ) ' अस्य रूपं ( नीलपीतादिकं ) संदृशे न तिष्ठति.' शिवाय या परमात्म्याचें नील, पीत, शुक्ल इत्यादि प्रकारचें रूप प्राण्यांच्या दृष्टीचा विषय होत नाहीं ' अतः कश्चन चक्षुषा एनं न पश्यति. ' त्यामुळें एखादा अत्यन्त कुशल पुरुषही अति पटु चक्षुरिन्द्रियानें सुद्धां त्याला पहात नाहीं. ( परंतु गुरूपदेश व शास्त्र यांनीं युक्त असलेला पुरुष ) ' हृदा मनीषा मनसा अभिक्लृप्तः भवति.' हृदयकमलस्थ व लौकिक वस्तुविषयक मनोवृत्तींचें नियमन करणाऱ्या अन्तःकरणानें त्याचा सर्व प्रकारें निश्चय करतो. ( योगयुक्त मन लौकिक मनोवृत्तींचें नियमन करतें, हें प्रसिद्ध आहे. तसल्या अन्तर्मुख एकाग्र मनानें परमात्म्याचा अनुभव घेतां येतो ) ' ये एनं विदुः ते अमृताः भवन्ति.' जे या परमात्म्याला एकाग्र मनानें साक्षात् जाणतात ते मरणधर्मरहित होतात. ( प्राणांनीं देहाला सोडून जाणें, याला उत्क्रमण म्हणतात. मरणही तेंच आहे. तत्त्ववेत्त्यांना तसलें मरण नसतें. कारण त्यांचे प्राण शरीराला सोडून न जातां येथेंच लीन होतात. )

आतां हा वर सांगितलेला अर्थच दृढ करावयासाठीं दुसऱ्या प्रकरणांतील मंत्रांचें उदाहरण देतात—

अद्भ्यः संभूतो हिरण्यगर्भ इत्यष्टौ ॥

अन्वयार्थ—' अद्भ्यः संभूतः पृथिव्यै रसाच्च. ' इत्यादि सहा मंत्रांचा अनुवाक व ' हिरण्यगर्भः समवर्तताग्रे. ' इत्यादि आठ ऋचा वरील अर्थाच्या उपयोगी आहेत. ( वास्तव आतां अपोदर यापुढें त्यांचा मूळासह अर्थ देतों—)

अद्भ्यः संभूतः पृथिव्यै रसाच्च । विश्वकर्मणः समवर्ततादधि ।
तस्य त्वष्टा विदधद्रूपमेति । तत्पुरुषस्य विश्वमाजानमग्रे ॥ १ ॥

अन्वयार्थ—' विश्वकर्मणः अद्भ्यः पृथिव्यै रसात् च संभूतः ( आदित्यः चन्द्रनक्षत्रादिभ्यः ) अधि समवर्तत । ' विश्व म्ह० महाण्ड, तेंच ज्याचें कर्म आहे, अशा परमात्म्यापासून उदक, पृथिवी व तेज यांपासून ( आणि उपलक्षणेंनें वायु व आकाश यांपासून म्ह० यांच्या द्वारा अर्थात् पंच भूतांच्या द्वारा ) उत्पन्न झालेला आदित्य चंद्र, नक्षत्रें, तारका इत्यादि तेजस्वी देवतांहून व इंद्रादि इतर देवतांहून अधिक-तेजानें उत्कृष्ट झाला.. ' अपि च त्वष्टा तस्य रूपं विदधत् एति-' तसेंच, तेजानें देदीप्यमान झालेला आदित्य, त्या परमात्म्याचें रूप आपणामध्यें धारण करीत उदयाचलावर येतो. ( कारण सूर्यादिकांतील तेज परमात्मसंबंधीं आहे, असा सर्व वेदान्तांचा घोष चालला आहे. ) असो; ' तस्य पुरुषस्य अग्रे आजानं विश्वं वर्तते- ' अशा प्रकारचा जो सविता त्याच पुरुषाच्या अग्रभागीं–दृष्टिमार्गांत–हें प्रसिद्ध समस्त जगत् राहतें. १.

या दुसऱ्या मंत्रांत कोणी एक सूर्योपासक आपला अनुभव प्रकट करतो—

वेदाहमेतं पुरुषं महान्तं । आदित्यवर्णं तमसः परस्तात् ।
तमेवं विद्वानमृतमिह भवति । नान्यः पन्था विद्यतेऽयनाय ॥ २ ॥

अन्वयार्थ—' अहं एतं (आकाशमण्डले परिदृश्यमानं) महान्तं आदित्यवर्णं तमसः परस्तात् वर्तमानं पुरुषं वेद- ' मी या आकाशमंडलांत दिसणाऱ्या, आदित्याच्या कांतीप्रमाणें ज्याची कांति आहे अशा, अंधकाराहून दूर–विलक्षण–असलेल्या व पूर्ण पुरुषार्थरूप भगवान् सूर्याला जाणतों; ' तं एवं विद्वान् इह अमृतः भवति-' आणि त्या तसल्या विशेष गुणांनीं विशिष्ट असलेल्या पुरुषाला अशा प्रकारें जाणणारा विद्वान् अमृत होतो. ' अयनाय अन्यः पन्थाः न विद्यते- ' मोक्षमार्गाला या जाणण्याहून दुसरा मार्ग नाहीं. २

प्रजापतिश्चरति गर्भे अन्तः । अजायमानो बहुधा विजायते ॥
तस्य धीराः परिजानन्ति योनिं । मरीचीनां पदमिच्छन्ति वेधसः ॥३॥

अन्वयार्थ—' प्रजानां पतिः–पालकः गर्भे अन्तः ( रोदस्योर्मध्ये ) चरति- ' तो सर्व प्रजेचा पालक आकाश व पृथ्वी यांच्या मध्यभागीं संचार करतो. ' स्वयं अजायमानः बहुधा–चराचररूपेण–विजायते- ' तो स्वतः उत्पन्न न होणारा असूनही बहुत प्रकारें–चराचररूपानें उत्पन्न होतो. ( सूर्यच सर्वात्मक होतो, असा याचा अर्थ. ) ' ये मरीचीनां पदं इच्छन्ति ते धीराः वेधसः तस्य योनिं परिजानन्ति- ' जे पुण्यवान् पुरुष मरीचींचें स्थान इच्छितात त्या धीरांनीं त्या जगद्विधात्या सूर्याच्या कारणाला म्ह० परमात्म्याला सर्वत्र पूर्णरूपानें जाणावें. ३.

यो देवेभ्य आतपति । यो देवानां पुरोहितः ॥
पूर्वो यो देवेभ्यो जातः । नमो रुचाय ब्राह्मये ॥ ४ ॥

अन्वयार्थ—' यः देवेभ्यः आतपति-' जो कर्मानुष्ठानाच्या द्वारा देवांवर उपकार करण्यासाठीं सर्वतः तापतो, ' यः देवानां पुरोहितः ' जो देवांच्या अग्रभागीं हितकारी होऊन राहिलेला आहे, ' यः देवेभ्यः पूर्वः जातः-' जो सर्व देवांच्या आरंभीं

शाला-ब्र॰ जो सर्वांहून ज्येष्ठ आहे 'तस्मै रुचाय ब्राह्मये नमः-' त्या देदीप्यम ब्रह्मपुत्राला-सूर्यदेवाला-नमस्कार असो. ४.

रुचं ब्राह्मं जनयन्तः । देवा अग्रे तदब्रुवन् ॥

यस्त्वेवं ब्राह्मणो विद्यात् । तस्य देवा असन् वशे ॥५॥

**अन्वयार्थ**—'देवाः अग्रे रुचं ब्राह्मं जनयन्तः तत् अब्रुवन्-' परमात्मा महास त्या आरंभीं ऋग्वेदरूप व सर्व वेदान्तवेद्य सूर्याला उत्पन्न करीत असतांना हें पुढी वाक्य बोलला. ('देवाः' व 'जनयन्तः' असा मुळांत बहुवचनी प्रयोग जरी केलेला अ तरी इंद्रादि देव सूर्याचे जनक आहेत, असें समजण्यास कांहीं प्रमाण नाहीं म्हणून त्या 'परमात्मा' असा एकवचनी अर्थ केला आहे.) 'यः ब्राह्मणः एवं विद्यात् तस्य दे देवाः असन्-' जो ब्राह्मण अशा प्रकारें त्याला जाणतो त्याच्या अधीन इंद्रादि देव राहतात. ५

वरील मंत्रांत सूर्याची परोक्षतेनें स्तुति करून आतां या मंत्रांत अपरोक्षपणें स्तु करितात—

ह्रीश्च ते लक्ष्मीश्च पत्न्यौ । अहोरात्रे पार्श्वे । नक्षत्राणि रूपम् ।

अश्विनौ व्यात्तम् । इष्टं मनिषाण । अमुं मनिषाण । सर्वं मनिषाण ॥

**अन्वयार्थ**—'भो भगवन् आदित्य, ते ह्रीः च लक्ष्मीः पत्न्यौ-' हे भगवन्, आदि जगज्जीवना, आपल्या सौन्दर्यानें मन हरण करणारी ह्री व इंदिरा या तुझ्या भा आहेत; 'अहो रात्रे पार्श्वे-' दिवस व रात्र या कुशी-दोन बाजू आहेत. 'नक्षत्रा रूपम्-' नक्षत्रें हेंच तुझें रूप ह॰ आकार आहे. 'अश्विनौ व्यात्तम्-' अश्विनी मार हेंच तुझें उघडलेलें मुख आहे. (व सर्व ब्रह्माण्ड हे तुझे इतर अवयव आहेत. या मार्गे स्तुति केला गेलेला तो भगवान् श्रीसूर्य भक्तापुढें प्रत्यक्ष उभा राहून त्याला म्हणतं 'इष्टं मन् इषाण । अमुं मन् इषाण । सर्वं मन् इषाण-' हे भक्ता, तुला जें अभ असेल तें मजपासून मागून घे, या परलोकाची इच्छा कर; आणि तुला जें जें हवें अ तें तें मागून घे. ६.

हिरण्यगर्भः समवर्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत् ।

स दाधार पृथिवीं द्यामुतेमां कस्मै देवाय हविषा विधेम ॥ १ ॥

**अन्वयार्थ**—'यस्मात् परमात्मनः हिरण्यगर्भः अग्रे समवर्तत-' ज्या परमात पासून चतुर्मुख सृष्टीच्या आरंभीं उत्पन्न झाला व 'जातः स च परमप्रसादात् भूतस्य ए पतिः आसीत्-' उत्पन्न झालेला तो ज्याच्या प्रसादानें सर्व भुवनांचा एकच पति झाला 'परमात्मा पृथिवीं इमां द्यां उत दाधार-' तो परमात्मा या पृथिवीला व द्युलोकालाही धा

यज्ञाच्या योगानें आम्हीं अनुष्ठान करावें ! ( दुसऱ्या कोणाकरितांहि नाहीं, तर त्या परमात्म्याच्या प्रीत्यर्थच आम्हीं सर्व श्रौत-स्मार्त कर्म करावें ) १.

य: प्राणतो निमिषतो महित्वैक इद्राजा जगतो बभूव ।
य ईशे अस्य द्विपदश्चतुष्पदः कस्मै देवाय हविषा विधेम ॥२॥

**अन्वयार्थ**—' यः परमात्मा प्राणतः निमिषतः जगतः महित्वा एक इत् राजा बभूव-' जो परमात्मा प्राणयुक्त व निमिषयुक्त म्ह० जंगम व स्थावर यांचा एकच राजा झाला व 'यः परमात्मा अस्य ब्रह्माण्डस्य मध्ये विद्यमानान् द्विपदः चतुष्पदः ईशे-' जो परमात्मा या ब्रह्मांडांत असलेल्या मनुष्य-पक्ष्यादि द्विपद व गाय-घोडा इत्यादि चतुष्पद प्राण्यांचें नियमन करतो, सर्व प्राण्यांच्या हृदयकमलांत राहून अन्तर्यामिरूपानें सर्व जगाला पुण्य-पापांत नियुक्त करतो, ' तं विना कस्मै देवाय हविषा विधेम-' त्याला सोडून आम्हीं दुसऱ्या कोणाची परिचर्या करावी ! २.

य आत्मदा बलदा यस्य विश्व उपासते प्रशिषं यस्य देवाः ।
यस्य छायामृतं यस्य मृत्युः कस्मै देवाय हविषा विधेम ॥ ३ ॥

**अन्वयार्थ**—' यः आत्मदा बलदा यस्य प्रशिषं विश्वे देवाः उपासते-' जो जीवरूप आत्मा देतो, बल देतो ज्या परमात्म्याची आज्ञा सर्व मनुष्य व देवही शिरसा मान्य करितात, ' यस्य छाया अमृतं यस्य अशरणागतत्वं मृत्युः- ' ज्या परमात्म्याची छाया —शरणागतत्व मोक्षाचें कारण होतें व अशरणागतत्व नरकाचें निमित्त होतें ' तं विना कस्मै देवाय हविषा विधेम- ' त्याच्यावांचून दुसऱ्या कोणाची परिचर्या करावी ! ३.

यस्येमे हिमवन्तो महित्वा यस्य समुद्रं रसया सहाऽऽहुः ।
यस्येमाः प्रदिशो यस्य बाहू कस्मै देवाय हविषा विधेम ॥ ४ ॥

**अन्वयार्थ**—' इमे हिमवन्तो यस्य महित्वा-' हे भूलोकीं असलेले हिमालयप्रभृति पर्वत, ही ज्याची विभूति आहे; ' वेदाः रसया सह समुद्रं यस्य महित्वा आहुः ' त्याच्याप्रमाणें वेद नद्यांसह समुद्राला ज्याची विभूति म्हणतात, ' इमाः प्रदिशः यस्य अवयवाः च प्रदिशः यस्य बाहू-' या प्राच्यादि चार दिशा ज्याचे अवयव आहेत, व आग्नेय्यादि उपदिशा ज्याचे बाहू आहेत; सारांश पर्वत, नद्या, समुद्र, दिशा, विदिशा, वृक्ष, प्राणी इत्यादि ही सर्व ज्याची विभूति आहे, ' तं विना कस्मै देवाय हविषा विधेम- ' त्यावांचून दुसऱ्या कोणाची परिचर्या करावी ! ४.

यं क्रन्दसी अवसा तस्तभाने अभ्यैक्षेतां मनसा रेजमाने ।
यत्राधि सूर उदितो व्येति कस्मै देवाय हविषा विधेम ॥५॥

**अन्वयार्थ**—' यत्र अधि सूरः उदितः सन् व्येति (शिशुमारचक्रं परितः भ्राम्यति)-' ज्या द्यावा-पृथिवींच्या मध्यें सूर्य उदय पावून शिशुमार चक्राच्या सभोंवार भ्रमण करतो ' ते क्रन्दसी अवसा तस्तभाने-' त्या अनिवृष्टि, विद्युत्पात इत्यादिकांच्या योगानें पु

प्रलयाधार असल्यामुळें, प्राण्यांच्या रडूनाला कारण होणाऱ्या, रक्षक अन्नाच्या योगानें जीवांची स्थिति करणाऱ्या ( अर्थात् जगाच्या उत्पत्ति-स्थिति-लयांचें कारण होणाऱ्या ) आणि ' रेजमाने च मनसा अभ्यैक्षेताम्-' विराजमान होणाऱ्या द्यावा-पृथिवी ज्या परमात्म्याचें निर्मल मनोवृत्तीनें सर्व प्रकारें ध्यान करितात ' तं विना कस्मै देवाय हविषा विधेम-' त्यावांचून आम्ही दुसऱ्या कोणाची परिचर्या करावी ? ५.

येन द्यौरुग्रा पृथिवी च दृढे येन सुवस्तम्भितं येन नाकः ।
योऽन्तरिक्षे रजसो विमानः कस्मै देवाय हविषा विधेम ॥ ६ ॥

अन्वयार्थ—' उग्रा द्यौः पृथिवी च येन दृढे-' अशनिपातादिकांमुळें उग्र झालेली द्यौ ( स्वर्ग ) व पृथ्वी, यांना ज्या परमात्म्यानें दृढ म्ह० सर्व प्राण्यांचें धारण व पोषण करण्यास समर्थ केलें आहे, ' येन सुवः स्तम्भितं-' ज्यानें आदित्यमंडल अन्तरिक्षांत निराधार स्थापिलें आहे, (आणि त्यामुळेंच तें भूमीवर पडत नाहीं) 'येन नाकः निर्मित-' ज्या परमात्म्यानें स्वर्गलोक पुण्यवानांच्या उपभोगाकरितां निर्मिलेला आहे व ' यः अन्तरिक्षे रजसः विमानः-' जो अन्तरिक्षांत वृष्टिरूप जलाला निर्माण करणारा आहे ' तं विना०-' त्याला सोडून आम्ही आणखी दुसऱ्या कोणाची परिचर्या करावी ? ६.

आपो ह यन्महतीर्विश्वमायं दक्षं दधाना जनयन्तीरग्निम् ।
ततो देवानां निरवर्ततासुरेकः कस्मै देवाय हविषा विधेम ॥७॥

अन्वयार्थ—' यत्-यदा जगतीं निर्मातुं संकल्पितवान्-' जेव्हां त्या महादेवादि सर्व प्राण्यांच्या प्राणभूत परमात्म्यानें जगाला निर्माण करण्याचा संकल्प केला ' ततः एकः देवानां असुः परमात्मा आ अयं दक्षं दधानाः अग्निं जनयन्तीः महतीः आपः निरवर्तत-' तेव्हां अद्वितीय व ब्रह्मादि देवांचा प्राणभूत परमात्मा सर्व प्रकारें शुभावह आणि सर्व प्राण्यांच्या धारणास व पोषणास समर्थ अशा विश्वाला धारण करणाऱ्या आणि अग्नीला उत्पन्न करणाऱ्या पूज्य जलाला निर्माण करता झाला. त्याला सोडून आम्हीं आणखी दुसऱ्या कोणाची परिचर्या करावी ? ७.

यश्चिदापो महिना पर्यपश्यद्दक्षं दधाना जनयन्तीरग्निम् ।
यो देवेष्वधि देव एक आसीत् कस्मै देवाय हविषा विधेम ॥

अन्वयार्थ—' दक्षं दधानाः-' श्रौतस्मार्त कर्मांचें अनुष्ठान करण्यास समर्थ असलेल्या अग्नीला धारण करणाऱ्या व ' अग्निं जनयन्तीः आपः-' वडवाग्निरूपाने अग्नीला उत्पन्न करणाऱ्या आपाला 'चित् यः-' जो चिद्रूप परमात्मा ' महिना पर्यपश्यत्-' आपल्या महिम्यानें पाहता झाला, म्ह० तें आप सर्व जीवांचें साधन आहे, असें त्यानें पाहिलें आणि तसाच ' यः देवेषु अधि एकः देवः आसीत्-' जो सर्व देवांहून अधिक असल्यामुळें एक देव झाला ' तं विना कस्मै देवाय०-' त्या परमात्म्यावांचून आम्ही दुसऱ्या कोणाची परिचर्या करावी ? ८.

२

वरील पहिल्या मंत्रांत वर्णन केल्याप्रमाणें हिरण्यगर्भादिक जसे परमात्म्याचे उपलक्षक आहेत त्याप्रमाणें परमात्म्यानें उत्पन्न केलेल्या दिशा, विदिशा इत्यादि सर्व विराड्रूप जगत् त्याचें उपलक्षक आहे, असें दोन मंत्रांनीं सांगतात—

एष हि देवः प्रदिशोऽनु सर्वा पूर्वो हि जातः स उ गर्भे अन्तः ।
स विजायमानः स जनिष्यमाणः प्रत्यङ्मुखास्तिष्ठति विश्वतोमुखः ॥
विश्वतश्चक्षुरुत विश्वतोमुखो विश्वतोहस्त उत विश्वतस्पात् ।
सं बाहुभ्यां नमति सं पतत्रैर्द्यावापृथिवी जनयन् देव एकः ॥

अन्वयार्थ—' एषः देवः स्वप्रकाशः परमात्मा-' विद्वानांकडून अनुभविला जाणारा हा स्वप्रकाश परमात्मा ' सर्वाः प्रदिशः अनुप्रविश्य अवस्थितः- ' प्राच्यादि दिशा व आग्नेय्यादि विदिशा या सर्वांमध्यें प्रवेश करून राहिला आहे, हें दुसऱ्या श्रुतीतही सांगितलेलें आहे. ' तथा पूर्वः हि जातः ' ' हिरण्यगर्भः समवर्तता० ' या वरील मंत्रांत सांगितल्याप्रमाणें हिरण्यगर्भरूपानें हाच प्रथम उत्पन्न झाला. ' स उ गर्भे अन्तः-' तोच परमेश्वर ब्रह्माण्डरूप गर्भात राहतो. ' स एव विजायमानः-' तोच वर्तमानसमयीं देव तिर्यङ्-नरादिरूपानें उत्पन्न होतो. ' सः जनिष्यमाणः- ' यापुढें उत्पन्न होणाराही तोच. ' सः प्रत्यङ्मुखाः विश्वतोमुखः तिष्ठति-' तो अन्नमयादि पांच कोशांच्या आंत ( प्रत्यङ् ) आहे तो देह-इंद्रियें इत्यादिकांचा अध्यक्ष असल्यामुळें मुख्य आहे, तो विश्वतोमुख आहे; म्हणजे ज्याला चक्षुरादि, हीं उपलब्धिस्थानें सर्वतः आहेत; तशा प्रकारचा तो हा जगाचें अधिष्ठान होऊन राहतो. ' सः विश्वतश्चक्षुः-' तो ब्रह्माण्डरूप देहाला धारण करून सर्व प्राण्यांचे देह हेंच त्याचें स्वरूप असल्यामुळें त्यांच्याच चक्षुरादि इंद्रियांनीं युक्त म्हणजेच ' विश्वतश्चक्षुः ' आहे. ' उत विश्वतोमुखः विश्वतोहस्तः उत विश्वतस्पात्-' याच न्यायानें तो विश्वतोमुख, विश्वतोहस्त व विश्वतस्पाद आहे. ' बाहुभ्यां संनमति-' तो परमेश्वर बाहूसारख्या धर्माधर्मरूप निमित्त कारणांच्या योगानें सर्व जगाला अधीन करतो. ' पतत्रैः संनमति-' त्याचप्रमाणें पतनशील पंच महाभूतांच्या योगानें सर्व जगाला उत्पन्न करतो. ' एष अयं देवः द्यावापृथिवी जनयन् एकः एव अवतिष्ठते- ' अशा प्रकारें हा देव द्यावापृथिव्यादिक सर्व जगत् उत्पन्न करीत एकच राहतो.

आतां या उक्त अर्थाविषयीं अतिशय श्रद्धा उत्पन्न करावयासाठीं पुढील दोन मंत्रांनीं गंधर्वाचा वृत्तान्त दाखवितात—

वेनस्तत्पश्यन् विश्वा भुवनानि विद्वान् यत्र विश्वं भवत्येकनीळम् ।
यस्मिन्निदं सं च वि चैकं स ओतः प्रोतश्च विभु प्रजासु ॥
प्र तद्वोचे अमृतं नु विद्वान् गन्धर्वो नाम निहितं गुहासु ।
त्रीणि पदा निहिता गुहासु यस्तद्वेद सवितुः पिता सत् ॥

अन्वयार्थ—' यत्र विश्वं एकनीडं भवति-' ज्या परमात्म्यामध्यें जगत् एकरूप होतें, ' तत् पश्यन्-' त्याला गुरु-शास्त्रप्रसादानें साक्षात् जाणणारा ' विश्वा भुवनानि विद्वान्-'

सर्व लोकांस जाणणारा 'वेनः गन्धर्वः गुहासु निहितं अमृतं तत् वस्तु स्वानुभवेन विद्वान् प्रवोचेत् नु-' वेननांवाचा गंधर्व सर्व प्राण्यांच्या बुद्धीमध्यें असलेल्या विनाशरहित तत्त्वाला स्वानुभवानें जाणून आपल्या शिष्यांना सांगता झाला. (आत्मसाक्षात्कारानंतर सर्व जगत् आत्मरूपच आहे, असें ज्ञान होतें. ) तसेंच 'यस्मिन् परमात्मवस्तुनि इदं जगत् सं च वि च भवति-' ज्यानें पाहिलेल्या या परमात्म्यामध्यें हें जगत् उत्पन्न होतें व लीन होतें. 'एक सः विभुः सन् प्रजासु ओतः प्रोतः च अवतिष्ठते-' तो अद्वितीय तत्त्वरूप परमात्मा व्यापी होऊन सर्व प्रजांचे ठिकाणीं पटांतील दीर्घ-उभ्या तंतूप्रमाणें ओत व आडव्या तंतूप्रमाणें प्रोत होऊन राहतो. 'गुहासु त्रीणि पदा निहिता-' प्राण्यांच्या बुद्धीमध्यें जाग्रत् स्वप्न-सुषुप्तिरूप तीन स्थानें अवस्थित आहेत. 'यः तत् वेद सः सवितुः पिता सत्' जो हा गंधर्व त्या जागरितादि तीन स्थानांच्या अधिष्ठानाला जाणतो तो आपल्या उत्पादकाचाही पिता-जनक होतो. ( लौकिक पिता पुत्राच्या नुसत्या देहाला उत्पन्न करतो. पण ब्रह्मतत्त्वज्ञ परमात्मरूपानें सर्व जगदुत्पादक असल्यामुळें आपल्या जनकाचाही जनक होतो, असा भावार्थ. )

तो परमेश्वर व्यवहारकालीं सर्व प्राण्यांवर उपकार करणारा व परमार्थदर्शी पुरुषाला मोक्ष देणारा आहे, असें दोन मन्त्रांनीं दाखवितात—

स नो बन्धुर्जनिता स विधाता धामानि वेद भुवनानि विश्वा ।
यत्र देवा अमृतमानशानास्तृतीये धामान्यभ्यैरयन्त ॥
परि द्यावापृथिवी यन्ति सद्यः परि लोकान्परि दिशः परि सुवः ।
ऋतस्य तन्तुं विततं विचृत्य तदपश्यत् तदभवत्प्रजासु ॥

**अन्वयार्थ**—'स. नः बन्धुः' तो परमात्मा आम्हा सर्वांचा बंधु आहे. ( कारण तो आमच्या सुकृताच्या अनुरोधानें आमचा हितकर्ता होतो. ) 'जनिता, विधाता, विश्वा भुवनानि धामानि वेद-' तसाच जनिता म्ह० उत्पादक पिता आहे. ( कारण तो सर्वस्रष्टा आहे. ) तो जगाचा निर्माता होऊन सर्व उत्तमाधम लोक व त्यांत देवादिकांना योग्य असलेलीं स्थानें यांस जाणतो 'यत्र तृतीये लोके स्वर्गाख्ये अमृतं आनशाना. धामानि अभ्यैरयन्त' ज्या तिसऱ्या स्वर्गसंज्ञक लोकांत इन्द्रादि देव अमृत प्राशन करीत स्वकीय स्थानांस सर्वतः प्राप्त झालेले असतात ( तें सर्व जाणून त्यांनीं केलेल्या काम्य कर्मांच्या अनुसार फल देतो. ) 'ये मुमुक्षवः ते सर्वे विदिततत्त्वाः सन्तः द्यावापृथिवी सद्यः परियन्ति-' जे मुमुक्षु असतात ते तत्त्ववेत्ते होऊन तत्क्षणीं द्यावापृथिवीसंज्ञक दोन लोकांस तत्काल व्यापितात. 'तथा अवशिष्टान् लोकान् परियन्ति त्याचप्रमाणें ते बाकी राहिलेल्या अन्तरिक्षादि लोकांस व्यापितात. 'दिशः परियन्ति, सुव परियन्ति' प्राच्यादि दिशा व स्वर्ग यांनाही व्यापितात. ( सर्वात्मक झाल्यामुळें त्यांची सर्वव्याप्ति सांगितलेली आहे ) 'ऋतस्य तन्तुं विततं विचृत्य यः महत्तत्त्वं अपश्यत् स' एव प्रजासु तत् अभवत्-' परब्रह्माचें अविच्छिन्न अवस्थान आहे, असें जाणून, असा निश्चय करून जो त्या महात्म्याला साक्षात् जाणतो तोच प्रजेमध्यें तें ब्रह्मतत्त्व होतो.

'अम्भस्य पारे०' या पहिल्या ऋचेपासून वरील मन्त्रापर्यंत प्रतिपादिलेल्या महत्तत्त्वाचा उपसंहार करितात—

परीत्य लोकान् परीत्य भूतानि परीत्य सर्वाः प्रदिशो दिशश्च ।
प्रजापतिः प्रथमजा ऋतस्यात्मनात्मानमभिसंबभूव ॥

अन्वयार्थ—'ऋतस्य प्रथमजा प्रजापतिः' सत्य ब्रह्माचा प्रथमकार्यभूत प्रजापति (हिरण्यगर्भ) 'लोकान् भूतानि सर्वाः प्रदिशः दिशः परीत्य (सर्वत व्याप्य सृष्टिकाले सृष्ट्वा' भूः भुवः इत्यादि लोक, देव मनुष्यादि प्राणिदेह, आग्नेय्यादि सर्व प्रदिशा व प्राच्यादि दिशा या सर्वांना व्यापून, सृष्टिकाली उत्पन्न करून 'पुनरपि परीत्य स्थितिकाले रक्षित्वा' पुनरपि स्थितिकाली त्या सर्वांचे रक्षण करून 'आत्मना आत्मानं अभिसंबभूव' स्वरूपानें (स्वरूपविषयक तत्त्वज्ञानानें) सत्यज्ञानादिलक्षण स्वात्म्यास सर्वत प्राप्त झाला आहे.

येथवर ब्रह्मविद्येचें प्रतिपादन केलें पण तिच्या प्राप्तीचीं साधनें अर्शी जीं-सोपाधिक ब्रह्माचें ध्यान, जप, स्नान, इत्यादि-कर्में त्याच अंगभूत मन्त्र पूर्वी कर्मकाण्डांत सांगितलेले नाहींत ते आतां या खिलकाण्डांत सांगतात पण वेद आतां अगोदर एका मन्त्रानें महाप्राप्त्यर्थ अन्तर्यामीची प्रार्थना करतो—

सदसस्पतिमद्भुतम् प्रियमिन्द्रस्य काम्यम् । सनिं मेधामयासिषम् ॥

अन्वयार्थ—'अहं अद्भुतं इन्द्रस्य प्रियं काम्यं सनिं मेधां प्रयच्छन्तं सदसः पतिं अयासिषं अरिम' मी या अचिन्त्य जगाची रचना करणाऱ्या अद्भुत, इंद्राचाही अन्तर्यामी असल्यामुळें इंद्रालाही प्रिय असलेल्या, म्हणूनच दुसऱ्या सर्वांकडूनही अपेक्षा केल्या जाणाऱ्या, कर्मांचीं फळें देणाऱ्या आणि श्रुत व अधीत ग्रन्थाचे धारण करण्याची शक्ति देणाऱ्या त्या जगाच्या पालकाला-अन्तर्यामीला-प्राप्त झालों आहें

आतां कनिष्ठ अग्न्युपाधिक परमेश्वराची इष्टप्राप्तिविषयीं प्रार्थना करतो—

उद्दीप्यस्व जातवेदोऽपघ्नन्निर्ऋतिं मम । (४)
पशूंश्च मह्यमावह जीवनं च दिशो दिश ॥

अन्वयार्थ—'हे जातवेद, मदनुग्रहार्थं मम निर्ऋतिं अपघ्नन् उद्दीप्यस्व' (उत्पन्न झालेल्या प्राणिशरीरांत जाठराग्नीच्या रूपानें राहणाऱ्या किंवा उत्पन्न झालेल्या यजमानांना फल देण्यासाठीं आहवनीय, दक्षिणाग्नि, गार्हपत्य रूपानें राहणाऱ्या) हे अग्ने, तू माझ्यावर अनुग्रह करण्यासाठीं माझें अनिष्ट करणाऱ्या निर्ऋतीचा-पापदेवतेचा विनाश करीत उत्कर्षानें दीप्त हो 'मह्यं पशून् जीवनं च सर्वं भोग्यजातं आवह' त्यानंतर मजकरितां गायी, घोडे इत्यादि पशू व दीर्घ आयुष्य आणि त्याचप्रमाणें दुसरेंही सर्व भोग्यजात संपादन कर 'ततः दिशः दिशः' त्यानंतर मला प्राच्यादि दिशांमध्यें सुखानें निवास करण्यासाठीं त्या त्या दिशांतील निवासयोग्य स्थानें दे

आतां त्या संपादित पशूंच्या अविनाशाची प्रार्थना करितात—

मा नो हिंसीज्जातवेदो गामश्वं पुरुषं जगत् ।
अबिभ्रदग्न आगहि श्रिया मा परिपातय ॥

**अन्वयार्थ**—'हे जातवेदः, त्वत्प्रसादात् मदीयं गवादिकं निर्ऋतिः मा हिंसीत्-' हे अग्ने, तुझ्या प्रसादानें माझ्या गायींला, अश्वाला, पुरुषाला व इतर गृह-क्षेत्रादिकाला पापदेवता नष्ट न करो. 'हे अग्ने, त्वं अबिभ्रत् आगहि-' हे अग्ने, तूं आमच्या अपराधांना मनांत न धरतां आम्हांवर अनुग्रह करण्यासाठीं ये आणि 'ततः मा श्रिया परिपातय-' मला धन-धान्यादि संपत्ति सर्वतः प्राप्त करून दे.

आतां यापुढें निरनिराळ्या देशांत निरनिराळे श्रुतिपाठ आहेत. विज्ञानात्मप्रभृति प्राचीन निबन्धकारांनीं त्यांतील चवसष्ट अध्यायांच्या द्राविडपाठाचा आदर केला आहे. पण महाराष्ट्रांतील हिरण्यकेशी ऐशीं अनुवाकांचा पाठ करीत असतात. यास्तव आम्हीही त्यांच्या अनुरोधानेंच व्याख्यान करतों. येथें अगोदर बारा गायत्रीछंदांनीं आत्मप्राप्तीच्या द्वारभूत देवतांची प्रार्थना केली आहे.

पुरुषस्य विद्म सहस्राक्षस्य महादेवस्य धीमहि । तन्नो रुद्रःप्रचोदयात् ॥
तत्पुरुषाय विद्महे महादेवाय धीमहि । तन्नो रुद्रः प्रचोदयात् ॥
तत्पुरुषाय विद्महे वक्रतुण्डाय धीमहि । तन्नो दन्तिः प्रचोदयात् ॥
तत्पुरुषाय विद्महे चक्रतुण्डाय धीमहि । (५) तन्नो नन्दिः प्रचोदयात् ॥
तत्पुरुषाय विद्महे महासेनाय धीमहि । तन्नः षण्मुखः प्रचोदयात् ॥
तत्पुरुषाय विद्महे सुवर्णपक्षाय धीमहि । तन्नो गरुडः प्रचोदयात् ॥
वेदात्मनाय विद्महे हिरण्यगर्भाय धीमहि । तन्नो ब्रह्म प्रचोदयात् ॥
नारायणाय विद्महे वासुदेवाय धीमहि । तन्नो विष्णुः प्रचोदयात् ॥
वज्रनखाय विद्महे तीक्ष्णदंष्ट्राय धीमहि । (६) तन्नो नारसिंहः प्रचोदयात् ॥
भास्कराय विद्महे महद्द्युतिकराय धीमहि । तन्नो आदित्यः प्रचोदयात् ॥
वैश्वानराय विद्महे लालीलाय धीमहि । तन्नो अग्निः प्रचोदयात् ॥
कात्यायनाय विद्महे कन्यकुमारि धीमहि । तन्नो दुर्गिः प्रचोदयात् ॥

**अन्वयार्थ**—'सहस्राक्षस्य पुरुषस्य स्वरूपं विद्म-' 'विश्वतश्चक्षुः॰' इत्यादि मंत्रांत सांगितलेला विराट् पुरुष सहस्राक्ष आहे. त्या सहस्राक्ष पुरुषाचें स्वरूप आम्ही जाणावें, 'तद्रूपं तस्य विराड्रूपस्य महादेवस्य स्वरूपं धीमहि-' त्यासाठीं आम्ही त्या महादेवाच्या स्वरूपाचें ध्यान करतों. 'तत् नः रुद्रः प्रचोदयात्-' त्या ध्यानांत आम्हांला रुद्र प्रेरणा करो. 'तत्पुरुषाय महादेवाय विद्महे धीमहि च । तत् नः रुद्रः प्रचोदयात्-' त्या आगमप्रसिद्ध पुरुषाकार महादेवाला आम्हीं जाणावें म्हणून त्याचें ध्यान करतों. त्या ध्यानांत

रुद्र आम्हांला प्रवृत्त करो. 'तत्पुरुषाय वक्रतुण्डाय विद्महे धीमहि च। तत्र नः दन्तिः प्रचोदयात्.' हत्तीच्या सोंडेप्रमाणें ज्याचें तोंड लांब आहे व रत्नकलशाचें धारण करण्यासाठीं जें वक्र झालें आहे अशा त्या वक्रतुंडाला जाणण्यासाठीं आम्ही त्याचें ध्यान करतों. त्या ध्यानांत मोठ्या दातानें एक असलेला देव आम्हांला प्रवृत्त करो. 'तत्पुरुषाय चक्रतुण्डाय विद्महे धीमहि च तत् नन्दिः नः प्रचोदयात्.' त्या स्वेच्छेनें पुरुषरूप धारण करणाऱ्या परम शिवाच्या वाहनरूप नन्दिकेश्वराला आम्ही जाणतों; आणि चक्राप्रमाणें ज्याचें तोंड आहे (भगवान् विष्णूनें सोडलेलें चक्र जसें राक्षसांना मारतें त्याचप्रमाणें शंकराचा राक्षसांशीं संग्राम चालला असतां नंदि त्यांना ताडानें मारतो, हें प्रसिद्ध आहे. यास्तव) त्या चक्रतुंडाचें आम्ही ध्यान करतों. तो आम्हांस प्रेरणा करो. 'तत्पुरुषाय महासेनाय विद्महे धीमहि च तन्नः षण्मुखः प्रचोदयात्.' त्या पूर्णरूप देवसेनानीला आम्ही जाणतों व त्याचें ध्यान करतों. तो षडानन आम्हांला प्रेरणा करो. 'तत्पुरुषाय सुवर्णपक्षाय विद्महे धीमहि च तत् नः गरुडः प्रचोदयात्.' त्या प्रसिद्ध पक्षिराजाचें रूप धारण करणाऱ्या सुवर्णपक्षयुक्त पुरुषाला जाणण्यासाठीं आम्ही त्याचें ध्यान करतों. तरी त्यामध्यें तो गरुड आम्हांला प्रवृत्त करो. 'वेदात्मनाय हिरण्यगर्भाय विद्महे धीमहि च तन्नो ब्रह्म प्रचोदयात्.' वेदरूप हिरण्यगर्भाला आम्ही जाणतों व त्याचें ध्यान करतों. तें ब्रह्म आम्हांला पुण्यामध्यें प्रवृत्त करो. 'नारायणाय वासुदेवाय विद्महे धीमहि च तत् नः विष्णुः प्रचोदयात्.' नरशरीराच्या उपादानरूप अन्नादि पंच भूतांना नार म्हणतात. त्यांत मुख्य असलेल्या ज्या आप् त्या ज्याचें अयन म्ह० आधार आहे तो नारायण म्हणजे समुद्रजलशायी. त्या नारायण वासुदेवाला (म्ह० कृष्णावतारांत वसुदेवपुत्र झालेल्या देवाला) प्राप्त व्हावें म्हणून आम्ही त्याचें ध्यान करितों. तरी आपल्या वास्तविक परब्रह्मरूपानें जगाला व्यापणारा विष्णु आम्हांला त्या ध्यानांत प्रेरणा करो. 'वज्रनखाय विद्महे तीक्ष्णदंष्ट्राय धीमहि तन्नः नारसिंहः प्रचोदयात्.' ज्याचीं नखें वज्रासारखीं आहेत व दाढा तीक्ष्ण आहेत त्याला आम्ही जाणतों व त्याचें ध्यान करतों तो नारसिंह आम्हांला प्रेरणा करो. 'भास्कराय विद्महे महद्द्युतिकराय धीमहि तन्नः आदित्यः प्रचोदयात्.' महद्द्युतीला म्ह० त्रैलोक्यांत पसरणाऱ्या कांतीला करणारा व भूलोकींच दीप्तीला करणारा जो आदित्य त्याला आम्ही जाणतों व त्याचें ध्यान करतों. तो आम्हांला शुभ कार्यांत प्रवृत्त करो. 'वैश्वानराय विद्महे लालीलाय धीमहि तत् नः अग्निः प्रचोदयात्.' जो आपल्यामध्यें अर्पण केलेलीं हव्यें स्वतः खावून दुसऱ्या देवतांना पोंचवितो तो अग्नि; सर्व नरांना जो हितकर असतो तो वैश्वानर; कुटुंबसमधो लीला हीच हेला व सर्व देवतांमध्यें अग्रगण्यस्वरूप लीला, यांनीं जो युक्त असतो तो हेलालील; त्याला आम्ही जाणतों व त्याचें ध्यान करतों तो आम्हांला प्रेरणा करो. ('हेलालील' या शब्दांतील 'हे' हें अक्षर जाऊन 'लालील' एवढेंच राहिलें व त्याची चतुर्थी 'लालीलाय' अशी झाली आहे.) 'कात्यायनाय विद्महे कन्यकुमारि धीमहि तत् नः दुर्गिः प्रचोदयात्' गजचर्म धारण करणारा रुद्र (कात्य) जिचें अयन–अधिष्ठान–उत्पादक आहे ती कात्यायनी, तीच कन्या व कुमारी (अनिष्टाचें निवारण करणारी); तिच्या आकारानें नटलेल्या परमेश्वराला जाणण्यासाठीं आम्ही ध्यान करतों. तरी त्यामध्यें ती दुर्गा आम्हांला प्रवृत्त करो. (या सर्व गायत्रींचा चित्तशुद्धीकरितां ध्यानपुरःसर जप करावा.)

आता यापुढें स्नानाङ्गभूत मंत्र सांगतात. पण आरंभीं मस्तकावर मृत्तिकेसह दूर्वा धारण करावयासाठीं दूर्वाभिमंत्रणमंत्र सांगतात—

सहस्रपरमा देवी शतमूला शताङ्कुरा ।
सर्वं हरतु मे पापं दूर्वा दुःस्वप्ननाशिनी ॥
काण्डात्काण्डात् प्ररोहन्ती परुषः परुषः परि । (७)
एवा नो दूर्वे प्रतनु सहस्रेण शतेन च ॥
या शतेन प्रतनोषि सहस्रेण विरोहसि ।
तयास्ते देवीष्टके विधेम हविषा वयम् ॥

**अन्वयार्थ**—' सहस्रपरमा देवी शतमूला शताङ्कुरा दुःस्वप्ननाशिनी दूर्वा मे पापं हरतु·' ही जी दूर्वाभिमानिनी देवता ती पवित्र करणाऱ्या दुसऱ्या सहस्रावधि द्रव्यांहून उत्कृष्ट आहे. ती प्रकाशमान आहे. तिला शेकडों मुळें आहेत. अनेक अंकुर आहेत. ती दुष्ट स्वप्नाचा नाश करणारी आहे. वास्तव ती दुर्गा देवी माझें सर्व पाप हरण करो. ' हे दूर्वे, काण्डात् काण्डात् परुषः परुषः परि प्ररोहन्ती एव नः शतेन सहस्रेण प्रतनु·' हे पापहिंसके दूर्वे, तू प्रत्येक पेरापासून आपला अंकुर उत्पन्न करतेस व प्रत्येक मुळापासून तुझा उद्भव होतो. अशा प्रकारची तू आमचा शेंकडों पुत्र व सहस्रावधि पौत्र यांच्या योगानें सर्वोत्कृष्ट विस्तार कर. ' हे देवि, इष्टके, या त्वं शतेन प्रतनोषि सहस्रेण विरोहसि तस्याः ते परिचर्यां वयं हविषा विधेम·' हे देवि, इष्ट मंत्र म भक्त यांच्याकडून स्तुति केली जाणारे, जी तूं शंभर द्वारांनी पसरतेस व सहस्र मार्गांनीं उगवतेस त्या तुझी परिचर्या आम्ही हवींच्या द्वारा करतों.

आता मृत्तिकेच्या अभिमंत्रणाचे चार मंत्र सांगितले आहेत.

अश्वक्रान्ते रथक्रान्ते विष्णुक्रान्ते वसुंधरा ।
शिरसा धारयिष्यामि रक्षस्व मां पदे पदे ॥
भूमिर्धेनुर्धरणी लोकधारिणी ।
उद्धृतासि वराहेण कृष्णेन शतबाहुना ॥
मृत्तिके हन मे पापं यन्मया दुष्कृतं कृतं ।
मृत्तिके ब्रह्मदत्तासि काश्यपेनाभिमन्त्रिता ।
मृत्तिके देहि मे पुष्टिं त्वयि सर्वं प्रतिष्ठितम् ॥ (८)
मृत्तिके प्रतिष्ठिते सर्वं तन्मे निर्णुद मृत्तिके ।
तया हतेन पापेन गच्छामि परमां गतिम् ॥

**अन्वयार्थ**—(अग्निचयनांत वस्त्रा निर्माण करण्यासाठीं जी भूमि नांगरावयाची असते तिच्यावरून घोड्याला चालवावें,असें विधान केलें आहे.त्यावरून घोड्याचे नाम कलिकेच्या

शुद्धीला कारण होतात, असें व्यक्त होतें. त्याचप्रमाणें त्याच्या संचारानेंही ती शुद्ध होते. वामनावतारांत विष्णु आपल्या पावलानें सर्व भूमीचें आक्रमण करतो. त्यामुळेंही ती शुद्ध आहे. तस्मात् ) ' हे अश्वक्रान्ते, हे रथक्रान्ते, हे विष्णुक्रान्ते वसुंधरा सती शिरसा धारयिष्यामि-'हे अश्वक्रान्ते,हे रथक्रान्ते,हे विष्णुक्रान्ते शुद्धे, वसुन्धरा ह्म० सर्व प्रकारच्या वसूला-धनाला धारण करणारी, अशा तुलें या स्नानकर्मांत माझ्या मस्तकानें मी धारण करीन.'त्वं मां स्नानार्थं जलमध्ये गच्छन्त पदे पदे रक्षस्व-'तू स्नानाकरितां जलांत जाणाऱ्या मासें पदोपदीं रक्षण कर. ' हे मृत्तिके, त्वं धेनुः, धर्णी, लोकधारिणी भूमिरूपा सती कृष्णेन शतबाहुना वराहेण उद्धृता असि-' हे मृत्तिके, तूं कामधेनूप्रमाणें सर्वांना संतुष्ट करणारी, नानाप्रकारच्या धान्यांना व तृणादिकांना धारण करणारी व प्राण्यांचेंही धारण करणारी भूमि होऊन कृष्णवर्ण ( काळ्या ) व शमरबाहुयुक्त वराहावताराकडून पूर्वी वर उठविली गेली आहेस. ' हे मृत्तिके, मया यत् दुष्कृतं कृतं तत् मे पापं हन-' हे मृत्तिके, मीं जें दुष्कर्मरूप पाप केलें असेल त्याचा तू नाश कर. ' मृत्तिके, ब्रह्मदत्ता असि-' तू परमात्म्या ब्रह्माकडून भूमिरूपानें स्थापिली गेली आहेस. ह्म० तूं ब्रह्मदत्ता आहेस. ' काश्यपेन अभिमन्त्रिता तदुष्कृत हतवती असि-' काश्यप व इतर ऋषी यांनीं स्नानाचे वेळीं तुझें अभिमंत्रण केलें आहे व त्यांचें पाप तू नाहींसें केलें आहेस. (यास्तव आह्मीहि तुझें अभिमंत्रण करतों. कारण तें शिष्टाचारानेंच प्राप्त आहे. ) 'मृत्तिके, त्वयि सर्वं प्रतिष्ठितं तस्मात् मे पुष्टिं देहि-' जव, गहूं इत्यादि जें जें ह्मणून पुष्टीचें साधन आहे तें तें सर्व हे मृत्तिके, तुझ्यामध्यें प्रतिष्ठित आहे. यास्तव तूं मला पुष्टि दे. ' हे प्रतिष्ठिते मृत्तिके मे तत्सर्वं पापं निर्णुद-' सर्व प्राणी जिच्यामध्यें प्रतिष्ठित होतात ती प्रतिष्ठिता. हे प्रतिष्ठिते, मृत्तिके, माझें तें सर्व पाप नष्ट कर. ' हे मृत्तिके, तया त्वया पापेन हतेन सता परमां गतिं गच्छामि ' हे मृत्तिके, त्या तू माझ्या पापाचा नाश केलास ह्मणजे त्यामुळेंच मी परम गतीस जाईन.

याप्रमाणें दूर्वा व मृत्तिका यांना उजव्या हातावर घेऊन व मन्त्रांनीं अभिमन्त्रवून कमठ दोन मन्त्रांनीं इंद्रापासूनही अभयाची प्रार्थना करतो–

यत इन्द्र भयामहे ततो नो अभयं कृधि ।
मगवञ्छग्धि तव तन्न ऊतये विद्विषो विमृधो जहि ॥
स्वस्तिदा विशस्पतिर्वृत्रहा विमृधो वशी ।
वृषेन्द्रः पुर एतु नः स्वस्तिदा अभयंकरः ॥

**अन्वयार्थ**—'हे इन्द्र,मघवन्,यत.भयामहे ततः न अभय कृधि-'हे इन्द्रा,हे मघवन्,आम्ही ज्या पापाला, शत्रूला किंवा नरकाला भितो त्या पापादिकांपासून आम्हांला निर्भय कर. ( ह्म० आम्ही तुझ्या प्रसादानें निष्पाप, नि शत्रु व निर्नरक होऊ, असा भाव. केवल त्यांची भीति वाटू नये, एवढेंच नव्हे तर ) ' तत् नः शग्धि-' त्याचा तू नाश कर. तसेंच ' तव न. ऊतये विमृधः विद्विष. जहि ' आम्ही तुझे भक्त व त्यामुळेंच तुझे संबंधी आहों. यास्तव आमच्या रक्षणाकरितां पीडा देणाऱ्या आमच्या अन्तर्बहि.शत्रुना मार. ' स्व.

स्तिदा, विशस्पतिः, वृत्रहा, विमृधः, वशी, वृषा, स्वस्तिदा, अभयंकरः इन्द्रः,नः पुरःएतु-' इहलोकसंबंधी सौख्य देणारा, मरु प्रजेचा पति, वृत्रासुराला मारणारा, शत्रूंना आपल्या स्वाधीन ठेवणारा, पुष्करावर्तादि मेघांना आज्ञा करून भूमीवर वृष्टि करणारा, व पर-लोकसंबंधी कल्याण व अभय करणारा इंद्र स्नान करावयास उद्युक्त झालेल्या आमच्या समक्ष आमचें रक्षण करण्यासाठीं येवो.

स्नान करीत असतांना सुसरी, मासे इत्यादिकांची पीडा होऊं नये म्हणून एका मं-त्रानें कर्मठ क्षेमाची याचना करतो.

स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः ।
स्वस्ति नस्ताक्ष्यों अरिष्टनेमिः स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु ॥

अन्वयार्थ—' वृद्धश्रवाः इन्द्रः नः स्वस्ति दधातु-' ज्याचें यश समृद्ध आहे, असा इन्द्र आम्हांला स्वस्ति देवो म्हणजे आमचें पोषण करो. ' विश्ववेदाः पूषा नः स्वस्ति दधातु-' बहुज्ञानवान् अथवा बहु धनवान् पूषा आम्हांला स्वस्ति करो. ' अरिष्टनेमिः तार्क्ष्यः नः स्वस्ति दधातु-' ज्याच्या रथाची चक्रनेमि फार दूर गमन केलें तरी राक्षसांकडून छिन्नभिन्न केली जात नाहीं असा गरुड आम्हांला स्वस्ति करो. तसाच ' बृहस्पतिः नः स्वस्ति दधातु-' बृहस्पति आम्हांला स्वस्ति करो.

आतां एका मंत्रानें सोम व इन्द्र यांची प्रार्थना करितात—

आपान्तमन्युस्तृपलप्रभर्माधुनिः शिमीवाञ्छरुमाँ ऋजीषी ।
सोमो विश्वान्यतसा वनानि नार्वागिन्द्रं प्रतिमानानि देभुः ॥

अन्वयार्थ—' आपान्तमन्युः-' उगीच वर वर रागावणारा, (उ० आईबाप मुलावर जसे कधीं मनापासून रागावत नाहींत तर उगीच वरवर रागावतात त्याप्रमाणें ) ' तृपल-प्रभः-' चंद्रकांत मण्याप्रमाणें ज्याची प्रभा आहे असा, 'माधुनिः-' मधमाशांना वगैरे प्रिय वाटणारा अथवा वासनासमयीं सर्वांना रम्य भासणारा,'शिमीवान्-' शमी ज्याला फार आवडतो असा, तसाच 'शरुमान् तथा ऋजीषी सोमः अतसा विश्वानि वनानि पुष्णाति-' अतिशय सौख्यसंपन्न, व अतिशय दीप्तिमान् चंद्रमा अंतरिक्षांतील सतत गमनानें सर्व वनांना पोसतो. तसेंच ' अर्वाक् प्रतिमानानि इन्द्र न देभुः-' इंद्राच्या अपेक्षेनें अर्वाक् असलेली उपमानें इन्द्राला पीडा देऊं शकत नाहींत. (व्यवहारांत प्राण्याला स्वतःसारख्या असलेल्या दुसऱ्या वस्तूचा हेवा वाटतो व त्यामुळें मानसिक पीडा होते. पण तसा कोणी स्वसदृश नसल्यास त्याला पीडा होत नाहीं. तस्मात् इन्द्र निरुपम आहे, असा भावार्थ. )

आतां एका मन्त्रानें परमात्म्याची प्रार्थना केली जाते—

ब्रह्म जज्ञानं प्रथमं पुरस्ताद्वि सीमतः सुरुचो वेन आवः ।
स बुध्निया उपमा अस्य विष्ठाः सतश्च योनिमसतश्च विवः ॥

अन्वयार्थ—' प्रथमं पुरस्तात् जज्ञानं वेनः ( वनं ) ब्रह्म सुरुचः लोकान् सीमतः व्यावः ( वि-आवः )-' सर्व देवांच्या पूर्वी असणारें, त्याचप्रमाणें पूर्व दिशेंत सूर्यरूपानें

उगवणारें व सर्वांना प्रिय असलेलें ब्रह्म अतिशय शोभणाऱ्या तीन लोकांस भूलोकच्य मध्यप्रदेशापासून स्वप्रकाशानें प्रकट करतें झालें. 'सः ( तद् ब्रह्म ) उपमा अस्य विष्ठा सुप्रियाः सतः योनिं असतः च योनिं विवः-' तें ब्रह्म अवकाशयुक्त व विविधस्थानभूत प्राच्यादि दिशा, घट-पटादि सत् वस्तूंचें स्थान व वाय्वादि असत् ह्म• अमूर्त वस्तूंचें स्थान यांस प्रकाशित करतें

आतां कर्मठ पुनरपि दोन मंत्रांनीं पुनः घेतलेल्या मृत्तिकेच्या 'शुद्धीकरितां पृथ्वीची प्रार्थना करतो--

स्योना पृथिवि भवा नृक्षरा निवेशनी । यच्छा नः शर्म सप्रथाः ॥
गन्धद्वारां दुराधर्षां नित्यपुष्टां करीषिणीम् ।
ईश्वरीं ५ सर्वभूतानां तामिहोपह्वये श्रियम् ॥

**अन्वयार्थ**—'हे पृथिवि, नृक्षरा निवेशनी सप्रथाः त्वं नः स्योना भवा शर्म यच्छा-' हे विशाले, मनुष्यादि चतुर्विध भुतांना उत्पन्न करणारी, उत्पन्न केलेल्या भुतांना ग्राम-अरण्यादि यथायोग्य स्थानीं स्थापणारी आणि अतिशय सहनशील या कीर्तीनें युक्त असलेली तूं आमच्या दुःखाचा नाश करणारी हो. ऐहिक व पारलौकिक सुख दे. 'गन्धद्वारां दुराधर्षां नित्यपुष्टां करीषिणीं सर्वभूतानां ईश्वरीं श्रियं तां इह उपह्वये'-घ्राणेंद्रियानें ग्रहण केला जाणारा गन्ध हेंच जिच्या उपलब्धीचें साधन आहे, असुरादि प्रतिकूल पुरुषांनाहि जिचा तिरस्कार करतां येत नाहीं, जी सर्वदा व्रीहि-यवादि धान्यांनीं परिपूर्ण आहे, जी पुष्कळ गोमयानें ह्म• गायी, म्हशी इत्यादि पशूंनीं युक्त आहे, देव-मनुष्यादि सर्व जीवांच्या देहांची उत्पादक व त्यामुळें जी त्यांची ईश्वरी ह्म• नियन्त्री आहे त्या सर्व भुतांना सेव्य असलेल्या मृत्तिकाभिमानी देवीला मी या स्नानकर्मांत बोलावितों.

या पुढील मन्त्रांनीं मन्त्रविलेली मृत्तिका पायांपासून मस्तकापर्यंत सर्व शरीराला लावून जलप्रवेश करण्याकरितां प्रार्थना भक्त म्हणतो.

श्रीर्मे भजतु । अलक्ष्मीर्मे नश्यतु । विष्णुमुखा वै
देवाश्छन्दोभिरिमाँल्लोकाननपजय्यमभ्यजयन् ।
महाँ५ इन्द्रो वज्रबाहुः षोडशी शर्म यच्छतु ॥ ( १० )

**अन्वयार्थ**—'मे श्रीः भजतु-' मला गजान्तलक्ष्मी प्राप्त होवो. 'मे अलक्ष्मीः नश्यतु-' माझी अलक्ष्मी ( दारिद्र्य ) नाश पावो. ( म्हणजे ती आम्हांपासून, आमच्या कुळांतील लोकांपासून, आमच्या बंधुवर्गांपासून, आमच्या गांवापासून व आमच्या राष्ट्रापासूनही दूर राहो. ) 'ये विष्णुमुखाः देवाः छन्दोभिः इमान् लोकान् अनपजय्य यथा तथा अभ्यजयन्-' जे विष्णुप्रभृति देव ते वेदविहित साधनांच्या योगानें बलदा लोकांस मुख्य मुख्य राक्षसांनाही जिंकतां न येईल अशा रीतीनें दीर्घ उपभोगाकरितां प्राप्त झाले आहेत खरोखर ते अभीष्ट देणारे होवोत. 'वै वज्रबाहुः षोडशी महान् इन्द्रः शर्म यच्छतु-' प्रसिद्ध वज्रबाहु व पूर्ण चंद्रासारखा त्रैलोक्यपूज्य इंद्रही आम्हांला सुख देवो.

कंबरभर पाण्यांत प्रवेश केल्यावर जलाचें अभिमंत्रण करण्याचा मंत्र-

स्वस्ति नो मघवा करोतु हन्तु पाप्मानं योऽस्मान्द्वेष्टि ॥

अन्वयार्थ—' मघवा नः स्वस्ति करोतु-' शचीपति आम्हांला स्वस्ति करो. ' यः पाप्मा अस्मान् द्वेष्टि तं हन्तु-' जो पापी पुरुष आमचा द्वेष करतो त्या पाप्याला तो मारो.

सोमानꣳ स्वरणं कृणुहि ब्रह्मणस्पते । कक्षीवन्तं य औशिजम् ॥
शरीरं यज्ञशमलं कुसीदं तस्मिन्त्सीदतु योऽस्मान्द्वेष्टि ॥

अन्वयार्थ—' हे ब्रह्मणस्पते, मां सोमानं स्वरणं कृणुहि-' शाखा व उपशाखा यांसह वेदांचें पालन करणाऱ्या हे परमात्म्या, मला सोमयाग करणारा व सर्व शाखांतील उदात्तादि स्वरांचा उच्चार करणारा कर. ( ह्म० तुझ्या अनुग्रहानें मी स्वरादिसहित वेदाध्ययन करून सोमादि याग करीन, असें कर. ) ' औशिजं कक्षीवन्तं यः परमर्षिः सः मम शरीरं यज्ञशमलं करोतु-' कक्षीवान् या नांवाचा जो उशिज्-नांवाच्या मातेचा पुत्र महर्षि, तो माझ्या शरीराला क्रतु व यज्ञ याविषयींचे श्रम सहन करण्यास समर्थ करो. ' यः अस्मान् द्वेष्टि सः यत् कुसीदं तस्मिन् सीदतु-' तसाच जो शत्रु आमचा द्वेष करतो तो चिरकाल नरकांत राहो.

आतां गुडघाभर पाण्यांत प्रवेश करून जप करावयाचे मंत्र म्हणतो.

चरणं पवित्रं विततं पुराणं येन पूतस्तरति दुष्कृतानि ।
तेन पवित्रेण शुद्धेन पूता अतिपाप्मानमरातिं तरेम ॥

अन्वयार्थ—( या मंत्रानें लक्ष्मीपतीच्या चरणकमलाची स्तुति केली जाते. ) ' यत् चरणं पवित्रं विततं पुराणं येन पूतः मर्त्यः दुष्कृतानि तरति तेन पवित्रेण शुद्धेन पूताः वयं अरातिं पाप्मानं अतितरेम-' जें विष्णूचें चरण पवित्र, विस्तृत व पुरातन आहे, ज्या चरणानें पवित्र झालेला मर्त्य पापांचें उल्लंघन करतो, त्या पवित्र व शुद्ध वैष्णव पदानें ज्यांचें अन्तःकरण पवित्र झालें आहे, असे आम्ही नरकाला कारण होणाऱ्या व त्यामुळेंच शत्रुरूप, अशा पापाचें उल्लंघन करूं.

सजोषा इन्द्र सगणो मरुद्भिः सोमं पिब वृत्रहञ्छूर विद्वान् ।
जहि शत्रूꣳ रपमृधो नुदस्वाथाभयं कृणुहि विश्वतो नः ॥

अन्वयार्थ—' हे वृत्रहन्, हे शूर, हे इन्द्र-' हे वृत्रघ्ना, शूरा, इंद्रा ' त्वं सजोषाः, सगणः विद्वान्-' तूं अन्तःकरणानुरूप ज्याची प्रीति आहे असा आहेस, सगण आहेस व सर्वज्ञ आहेस. ' मरुद्भिः सह सोमं पिब-' तू देवतांसह सोमपान कर. ' शत्रून् जहि-' शत्रूंना मार. ' मृधः अपनुदस्व-' संग्रामांचा नाश कर. ' अथ नः विश्वतः अभयं कृणुहि-' आणि आम्हांला सर्वतः अभय दे. ( निर्भय कर. )

सुमित्रा न आप ओषधयः सन्तु । दुर्मित्रास्तस्मै
भूयासुर्योऽस्मान् द्वेष्टि यं च वयं द्विष्मः ॥

**अन्वयार्थ**—'याः आपः तज्जन्याः ओषधयः च ताः नः सुमित्राः सन्तु-' ज्या आप (जल) व आपांपासून झालेल्या व्रीहि-यवादि ओषधि त्या आम्हांला अनुकूल होवोत व 'यः शत्रुः अस्मान् द्वेष्टि य च वयं द्विष्मः तस्मै दुर्मित्राः भूयासुः-' जो शत्रु आमचा द्वेष करतो व आम्ही ज्याचा द्वेष करतों त्या शत्रूला त्या प्रतिकूल होवोत.

आपो हि ष्ठा मयोभुवस्ता न ऊर्जे दधातन (११) महे रणाय चक्षसे ।
यो वः शिवतमो रसस्तस्य भाजयतेह नः ॥ उशतीरिव मातरः ॥
तस्मा अरं गमाम वो यस्य क्षयाय जिन्वथ ॥ आपो जनयथा च नः ॥

**अन्वयार्थ**—'हे आपः, हि मयोभुवः स्थः-' हे आप, ज्या अर्थी तुम्ही स्नानपानादिकांच्या द्वारा सुख देणाऱ्या आहां 'ताः नः महे रणाय चक्षसे दधातन-' त्याअर्थी त्या तुम्ही आम्हांला (तुमच्या भक्तांना) रमणीय व पूज्य अशा आत्मदर्शनाकरितां पुष्ट करा. (त्यावांचून आमचें जीवन व्यर्थ आहे.)'वः यः शिवतमः रसः तस्य इह नः उशतीः मातरः इव भाजयत-' तुमचा जो अतिशय कल्याणावह रस आहे त्याचें या भूलोकीं असलेल्या आम्हांला अपत्यांचें हित इच्छिणाऱ्या मातांप्रमाणें, स्थान करा. (आम्हांला तुमच्या रसाचें पात्र करा.) 'हे आपः, यस्य क्षयाय जिन्वथ तस्मै वः अरं गमाम-' ज्या अर्थी आमच्या पापाचा क्षय करण्याविषयीं तुम्हांला मोठें प्रेम असतें त्याअर्थी त्याच्या क्षयाकरितां आम्ही तुम्हांला शरण येतों. 'आपः नः जनयथाः-' तसेंच, अहो जलदेवतांनो, आम्हांला पुत्र-दुहित्रादिकांच्या उत्पत्तीस समर्थ करा.

असो; या मंत्रांनीं मंत्रविलेली मृत्तिका अंगाला लावून जलांत प्रवेश करण्यासाठीं जलाधिपतीची प्रार्थना करण्याकरितां दोन मंत्र सांगतात—

हिरण्यशृङ्गं वरुणं प्रपद्ये तीर्थं मे देहि याचितः ।
यन्मया भुक्तमसाधूनां पापेभ्यश्च प्रतिग्रहः ॥
यन्मे मनसा वाचा कर्मणा वा दुष्कृतं कृतं ।
तन्न इन्द्रो वरुणो बृहस्पतिः सविता च पुनन्तु पुनः पुनः ॥

**अन्वयार्थ**—'हिरण्यशृङ्गं वरुणं प्रपद्ये-' सोन्याच्या शृंगाप्रमाणें ज्याच्या मस्तकावर मुकुट आहे त्या हिरण्यशृंग वरुणाला मी त्याच्या अनुग्रहार्थ प्राप्त होतों. 'तादृशः त्वं याचितः मे तीर्थं देहि-' तशा प्रकारच्या वरुणा, तूं मीं याचना केली असल्यामुळें मला तीर्थ (म्हणजे जलांत प्रवेश करावयास स्थान) दे 'किंच असाधूनां यत् मया भुक्तं' तसेंच पाप्यांच्या घरीं मीं जें अन्न खाल्लें आहे व 'तथा पापेभ्यः प्रतिग्रहः च कृतः-' तसाच पाप्यांपासून प्रतिग्रह घेतला आहे त्याप्रमाणें मीं जें 'अन्यद् अपि मनसा, वाचा, कर्मणा वा यत् दुष्कृतं कृतं-' दुसरेंही मनानें, वाणीनें किंवा शरीरानें पाप केलें आहे 'तत् मे सर्वं इन्द्रः, वरुणः, बृहस्पतिः च सविता पुनः पुनः पुनन्तु-' तें माझें सर्व पाप इंद्र, वरुण, बृहस्पति व सविता त्या त्या वेळीं (पुनःपुनः) पावन करोत; पापाचें शोधन करोत.

आतां जलांतील देवांना नमस्कार करावयाचा मंत्र—

नमोऽग्नयेऽप्सुमते नम इन्द्राय नमो वरुणाय नमो वारुण्यै नमोऽद्भयः ॥(१२)

अन्वयार्थ—' अप्सुमते अग्नये नमः इन्द्राय नमः वारुण्यै नमः अद्भ्यः नमः ' जलांत गुप्त होऊन राहिलेल्या अग्नीला, इंद्राला, वरुणाला ( जलाभिमानी देवाला ) वारुणीला ( जलाभिमानिनी देवतेला ) व जलाला नमस्कार असो.

जेथें बुडी मारावयाची तेथील दुष्ट जलाला दूर करण्याचा मंत्र—

यदपां क्रूरं यदमेध्यं यदशान्तं तदपगच्छतात् ॥

अन्वयार्थ—' अपां यत् क्रूर रूपं ' जलाचें जें क्रूर ह्म० मरणाला कारण होणारें रूप ( पाण्याची ओढ, भोंवरे, अतिशय खोली, इत्यादि मरणाची निमित्तें आहेत ) ' यत् अमेध्यं ' तसेंच जें अमेध्य ( ह्म० थुंकी, शेंबूड इत्यादिकांमुळें अपवित्र झालेलें ) ' यदपि अशान्तं ' तसेंच जें वात, कफ इत्यादिकांस उत्पन्न करणारें अशान्त रूप ' तत् सर्व अपगच्छतात् ' तें सर्व या निमज्जन प्रदेशांतून (बुडी मारण्याच्या स्थानापासून) दूर जावो.

आतां निमज्जनाचे ( स्नानाचे, बुडी मारण्याचे ) दोन मंत्र—

अत्याशनादतीपानाद्यच्च उग्रात्प्रतिग्रहात् ।
तन्नो वरुणो राजा पाणिना ह्यवमर्शतु ॥
सोऽहमपापो विरजो निर्मुक्तो मुक्तकिल्बिषः ।
नाकस्य पृष्ठमारुह्य गच्छेद्ब्रह्मसलोकताम् ॥

अन्वयार्थ—' यत् अत्याशनात्, अतीपानात्, च उग्रात् प्रतिग्रहात् संपादितं पापं ' (देव, पितर व मनुष्य यांना उद्देशून केलेल्या) यज्ञावांचून खालेलें जें अन्न तें अत्याशन, देव, ऋषि व पितर यांच्या तर्पणाचें उल्लंघन करून प्यालेलें जें जल तें अतिपान,अशास्त्रीय आचरण करणाऱ्या पुरुषापासून धनाचा प्रतिग्रह करणें हा उग्र प्रतिग्रह,हें सर्व आचरिल्यामुळें घडलेलें जें पाप ' तत् मे सर्व वरुण ' राजा पाणिना अवमर्शतु हि ' त्या माझ्या पापाला वरुण राजा आपल्या हातानें दूर करो. ' ततः पापरहितः सः अहं विरजः निर्मुक्तः मुक्तकिल्बिषः सन् नाकस्य पृष्ठं आरुह्य ब्रह्मसलोकतां गच्छेत् ' त्यामुळें पापरहित झालेला हा मी रजोगुणरहित, संसाराला कारण होणाऱ्या रागद्वेषादि दोषांपासून सर्वथा मुक्त व त्यामुळेंच पापरहित होऊन स्वर्गाच्या ऊर्ध्वभागीं चढून हिरण्यगर्भाच्या सलोकतेस ( हिरण्यगर्भाच्या भोगासारख्या भोगांस ) प्राप्त होईन.

यश्चाप्सु वरुणः स पुनात्वघमर्षणः ।

अन्वयार्थ—' अप्सु यः वरुणः सः अघमर्षणः नः पुनातु ' समुद्र, नद्या, वापी,कूप, तडाग इत्यादि स्थानांतील जो वरुण, तो महापातकांचाही नाश करणारा देव आम्हांला

आतां पवित्र गंगादि नद्यांच्या आवाहनाचा मंत्र—

इमं मे गङ्गे यमुने सरस्वति शुतुद्रि स्तोम१ँ सचता परुष्णिया ।
असिक्निया मरुद्वृधे वितस्तयाऽऽर्जीकिये शृणुह्या सुषोमया ॥

अन्वयार्थ—' हे गंगे, यमुने, सरस्वति, शुतुद्रि, मरुद्वृधे व आर्जीकीये, परुष्णिया, असिक्निया, वितस्तया, सुषोमया सह मे इमं स्तोमं शृणुहि- ' हे गंगे, यमुने, सरस्वति, शुतुद्रि, मरुद्वृधे व आर्जीकीये, तुम्ही सर्व नद्या परुष्णि, असिक्नि, वितस्ता व सुषोमा यांसहवर्तमान माझें हें स्तोत्र ऐका व 'श्रुत्वा तत्र आसचता (जले आगत्य तद्द्वारेण मयि समवेता भवत) ' तें ऐकून आणि जलांत येऊन त्याच्या द्वारा माझ्यामध्यें संबद्ध व्हा.

जलांत बुडालेल्या पुरुषाच्या प्राणायामाकरितां अघमर्षण सूक्त—

ऋतं च सत्यं चाभीद्धात्तपसोऽध्यजायत ।
ततो रात्रिरजायत ततः समुद्रो अर्णवः (१३)
समुद्रादर्णवादधि संवत्सरो अजायत ।
अहोरात्राणि विदधद्विश्वस्य मिषतो वशी ॥
सूर्याचन्द्रमसौ धाता यथापूर्वमकल्पयत् ।
दिवं च पृथिवीं चान्तरिक्षमथो सुवः ॥

अन्वयार्थ—' ऋतं च सत्यं च तपसः अधि अभीद्धात् अजायत-' मनानें यथार्थ संकल्प करणें, वाणीनें यथार्थ भाषण करणें, आणि दुसरेंही सर्व शास्त्रीय धर्मजात, तपाच्या नंतर ह्मणजे स्रष्टव्य जगाच्या पर्यालोचनानंतर त्या प्रकाशमान परमात्म्यापासून उत्पन्न झालें. ' ततः रात्रिः अजायत-' त्या स्वप्रकाश परमात्म्यापासून रात्र झाली ( व दिवसही झाला. ) ' ततः अर्णवः समुद्रः-' त्याच्यापासूनच हा क्षारोदकानें भरलेला समुद्र झाला. ' अर्णवात् समुद्रात् अधि संवत्सरः अजायत ' अवान्तर भेदयुक्त समुद्रानंतर संवत्सर ( व तदुपलक्षित सर्व काळ ) झाला. ' अहोरात्राणि विदधत् सः मिषतः विश्वस्य वशी भूत्वा वर्तते-' तो उत्पादक परमेश्वर अहोरात्र व तसलेच दुसरेही सर्व काळाचे अवयव यांस उत्पन्न करीत निमिषोन्मेषादि युक्त सर्व प्राण्यांचा स्वामी होऊन राहतो. 'धाता सूर्याचन्द्रमसौ, दिवं, पृथिवीं, अन्तरिक्ष अथो सुवः यथापूर्वं अकल्पयत्-' तो तशा प्रकारचा परमेश्वर सूर्य, चन्द्रमा इत्यादि देव, स्वर्ग, पृथिवी, अन्तरिक्ष इत्यादि लोक, स्वर्गांतील नन्दनादि भोगविशेष या सर्वांना पूर्व कल्पांतील त्या त्या पदार्थांच्या रूपानेंच तुलत्या संकल्पानें तयार करता झाला

याप्रमाणें प्राणायामानें अघमर्षण केल्यावर पुनः स्नान करावयासाठीं तीन ऋचा पढतात—

यत्पृथिव्या१ँ रजः स्वमान्तरिक्षे विरोदसी । इमा१ँ स्तदापो वरुणः पुनात्वघमर्षणः । पुनन्तु वसवः पुनातु वरुणः पुनात्वघमर्षणः । एष भूतस्य

मध्ये भुवनस्य गोप्ता। एष पुण्यकृतां लोकानेष मृत्योर्हिरण्मयं। द्यावापृथिव्यो-र्हिरण्मयꣳ सꣳश्रितꣳ सुवः। (१४) स नः सुवः सꣳशिशाधि॥

अन्वयार्थ—'पृथिव्यां वर्तमानानां अस्माकं सर्वं रजः यद् अस्ति, आ-अन्तरिक्षे वि-शेषतः विरोदसी यत् पापं अस्ति तत् आपः अघमर्षणः वरुणः इमान् अस्मान् पुनातु-' या पृथ्वीत राहणान्या आमचें जें स्वकीय पाप आहे त्याचप्रमाणें सर्वतः आन्तरिक्ष लो-कांत व विशेषतः भूमि व स्वर्ग याच्या मध्यभागीं जें पाप आहे त्याचप्रमाणें पृथ्वीच्या खालच्या पाताळादिकांत जें आमचें पाप आहे, (ह्म. त्या त्या लोकांत जन्म घेतला अ-सतां आमच्या हातून जें पाप घडतें) तें सर्व व त्याचें अनुष्ठान करणारे हे आम्ही यांना तो जलाचा स्वामी व पापाचा नाश करणारा वरुण शुद्ध करो. 'वसवः पुनन्तु-' अष्टावसू याला पावन करोत. 'वरुणः अपि एन पुनातु-' वरुणही याला पावन करो. 'अघमर्षणः अन्यः अपि एन पुनातु-' दुसराही पापविनाशक देव याला पावन करो. (याप्रमाणें त्यांनीं म्हटलेलें असल्यामुळें पवित्र झालेल्या मला तूंही यमदेव पीडा करूं नकोस. तर मजवर अनुग्रह कर.) 'एषः भूतस्य, मध्ये, भुवनस्य गोप्ता-' वरुण मार्गे होऊन गेलेल्या, हलीं-च्या व पुढच्या सर्व प्राण्यांचा रक्षक आहे. 'एषः पुण्यकृतां लोकान् प्रयच्छति-' हा वरुण ज्योतिष्टोमादि पुण्य करणाऱ्या पुरुषांचे लोक देतो. 'एषः पापिनां मृत्योः हिरण्मयं लोकविशेष प्रयच्छति-' त्याचप्रमाणें तो सर्व पाप्यांना, प्राण्यांना मारणाऱ्या यमाचा हिरण्मय लोक देतो, 'यत् हिरण्मयं ब्रह्माण्डरूपं द्यावापृथिव्योः संश्रितं वर्तते-' की ज्यांत हिरण्मय ब्रह्माण्डरूप सुवर्लोक द्यावाभूमींचा आश्रय करून राहतो. 'हे वरुण, स. त्वं नः सुवः संशिशाधि-' हे वरुणा, तो तूं आम्हांला तशा प्रकारचा स्वर्गलोक दे.

याप्रमाणें तीन ऋचा म्हणून स्नान करणाऱ्या पुरुषाच्या आचमनार्थ मंत्र—

आर्द्रं ज्वलति ज्योतिरहमस्मि। ज्योतिर्ज्वलति ब्रह्माहमस्मि। योऽह-मस्मि ब्रह्माहमस्मि। अहमस्मि ब्रह्माहमस्मि। अहमेवाहं मां जुहोमि स्वाहा॥

अन्वयार्थ—'यत् आर्द्रं तत् ज्वलति-' हें जें उदकरूप आर्द्र आहे तें स्वतःच्या अधिष्ठानभूत चैतन्यानें प्रकाशमान होतें. 'तत् ज्योति. अहं अस्मि-' तें अधिष्ठान चैत-न्यरूप ज्योति मी आहें. (संस्कृतांत 'ज्योतिष्' हा शब्द नपुंसकलिंगी आहे. देह, इंद्रियें इत्यादिकांहून पृथक् केलेल्या माझें स्वरूप तें जलाधिष्ठान चैतन्यच आहे) 'यत् ज्योतिः ज्वलति तत् ब्रह्म एव अहं अस्मि-'कारण जी ज्योति जळते म्हणून म्हटलेलें आहे तें ब्रह्म-च मी आहें. 'यःअहं पुरा जीवःअस्मि सःएव इदानीं अहं ब्रह्म अस्मि-' वास्तव मी ज्योति आहें, असें म्हटलें असतां मी ब्रह्म आहें असें म्हटल्यासारखें होतें. (यावरून—पूर्वसिद्ध जीवात्म्याचें स्वरूप माहीत होतें व त्याला दुसऱ्या रूपाची प्राप्ति होते, असें कोणी समजूं नये,तर मी आपल्याला पूर्वीसुद्धा जीव समजत होतों तोच आतां ब्रह्म समजतों म्हणजे पूर्वीसुद्धा वस्तुतः ब्रह्म असलेल्या माझ्या ठिकाणीं अज्ञानानें जीवत्वाचा आरोप केला होता. पण विवेकानें त्या अज्ञानाला घालविलें असतां आतां मी आपल्या वास्तविक पूर्वसिद्ध ब्रह्म-स्वरूपाचा अनुभव घेत आहें. माझ्या ठिकाणीं ब्रह्मत्व नवेंच आलें आहे, असें नाहीं.)

'अहं अस्मि ब्रह्म अहं अस्मि-' यास्तव मी ब्रह्म आहें, या अनुभवाच्या वेळींही पूर्वसिद्ध मीच आहें. (म्हणजे मासें ब्रह्मत्व गौण नाहीं मुख्य आहे.) 'तादृशः अहं जलरूपं मां उदराग्नौ जुहोमि स्वाहा-' तशा प्रकारचा मी जलरूप अशा मला उदराग्नींत टाकितों. 'स्वाहा' हा शब्द हवि देणें, या अर्थी आहे. (माझ्या देहांत असलेल्या देवांना मीं जलरूप हवि दिला आहे.)

आचमनानंतर पुनरपि स्नानाचा मंत्र सांगतात—

अकार्यकार्यवकीर्णी स्तेनो भ्रूणहा गुरुतल्पगः ।
वरुणोऽपामघमर्षणस्तस्मात्पापात्प्रमुच्यते ॥

**अन्वयार्थ**—'अकार्यकारी, अवकीर्णी, स्तेनः, भ्रूणहा, गुरुतल्पगः-' शास्त्रनिषिद्ध मांसभक्षणादि अकार्य करणारा, अगम्य स्त्रीगमन करणारा, ब्राह्मणाचें सुवर्ण हरण करणारा, भ्रूणहत्या करणारा (म्ह० वेदवेदांगज्ञ ब्राह्मण किंवा गर्भ यांस मारणारा), गुरुस्त्रीसमागम करणारा, 'एतादृशः अपि सः अघमर्षणः अपां स्वामी वरुणः तस्मात् पापात् प्रमुच्यते-' अशा प्रकारचें पाप करणाऱ्याही मला पापविनाशक जलस्वामी वरुण त्या सर्व पापापासून मुक्त करतो.

गुप्त पापाच्या क्षालनार्थ स्नानाचा मंत्र—

रजोभूमिस्त्व मा९ रोदयस्व प्रवदन्ति धीराः ।

**अन्वयार्थ**—'हे परमात्मन्-' हे परमात्म्या, 'यद्यपि अहं रजोभूमिः-' मी जरी पापस्थान आहें 'तथापि त्वं मां न रोदयस्व-' तरी तूं मला पापफलभोगानें रडवूं नको. 'किंतु अनुगृहाण-' तर पापाचा नाश करून मजवर अनुग्रह कर 'इति धीराः प्रवदन्ति-' असें बुद्धिमान् शास्त्रज्ञ म्हणतात.

आतां स्नानानंतर जप करावयास योग्य असलेला मंत्र—

आक्रान्त्समुद्रः प्रथमे विधर्मञ्जनयन्प्रजा भुवनस्य राजा ।
वृषा पवित्रे अधि सानो अव्ये बृहत्सोमो वावृधे सुवान इन्दुः (१५)

**अन्वयार्थ**—'विधर्मन् प्रथमे प्रजाः जनयन् समुद्रः आक्रान्-' प्राण्यांनीं पूर्वकल्पात केलेले विविध धर्म ज्या वेळीं आपलें फल देण्यासाठीं जागे होतात त्या विधर्मसंज्ञक सृष्टीच्या आदिसमयीं प्रजेला उत्पन्न करणारा आनंदसमुद्र परमात्मा सर्व जगाला व्यापता झाला. 'सः भुवनस्य राजा-' तो भुवनाचा पालक असल्यामुळें राजा 'कामवर्षित्वात् वृषा-' व स्वभक्तांवर इष्ट विषयांचा वर्षाव करणारा असल्यामुळें वृषा आहे, 'सोमः पवित्रे, अधि, अव्ये सानो बृहत् वावृधे-' उमानांवाच्या ब्रह्मविद्याभिमानिनी देवीसह असलेला परमात्मा पवित्र-रक्षण करणाऱ्या व सर्वांपेक्षां अधिक अशा हृदयकमलांत अतिशय वृद्धि पावला आहे. (स्प० पूर्वी अविद्याच्छादित झाल्यामुळें तो संकुचित जीवदशा होतो. पण पुढें तो अविद्या विवेकामुळें तिरस्कृत झाली असतां त्याच्या स्वाभाविक महत्तेचा आविर्भाव होतो व त्यामुळें तो वृद्धि पावल्यासारखा भासतो.) 'सः सोमः सुवानः

इन्दुः-' तो सोम जीवांच्या धर्माधर्मांचा प्रेरक आहे. तो फलदानानें चंद्राप्रमाणें आह्लादाचा हेतु होतो. ( इति नारायणोपनिषदि प्रथमोऽनुवाकः )

---

आतां अनिष्टपरिहारार्थ जप करावयास योग्य असलेले सहा मंत्र सांगतात—

जातवेदसे सुनवाम सोममरातीयतो निदहाति वेदः ।
स नः पर्षदति दुर्गाणि विश्वा नावेव सिन्धुं दुरिताऽत्यग्निः ॥

**अन्वयार्थ**—' जातवेदसे सोमं सुनवाम-' आम्ही अग्नीला यागसमर्थ लतारूप सोम पिळून अर्पण करतों. ' वेदः अरातीयतः निदहाति ' सर्व जाणणारा वेदसंज्ञक अग्नि आमच्याशीं शत्रूप्रमाणें आचरण करणाऱ्या पुरुषास सर्वथा भस्म करून सोडतो. ' सः नः –अस्माकं विश्वा दुर्गाणि अतिपर्षद्-' तो अग्नि आमच्या सर्व आपत्तींना सर्वथा नाश करता झाला. ' यथा नावा सिन्धुं तथा अग्निः दुरिता अतिपर्षद् ' जसा नाविक नावेच्या योगानें इतरांना समुद्रांतून पार नेतो त्याप्रमाणें अग्नि पापांपासून पार करतो.

तामग्निवर्णां तपसा ज्वलन्तीं वैरोचनीं कर्मफलेषु जुष्टाम् ।
दुर्गां देवीꣳ शरणमहं प्रपद्ये सुतरसि तरसे नमः ॥

**अन्वयार्थ**—' अग्निवर्णां-' जिचा वर्ण अग्नीसारखा आहे, ' तपसा ज्वलन्तीं-' आपल्या स्वाभाविक संतापानें जाज्वल्य होणारी, ' वैरोचनीं-' विशेषतः स्वतःच प्रकाशमान होणाऱ्या परमात्म्यानें पाहिलेली असल्यामुळें वैरोचनी व ' कर्मफलेषु जुष्टां-' स्वर्ग, पशु, पुत्र इत्यादि कर्मफलाकरितां उपासकांकडून सेविली गेलेली ' दुर्गां देवीं अहं शरणं प्रपद्ये-' अशा त्या दुर्गा देवीला मी शरण जातों. ' हे सुतरसि तरसे नमः अस्तु-' संसारांतून पार करणारे हे देवि, मला तारणाऱ्या तुला नमस्कार असो.

अग्ने त्वं पारया नव्यो अस्मान्स्वस्तिभिरति दुर्गाणि विश्वा ।
पूश्च पृथ्वी बहुला न उर्वी भवा तोकाय तनयाय शंयोः ॥

**अन्वयार्थ**—' हे अग्ने, नव्यः त्वं अस्मान् स्वस्तिभिः विश्वा दुर्गाणि अतिपारय-' हे अग्ने, स्तुति करण्यास योग्य असलेला तू आम्हांला कल्याणकर उपायांच्या योगानें सर्व आपत्तींचें उल्लंघन करवून संसाराच्या परतीरास ने. ' त्वत्प्रसादात् नः या पूः च सा पृथ्वी भवतु-' तुझ्या प्रसादानें आमची जी रहावयाची नगरी आहे तीहि विस्तीर्ण होवो. ' तथा उर्वी–बहुला भवतु-' शेत उगवण्यास योग्य असलेली भूमिही पुष्कळ होवो ' त्वं च तोकाय तनयाय–अस्मदपत्याय पुत्राय शंयोः भव-' तू आमच्या अपत्याला व पुत्राला सुखसंपन्न करणारा हो.

विश्वानि नो दुर्गहा जातवेदः सिन्धुं न नावा दुरितातिपर्षि ।
अग्ने अत्रिवन्मनसा गृणानोऽस्माकं बोध्यविता तनूनाम् ॥

**अन्वयार्थ**—' हे जातवेदः दुर्गहा त्वं नः नावा सिन्धु इव विश्वानि दुरिता अतिपर्षि-' हे अग्ने, सर्व आपत्तींचा नाश करणारा तूं आम्हांला, नाविक जसा नावेच्या योगानें

नदी किंवा समुद्र यांतून, त्याप्रमाणें सर्व पापांतून अतिशय तारतोस. 'हे अग्ने, अत्रिवत् मनसा गृणानः अस्माकं तनूनां अविता भूत्वा बोधि-' अग्ने, तूं अत्रीप्रमाणें मनानें शुद्ध भावना करीत आमच्या शरीरांचा रक्षक होऊन सावधान होऊन रहा. (आध्यात्मिकादि तापत्रयरहित असल्यामुळें अत्रिसंज्ञक जीवन्मुक्त महर्षि सर्वांच्या विषयीं मनांत दया बाळगून या जगांत 'सर्व सुखी राहोत, सर्व नीरोग असोत,' इत्यादि सर्वदा चिंतन करतो त्याप्रमाणें तूं आम्हांविषयीं शुभ भावना कर.)

पृतनाजितᳲ सहमानमुग्रमग्निᳲ हुवेम परमात्सधस्थात् ।
स नः पर्षदति दुर्गाणि विश्वा क्षामद्देवो अतिदुरितात्यग्निः ॥

अन्वयार्थ—'पृतनाजितं सहमानं उग्रं अग्निं परमात् सधस्थात् हुवेम-' शत्रूंच्या सैन्याला जिंकणाऱ्या व म्हणूनच शत्रूंना सहन करणाऱ्या, उग्र अग्नीला त्याच्या मृत्यांसह रहावयाच्या उत्कृष्ट स्थानापासून आम्ही बोलवितों. 'सः नः विश्वा दुर्गाणि अतिपर्षत्-' तो अग्नि आमच्या सर्व आपत्तींचा सर्वथा नाश करो. तसाच 'अग्निः देवः क्षामत् अतिदुरिता-' अग्नि देव आमच्या अपराधांची क्षमा करून आमच्याकडून ब्रह्महत्यादि महापातकांचेंही उल्लंघन करविनो.

प्रत्नोषि कमीड्यो अध्वरेषु सनाच होता नव्यश्च सत्सि ।
स्वां चाग्ने तनुवं पिप्रयस्वास्मभ्यं च सौभगमायजस्व ॥

अन्वयार्थ—'हे अग्ने, त्वं अध्वरेषु ईड्यः सन् कं प्रत्नोषि-' हे अग्ने, तूं यज्ञांत स्तुत्य होऊन सुखाचा विस्तार करतोस. 'सनात् च होता नव्यः भूत्वा सत्सि-' कर्मफलांचा दाताही होऊन होता (होमनिष्पादक) होतोस. (स्तुत्य होऊनही यागप्रदेशीं राहतोस) 'अनः हे अग्ने स्वां च तनुव पिप्रयस्व-' यास्तव हे अग्ने, तूं आपल्याही तनूला आमच्या हवीनें प्रसन्न कर 'ततः अस्मभ्यं च सौभगं आयजस्व-' आणि त्यानंतर आम्हांलाही सौभाग्यसंपन्न कर.

गोभिर्जुष्टमयुजो निषिक्तं तवेन्द्र विष्णोरनुसंचरेम ।
नाकस्य पृष्ठमभिसंवसानो वैष्णवीं लोक इह मादयन्ताम् ॥ (२)

अन्वयार्थ—'हे इंद्र अयुज- विष्णोः तव गोभिः जुष्टं (अमृतधाराभिः) निषिक्तं (महामार्गं उद्दिश्य) अनुसंचरेम-' हे इंद्रा, पाप व दुःख यांनीं युक्त न होणाऱ्या व सर्व यागांमध्ये व्यापनशील अशा तुझ्या धेनूंनीं सेविलेल्या व अमृतधारांचा ज्यावर वर्षाव झाला आहे अशा महामार्गाला उद्देशून आम्ही (भृत्यांप्रमाणें) तुझ्या अनुसार वर्तन करतों. 'नाकस्य पृष्ठ अभिसंवसानः वैष्णवीं कुर्वाणं मां इह लोके मादयन्ताम्-' स्वर्गाच्या पृष्ठभागीं सर्वतः वास करणारे देव विष्णूची भक्ति करणाऱ्या मला माझें वांछित देऊन या लोकीं हर्षयुक्त करोत. (इति द्वितीयोऽनुवाकः)

---

आतां अग्नीची इच्छा करणाऱ्या पुरुषाच्या होमांतील—

भूरन्नमग्नये पृथिव्यै स्वाहा भुवोऽन्नं वायवेऽन्तरिक्षाय स्वाहा सुवरन्नमादित्याय दिवे स्वाहा भूर्भुवःसुवरन्नं चन्द्रमसे दिग्भ्यः स्वाहा नमो देवेभ्यः स्वधा पितृभ्यो भूर्भुवःसुवरन्नमोम् ॥ ( ३ )

अन्वयार्थ—( भूः भुवः व सुवर् हीं तीन पदें अव्ययें आहेत. तीं व्यस्त प्र॰ प्रत्येक व समस्त–समूहरूपानें चार मंत्ररूप होऊन अग्न्यादि देवतांचीं प्रतिपादक होतात; आणि तसें झालें असतां असा अर्थ निष्पन्न होतो —) 'भूः इत्यनेन मन्त्रेण प्रतिपाद्य य अग्नये तन्मन्त्रप्रतिपाद्यायै पृथिव्यै च अन्नं स्वाहा ( सुहुतं अस्तु )' 'भूः' या मंत्रानें प्रतिपाद्य जो अग्नि आणि त्याच मंत्रानें प्रतिपाद्य जी पृथिवी त्यांना उद्देशून दिलेलें हें अन्न सुहुत होवो. ( म्हणजे त्याचा चांगला होम होवो. ) ' तथा भुवः वायवे अन्तरिक्षाय अन्नं स्वाहा ' त्याचप्रमाणें 'भुवः' या मंत्रानें प्रतिपाद्य जो वायु व अन्तरिक्ष, त्यांना उद्देशून दिलेलें हें अन्न सुहुत होवो ' सुवरादित्याय दिवे अन्नं स्वाहा-' 'सुवः' प्रतिपाद्य आदित्य व द्युलोक, यांना हें अन्न स्वाहा. ' भूर्भुवःसुवश्चन्द्रमसे दिग्भ्यः अन्नं स्वाहा-' भूः भुवः सुवः, या मंत्राच्या प्रतिपाद्य चंद्राला व दिशांना उद्देशून दिलेलें द्रव्य सुहुत होवो. ( येथें होमद्रव्य अन्न आहे आणि विशेष फल सांगितलेलें नसल्यामुळें पापक्षय हें साधारण फळ जाणावें. ) याप्रमाणें चार मंत्रांनीं यथाशक्ति होम करून नंतर पूर्वाभिमुख होऊन ' नमो देवेभ्यः स्वधा पितृभ्यः भूर्भुवः सुवः अन्नं ओम्-' 'नमो देवेभ्यः' या मंत्रानें उपस्थान करावें. ' स्वधा पितृभ्यः ' या मंत्रानें दक्षिणाभिमुख होऊन उपस्थान करावें. ( स्वधाशब्द पितरांना प्रिय असलेला नमस्कारादि उपचार सांगतो. ) मी भूः, भुवः व सुवः या तिन्ही लोकीं पापरहित होतों. ' ओं ' हा शब्द अंगीकाराचें प्रतिपादन करतो. ( इति तृतीयोऽनुवाकः )

---

आतां केवळ पापक्षयार्थ मंत्र सांगतात—

भूरग्नये पृथिव्यै स्वाहा भुवो वायवेऽन्तरिक्षाय स्वाहा सुवरादित्याय दिवे स्वाहा भूर्भुवःसुवश्चन्द्रमसे दिग्भ्यः स्वाहा नमो देवेभ्यः स्वधा पितृभ्यो भूर्भुवःसुवरग्न ओम् ॥ (४)

अन्वयार्थ—' भूः अग्नये, पृथिव्यै स्वाहा इत्यादि-' येथें आज्य हें होमद्रव्य आहे. तें सुहुत असो; इत्यादि अर्थ स्पष्ट आहे. 'अग्न ओम्' याचा अर्थ-हे अग्ने, तू माझी पापनिवारणाविषयींची ही प्रार्थना सफळ कर मला अन्न प्राप्त होवो,–असा जाणावा.( इति चतुर्थोऽनुवाकः )

---

ज्याला पूजेची इच्छा असते, लोकांनीं आपला सत्कार करावा असें वाटतें, त्यानें कोणत्या मंत्रानें होम करावा तें सांगतात—

भूरग्नये च पृथिव्यै च महते च स्वाहा भुवो वायवे चान्तरिक्षाय च महते च स्वाहा सुवरादित्याय च दिवे च महते च स्वाहा भूर्भुवःसुवश्चन्द्र-

मसे च नक्षत्रेभ्यश्च महते च स्वाहा नमो देवेभ्यः स्वधा पितृभ्यो भूर्भुवः-सुवर्महरोम् ॥ ( ५ )

अन्वयार्थ—'भूः अग्नये, पृथिव्यै महते च स्वाहा इत्यादि-' महते म्हणजे प्रौढ किंवा पूज्य हिरण्यगर्भाला. ' महते च ' येथील चकारानें त्या त्या देवतांचे सेवक देव घ्यावे. त्यांनाही उद्देशून हें द्रव्य सुहुत असो. महरों ह्य॰ मीं पूजेला प्राप्त व्हावें.(इति पञ्चमोऽनुवाकः)

' भूरग्नये॰ ' इत्यादि अनुवाकांत पापक्षयार्थ होममंत्र सांगितले. आतां ज्ञानप्रतिबन्धाच्या निवारणानें मुमुक्षूला ज्ञानाची प्राप्ति व्हावी म्हणून होममंत्र सांगतात—

पाहि नो अग्न एनसे स्वाहा । पाहि नो विश्ववेदसे स्वाहा ॥

यज्ञं पाहि विभावसो स्वाहा । सर्वं पाहि शतक्रतो स्वाहा ॥ ( ६ )

अन्वयार्थ—' हे अग्ने, नः एनसे पाहि स्वाहा-' हे अग्ने, ज्ञानप्रतिबन्धक पापापासून आमचें रक्षण कर, त्यासाठीं हें तुला सुहुत असो. ' नः विश्ववेदसे पाहि तदर्थं तुभ्यं इदं स्वाहा-' सर्व तत्त्वज्ञानाच्या सिद्ध्यर्थ आमचें पालन कर. तदर्थ तुला स्वाहा.'विभावसो, यज्ञं पाहि स्वाहा-' विशेष दीप्ति हेंच ज्याचें धन आहे तो विभावसु–अग्नि; हे विभावसो, ज्ञानाच्या इच्छेनें आह्मांकडून अनुष्ठान केल्या जाणाऱ्या साधनांची निर्विघ्नपणें समाप्ति करून आमचें पालन कर. ' हे शतक्रतो सर्वं पाहि स्वाहा-' ज्या अग्नीकडून शंभर यज्ञ केले जातात तो शतक्रतु अग्नि; हे शतक्रतो, आमच्या गुरु-शास्त्रादि सर्व ज्ञानसाधनांचें रक्षण कर. ( स्वाहाशब्दाचा अर्थ वर दिलाच आहे. ६. )

पाहि नो अग्न एकया । पाह्युत द्वितीयया ॥

पाह्यूर्जं तृतीयया । पाहि गीर्भिश्चतसृभिर्वसो स्वाहा ॥ (७)

अन्वयार्थ—' हे अग्ने, हे वसो, नः एकया पाहि स्वाहा-' हे अग्ने, हे वसो ( जगन्निवास होता ), तूं एका ह्य॰ ऋग्वेदलक्षण वाणीनें सर्व प्रकारें स्तुति केला गेलेला असा होऊन आमचें रक्षण कर. त्याकरितां हें आज्य तुला सुहुत असो. ' उत द्वितीयया पाहि स्वाहा-' दुसऱ्या यजुर्वेदरूप वाणीनेंही स्तुति केला गेलेला असाही तूं आमचें रक्षण कर, स्वाहा. ' तृतीयया ऊर्जं पाहि-' तसेंच, तिसऱ्या सामवेदरूपी वाणीनें अभिष्टुत असा तूं आमचें बल व अन्नरस यांचें रक्षण कर; स्वाहा आणि ' चतसृभिः गीर्भिः पाहि स्वाहा-' ऋग्, यजुः, साम व अथर्वरूप चारी वाणींनीं अभिष्टुत असा तूं आमचें रक्षण कर; स्वाहा.

ज्याला सर्व ज्ञानप्रतिपादक वेदान्ताची प्राप्ति व्हावी, अशी इच्छा असते त्यानें कोणत्या मंत्राचा जप करावा, तें सांगतात—

यश्छन्दसामृषभो विश्वरूपश्छन्दोभ्यश्छन्दाꣳस्याविवेश । सताꣳ शिक्यः पुरोवाचोपनिषदिन्द्रो ज्येष्ठ इन्द्रियाय ऋषिभ्यो नमो देवेभ्यः स्वधा पितृभ्यो भूर्भुवःसुवश्छन्द ओम् ॥ ( ८ )

अन्वयार्थ—' यः प्रणवः छन्दसां मध्ये ऋषभः-श्रेष्ठः विश्वरूपः-सर्वजगदात्मकः तादृशः प्रणवः छन्दोभ्यः प्रादुर्भूतः सः छन्दांसि आविवेश-' (रत्न ४ शांक्षा अनुवाक ४ यथें वर्णन केल्याप्रमाणें) जो प्रणव वेदांमध्यें श्रेष्ठ व सर्व जगद्रूप आहे तो तशा प्रकारचा प्रणव वेदांपासून प्रादुर्भूत झाला. ( म्हणजे तो वेदांचें सार या रूपानें प्रजापतीला स्फुरला. ) तो पुनः गायत्र्यादि छंदांमध्यें शिरला. ( इ० त्यांत त्याचा प्रयोग करूं लागले. ) ' सतो विक्यः-ज्येष्ठः इन्द्रः ऋषिभ्यः इन्द्रियाय उपनिषत् प्रोवाच-' कर्मांचें अनुष्ठान करणारे उपासक व ज्ञानी, या सज्जनांना प्राप्त करून घेतां येण्याजोगा व सर्वांचें कारण असल्यामुळें सर्वांहून पहिला, असा प्रणवप्रतिपाद्य परमैश्वर्ययुक्त परमात्मा अन्तर्मुख जिज्ञासूंना ज्ञानसामर्थ्याकरितां सर्व वेदान्तप्रसिद्ध ब्रह्मविद्या सांगता झाला. ' अतः तत्प्रतिबन्धनिवारणाय देवेभ्यः नमः पितृभ्यः स्वधा भूर्भुवःसुवरोम्-' म्हणून मी त्या ज्ञानाच्या प्रतिबंधाचें निवारण व्हावें म्हणून देवांना नमस्कार करितों. पितरांनाही स्वधाशब्दानें प्रसन्न करतों. मी भूः, भुवः व सुवः अशा तीन लोकांत स्थित असलेल्या वेदांस प्राप्त होतों.

( इति अष्टमोऽनुवाकः )

---

आतां प्राप्त झालेल्या वेदांचें विस्मरण न व्हावें, म्हणून जप्य मंत्र—

नमो ब्रह्मणे धारणं मे अस्त्वनिराकरणं धारयिता भूयासं कर्णयोः श्रुतं मा च्योढ्वं ममामुष्य ओम् ॥ (९)

अन्वयार्थ—' ब्रह्मणे नमः अस्तु-' जगाच्या कारणाला नमस्कार असो; ' तत्प्रसादान्मदीये चित्ते मन्थतदर्थयोः धारणं अस्तु-' त्याच्या प्रसादानें माझ्या चित्तांत ग्रंथ व त्याचा अर्थ, यांचें धारण होवो. म्हणजे ' अनिराकरणं यथा स्यात् तथा धारयिता भूयासं-' त्यांचें विस्मरण न होईल अशा रीतीनें मी त्यांचें धारण करणारा व्हावें. ' अमुष्य मम कर्णयोः श्रुतं आसीत् तत् सर्वं मा च्योढ्वं-' अशी प्रार्थना करणाऱ्या या माझ्या कानांनीं जें कांहीं वेदशास्त्रादिक केव्हांही ऐकलें असेल त्या सर्वांचा विनाश करूं नको. 'ततः अहं श्रौ स्थिरं धारणं प्राप्नुयाम्-' त्यामुळें मला स्थिर धारणा प्राप्त होवो. ( ९. )

---

चित्तैकाग्र्यरूप तप हेंच ज्ञानाचें साधन आहे. कारण ' मन व इंद्रियें यांचें ऐकाग्र्य हेंच परम तप आहे, ' असें श्रुतींत सांगितलें आहे. यास्तव त्या तपाची सर्व श्रौत-स्मार्त कर्मस्वरूपतेनें प्रशंसा करितात. अथवा अशा प्रकारच्या तपाच्या सिद्ध्यर्थ जप्य मंत्र सांगतात—

ऋतं तपः सत्यं तपः श्रुतं तपः शान्तं तपो दमस्तपः शमस्तपो दानं तपो यज्ञं तपो भूर्भुवः सुवर्ब्रह्मैतदुपास्यैतत्तपः ॥ (१०)

अन्वयार्थ—' ऋतं, सत्यं, श्रुतं, शान्तं, दमः, शमः, दानं, यज्ञ ( यज्ञः ) इत्येतत्सर्वं तपः अस्ति-' मनानें यथार्थ वस्तूचें चिंतन करणें, हें ऋत, वाणीनें यथार्थ भाषण करणें, हें सत्य; वेदाच्या पूर्वोत्तर भागाच

करणें, हें श्रुत; बाह्य व आभ्यंतर इन्द्रियांची शान्ति, हें शान्त; शास्त्रोक्त उपवासादिकांच्या योगानें शरीराचें कर्षण करणें ( शरीरास कृश करणें ), हा दम; शत्रूवरही न रागावणें, हा शम; धन असलें तरी त्यावरील स्वत्व काढून घेऊन त्याच्या जागीं परस्वत्व संपादन करणें, म्हणजे तें दुसऱ्याचें करणें, हें दान; अग्निहोत्रादि कर्म, हा यज्ञ; हें सर्व अर्वाचीन तप आहे ' हे मुमुक्षो, भूर्भुव.सुवरात्मकविराड्देहरूप यद्ब्रह्म अस्ति एतत् ब्रह्म उपास्य ' हे मुमुक्षो, भूरादिलोकत्रयात्मक विराड्देहरूप जें ब्रह्म आहे त्याची उपासना कर. ( म्हणजे मनात विजातीय प्रत्ययांनीं रहित असा सजातीय प्रत्ययाचा प्रवाह सुरू ठेव. ) ' एतत् तप ' अशा प्रकारचें उपासन हेंच तप आहे. (१०)

---

आतां विहितानुष्ठानरूप पुण्य हें एक ज्ञानाचें साधन आहे, या रूपानें त्याची प्रशंसा करितात व निषिद्धाचरणरूप पाप हें ज्ञानाला प्रतिबंध करणारें आहे, या रूपानें त्याची निंदा करितात—

यथा वृक्षस्य संपुष्पितस्य दूराद्गन्धो वात्येव पुण्यस्य कर्मणो दूराद्गन्धो वाति यथासिधारां कर्तेऽवहितामवक्रामे यद्युवे युवे हवा विहयिष्यामि कर्तं पतिष्यामीत्येवममृतादात्मानं जुगुप्सेत् ॥(११)

**अन्वयार्थ—**' यथा संपुष्पितस्य वृक्षस्य गन्धः दूरात् वाति एव पुण्यस्य कर्मणः गन्धः ( सत्कीर्तिः ) दूरात् वाति ' ज्याप्रमाणें उद्यानादिकांत असलेल्या चंपकादि फुललेल्या वृक्षाचा वास वायूबरोबर दूरवर पसरतो त्याप्रमाणें ज्योतिष्टोमादि पुण्यकर्मांची सत्कीर्ति सुगंधासारखा दूरवर जाते ( म्ह० मनुष्यलोकांतून स्वर्गांत जाते. वास्तव पुण्याचें आचरण करावें. आतां पापाविषयीं दृष्टान्त देतात—) ' यथा लोके कर्ते अवहितां असिधारां अवक्रामे ' ज्याप्रमाणें व्यवहारांत एखादा कांहीं कारणानें मी एकाद्या मोठ्या खळग्यावर लांकडाप्रमाणें आडव्या ठेवलेल्या तरवारीच्या धारेवरून चालेन, असा निश्चय करतो पण 'यत् हवा युवे युवे विहयिष्यामि कर्ते पतिष्यामि (एव चिन्तयति) ' पुढें चालण्याचा प्रसंग आला असतां ' जर मी या धारेवर जोरानें पाय टाकिला तर तो कापेल व तो तसा न टाकला तर खालीं गर्तेत पडेन, तात्पर्य कसेंही जरी केलें तरी मला या कर्मापासून दुःखच होईल,' असा मनांत विचार करून त्या कर्मापासून निवृत्त होतो 'तथा मुमुक्षुः अपि अमृतात् आत्मानं स्थिरीकृत्य पापात् जुगुप्सेत ' त्याप्रमाणें मुमुक्षूनेंही मोक्षप्राप्तीकरतां अन्तःकरणाला स्थिर करून पापापासून उपरत व्हावें. पापाची घृणा करावी. ( मी जर उघड उघड पापाचरण केलें तर लोक माझी निंदा करतील व गुप्तपणें केलें तर मला नरकयातना होतील. वास्तव मी प्रकट किंवा गुप्त पाप करणार नाहीं, असा निश्चय करून उपरत व्हावें. ११ )

---

अशी पुण्याची स्तुति व पापाची निंदा ऐकून जो पुण्याचरण करतो व पापाचरण सोडतो त्याचें चित्त शुद्ध होतें, आणि तशा शुद्धचित्त पुरुषाला तत्त्वाचा उपदेश करण्यासाठीं बाराव्या अनुवाकाचा आरंभ करितात—

अणोरणीयान्महतो महीयानात्मा गुहायां निहितोऽस्य जन्तोः ।
तमक्रतुं पश्यति वीतशोको धातुःप्रसादान्महिमानमीशम् ॥

**अन्वयार्थ**—'अणोः अणीयान्, महतः महीयान् आत्मा अस्य जन्तोः गुहायां निहितः-' (सच्चिदानन्दरस परमेश्वर सर्वांचें अधिष्ठान आहे. त्यामुळें तो सर्व जगाचें स्वरूपही आहे. त्यामुळें त्याला 'आत्मा' म्हणतात. कारण आत्मशब्द स्वरूपवाची आहे. असो; सर्व जगाचें स्वरूप असा) हा आत्मा या मायाकार्यभूत व्यवहारांत अतिशय सूक्ष्म म्हणून मानलेल्या परमाणूंहून अतिशय सूक्ष्म आहे. त्याचप्रमाणें व्यवहारांत आकाश, दिशा इत्यादिकांचें परिमाण सर्वांहून अधिक असल्यामुळें त्यांना महत्परिमाणवान् म्हणतात. पण हा आत्मा त्यांहूनही अधिक असल्यामुळें निरतिशय महत्परिमाणवान् आहे. तशा प्रकारचा हा परमात्मा या देवमनुष्यादिरूप जन्तूंच्या बुद्धिरूप गुहेंत राहिलेला आहे. (कारण आत्मज्ञानाच्या योगानें तो बुद्धींतच उपलब्ध होतो.) 'तं अक्रतुं महिमानं ईशं शमदमादिगुणयुक्तः पुरुषः धातुः प्रसादात् अधिकारी पश्यति-' त्या संकल्परहित व अतिमहान् परमेश्वराला शमदमादिगुणयुक्त पुरुष परमेश्वराच्या अनुग्रहानें अधिकारी होऊन साक्षात् जाणतो. 'च ईदृशं परमेश्वरं साक्षात्कृत्य वीतशोकः भवति-' आणि अशा प्रकारच्या परमेश्वरास साक्षात् जाणून जन्म-मरणादि शोकरहित होतो.

शुद्धचित्त पुरुषांना जाणण्यास योग्य असलेला तो परमात्मा जगाचें कारण आहे, असें शाखाचंद्रन्यायानें सांगतात—

सप्त प्राणाः प्रभवन्ति तस्मात्सप्तार्चिषः समिधः सप्त जिह्वाः ।
सप्त इमे लोका येषु चरन्ति प्राणा गुहाशयान्निहिताः सप्त सप्त ॥

**अन्वयार्थ**—'तस्मात् सप्त प्राणाः प्रभवन्ति-' त्या मायाशक्तिविशिष्ट परमात्म्यापासून सात प्राण (म्ह० दोन चक्षु, दोन श्रोत्र, दोन नासिका व एक मुख) उत्पन्न होतात. 'सप्त अर्चिषः, सप्त समिधः, सप्त जिह्वाः' त्या सात प्राणांची आपआपल्या विषयांना प्रकाशित करण्याची शक्ति याच सात अर्ची–ज्वाला आहेत. त्यांच्या योगानें ग्रहण केले जाणारे सात विषय याच सात समिधा आहेत. त्याचप्रमाणें काली, कराली, मनोजवा इत्यादि (मुंडकभाष्यार्थ पृ.३५) सात जिह्वा, तसेंच 'येषु प्राणाः चरन्ति ते इमे भूरादयः सप्त लोकाः प्रभवन्ति-' ज्यांत हे मनुष्य, देव इत्यादिकांच्या शरीरांत राहणारे प्राण संचार करितात ते हे भूरादि सात लोक, त्या परमात्म्यापासून होतात. 'गुहाशयात् सप्त सप्त निहिताः-' बुद्धिरूप गुहेंत उपलब्ध होणारा जो परमात्मा त्याच्यापासून सात कर्मे, सात समुद्र इत्यादि सर्व सप्तसंख्याविशिष्ट पदार्थ झाले.

अतः समुद्रा गिरयश्च सर्वेऽस्मात्स्यन्दन्ते सिन्धवः सर्वरूपाः ।
अतश्च विश्वा ओषधयो रसाश्च येनैष भूतस्तिष्ठत्यन्तरात्मा ॥

**अन्वयार्थ**—'सर्वे समुद्राः गिरयः च अतः उत्पन्नाः-' त्यांच्यापासून सर्व समुद्र व सर्व पर्वत उत्पन्न होतात. 'सर्वरूपाः सिन्धवः अस्मात् स्यन्दन्ते-' अनेक दिशांनी वाहणाऱ्या

नया त्याच्या योगानेंच वाहतात. 'अत रसात् विश्वा ओषधय' भवन्ति' विद्वानाच्या अनुभवास योग्य असलेल्या त्या रसग्राहक परमात्म्यापासून सर्व औषधी उत्पन्न झाल्या आहेत 'एष. अहमस्ययगम्य अन्तरात्मा येन ओषधिरसेन भूत. सन् तिष्ठति' हा अहं प्रत्ययगम्य अन्तरात्मा (म्ह॰ स्थूल देह व चिदात्मा यांच्या मध्यें असणारा लिंगदेह) ज्या ओषधिरसानें अधिष्ठित होऊन परमात्म्यापासून उत्पन्न होतो, त्याच्यापासून हें सर्व होतें.

ब्रह्मा देवानां पदवीः कवीनामृषिर्विप्राणां महिषो मृगाणाम् ।
श्येनो गृध्राणाऽस्वधितिर्वनानाऽसोमः पवित्रमत्येति रेभन् ॥

अन्वयार्थ—' परमेश्वरः देवानां मध्ये ब्रह्मा भूत्वा अवतिष्ठते ' परमेश्वर अग्नि, इंद्र इत्यादि देवामध्यें चतुर्मुख होऊन नियामकत्वानें राहतो, तसाच ' कवीनां मध्ये पदवीः ' तो काव्य-नाटकादि करणाऱ्या पुरुषांमध्यें शब्दसामर्थ्याभिज्ञ व्यास वाल्मीकिरूप (पदवी) होऊन राहतो 'विप्राणां ऋषि , मृगाणां महिष , गृध्राणां श्येन , वनानां स्वधितिः भवति ' तो वैदिक मार्गवर्ती ब्राह्मणांमध्यें गोत्रप्रवर्तक वसिष्ठादि ऋषिरूप झाला आहे, तो चतुष्पाद पशूमध्यें शक्तिमान् महिष, गृध्रापलक्षित पक्ष्यांमध्यें श्येन व वृक्षसमुदायरूप वनांत त्याला तोडणारा परशु झाला आहे. ' सोम. भूत्वा रेभन् सन् सर्वं पवित्रं अत्येति ' तो यागसाधनभूत सोमवल्ली होऊन व मन्त्रशब्दयुक्त होऊन गंगाजल, कुश, दर्भ इत्यादि दुसऱ्या सर्व पवित्र द्रव्यांचें उल्लंघन करतो.

व्यवहारदशेंत परमेश्वर चतुर्मुखादिकांच्या शरीरांत विशेषें करून राहतो, असें सांगून जगाच्या मूल कारणभूत मायाशक्तीच्या बलानें बद्धमुक्तव्यवस्था कशी लागते तें दाखवितात—

अजामेका लोहितशुक्लकृष्णां बह्वीं प्रजां जनयन्तीꣳसरूपाम् ।
अजो ह्येको जुषमाणोऽनुशेते जहात्येनां भुक्तभोगामजोऽन्यः ॥

अन्वयार्थ—' अजा एकां लोहितशुक्लकृष्णां बह्वीं सरूपां प्रजां जनयन्तीं अज एकः जुषमाण अनुशेते अन्यः अज भुक्तभोगां एनां जहाति ' अनादि असल्यामुळें उत्पन्न न होणारी, एक, लोहित शुक्ल कृष्णरूप, व आपल्या सारख्याच स्वरूपाची पुष्कळ प्रजा उत्पन्न करणारी जी मूळ प्रकृतिरूप माया, तिच्या अनुसार एक (आत्मक) जीव तिचें मोठ्या प्रेमानें सेवन करीत राहतो (विवेक न करतां केवळ विषयोपभोग घेणारा तो जन्म-मरणप्रवाहरूपानें संसार करतो ) पण दुसरा विरक्त जीव जिचा भोग घेतला आहे अशा त्या मायेचा त्याग करतो ( म्ह॰ तो विरक्तीच्या पूर्वीच भोग भोगतो, त्यानंतर नाहीं. )

जो पुरुष विवेकानें मायेचा त्याग करतो त्याला सर्व जगत् ब्रह्मरूपानें भासतें, असा अर्थ सांगतात—

हꣳसः शुचिषद्वसुरन्तरिक्षसद्धोता वेदिषदतिथिर्दुरोणसत् ।
नृषद्वरसदृतसद्व्योमसदब्जा गोजा ऋतजा अद्रिजा ऋतं बृहत् ॥

**अन्वयार्थ—**' हंसः-' जो सर्वदा गमन करतो तो हंस ह्म० आदित्य; ' शुचिषद्-' तो शुद्ध मंडलांत राहतो; ' वसुः-' वायु सूत्रात्मस्वरूपानें जगन्निवासाला कारण होतो; वास्तव तो वसु होय; ' अन्तरिक्षसत्-' तो अन्तरिक्षांत गमन करतो. ' होता-' होमनिष्पादक आहवनीयादि अग्नि हाच होता होय; ' वेदिषद्-' त्या रूपानें तो सोमयागाच्या अंगभूत वेदीमध्यें राहतो. ' अतिथिः-' अमावास्यादि विशेष तिथीची अपेक्षा न करितां भोजनाची याचना करण्यासाठीं ठिकठिकाणीं जाणारा जो विदेशी पुरुष तो अतिथि होय; ' दुरोणसद्-' तो अतिथिरूपानें दुसऱ्यान्या घरीं जातो. ' नृषद्-' मनुष्यामध्यें कर्माधिकारी जीवरूपानें जो जातो तो नृषद्; ' वरसत्-' काशी, द्वारवती इत्यादि श्रेष्ठ क्षेत्रांत पूज्यरूपानें जो जातो तो वरसत्, ' ऋतसत्-' ऋत म्हणजे सत्य, वैदिक कर्मामध्यें फलरूपानें जो जातो तो ऋतसत् 'व्योमसत्-' आकाशांत नक्षत्रादिरूपानें जो जातो तो व्योमसत्; ' अब्जाः-' जो नद्या, समुद्र इत्यादिकांतील जलांत शंखमकरादिरूपानें उत्पन्न होतो तो अब्जा; 'गोजाः ' गायींपासून क्षीरादिरूपानें जो उत्पन्न होतो तो गोजा ' ऋतजाः-' सत्यवचनापासून जो कीर्तिरूपानें होतो तो ऋतजा; ' अद्रिजाः-' पर्वतापासून वृक्षादिरूपानें जो उत्पन्न होतो तो अद्रिजा; ' एतत्सर्वं ऋतं बृहत्-' सारांश येथें हंसादिरूपानें सांगितलेलें जें हें जगत् आहे तें सर्व सत्य ब्रह्म आहे. ( ह्म० अज्ञानी लोकांच्या दृष्टीनें जगद्रूपानें भासणारें हें सर्व ज्ञानिदृष्ट्या ब्रह्मच आहे. )

या पुढील मंत्रांत ज्ञानसाधनभूत यागादि कर्मांच्या हेतुभूत अग्नीची आनुकूल्याविषयीं प्रार्थना करितात—

घृतं मिमिक्षिरे घृतमस्य योनिर्घृते श्रितो घृतमुवस्य धाम ।
अनुष्वधमावह मादयस्व स्वाहाकृतं वृषभ वक्षि हव्यम् ॥

**अन्वयार्थ—**' पूर्वे अग्नौ घृतं मिमिक्षिरे-' पूर्वींचे यजमान आहवनीयादिरूप अग्नीत घृताचा सेक करते झाले. ' घृतं अस्य योनिः-' तें घृत या अग्नीची योनि ह्म० उत्पत्तिकारण आहे. ( कारण घृताच्या सेकानें अग्नींत ज्वालांची उत्पत्ति झाल्याचें दिसतें. ) ' ततः अयं घृते श्रितः-' त्यामुळें हा अग्नि घृताचा आश्रय करून राहिला आहे. ' घृतं उ अस्य धाम-' घृतच या अग्नीचें स्थान आहे किंवा तेजाचें कारण आहे. ' हे अग्ने अनुष्वधं देवान् आवह-' हे अग्ने, स्वधेच्या मागून—आमच्या हवीचें स्वरूप ऐकून देवांना येथें आण आणि 'मादयस्व-' त्यांना येथें आणून अतिशय हृष्ट कर. 'हे वृषभ, स्वाहाकृतं हव्यं वक्षि-' हे श्रेष्ठा, स्वाहाकारानें आम्ही दिलेलें हव्य देवांना पोंचीव.

समुद्रादूर्मिर्मधुमाꣳ उदारदुपाꣳशुना सममृतत्वमानट् ।
घृतस्य नाम गुह्यं यदस्ति जिह्वा देवानाममृतस्य नाभिः ॥

**अन्वयार्थ—**' समुद्रात्-परमात्मनः ऊर्मिसदृशः मधुमान् प्रपंचः उदारत्-' समुद्रापासून ऊर्मीप्रमाणें परमात्म्यापासून हा भोग्यरूप असल्यामुळें माधुर्ययुक्त प्रपंच उत्पन्न झाला आहे. ( ज्याप्रमाणें लोकांत समुद्रापासून तरंग उत्पन्न होतो त्याप्रमाणें विदेकरस परमात्म्यापासून जड भोग्यजात उत्पन्न झालें. ) ' घृतस्य यन्नाम गुह्यं सर्ववेदेषु अस्ति

तेन उपांशुना अमृतत्वं समानट्.' घृतस्य ह्म० स्वप्रकाश ब्रह्माचें जें प्रणवरूप गुह्य नांव सर्व वेदांमध्यें आहे, तें ध्यानकालीं मनानत्या मनांत उच्चारल्यानें उत्पत्तिविनाशरहित ब्रह्मतत्त्वास योगल्या रीतीनें प्राप्त होतें. 'तच नाम देवानां जिह्वा (मुखे सर्वदा वर्तमानत्वात्)' तें प्रणवसंज्ञक नाम देवांची जिह्वा आहे. ह्म० जिह्वेप्रमाणें तें सर्वदा त्यांच्या मुखांत राहतें. 'किं च इदं नाम अमृतस्य नाभिः-' तसेंच हें प्रणवरूपनाम विनाशरहित मोक्षाची नाभि आहे. चक्राची नाभि जशी त्या चक्राचा सर्व आधार असते त्याप्रमाणें प्रणव मोक्षाचा सर्व आश्रय आहे. त्याच्या जपानेंच मुक्तिरूप फळ प्राप्त होतें.

वयं नाम प्रब्रवामा घृतेनास्मिन्यज्ञे धारयामा नमोभिः ।
उप ब्रह्मा शृणवच्छस्यमानं चतुःशृङ्गोऽवमीद्गौर एतत् ॥

**अन्वयार्थ**—'वयं ज्ञानार्थिनः पुरुषाः अस्मिन् ज्ञानयज्ञे घृतेन प्रणवरूपं नाम प्रब्रवाम-' आम्ही ज्ञानार्थी पुरुष या ज्ञानयज्ञांत स्वप्रकाश निमित्तभूत ब्रह्माच्या योगानें प्रणवरूप नाम सर्वदा उच्चारतों 'नमोभिः सर्वदा धारयामः-' आणि नमस्कारांनीं युक्त असलेले आम्ही आपल्या चित्तांत सर्वदा ब्रह्मतत्त्वाचें धारण करतों. 'शस्यमानं उपशृणवत् एतत् ब्रह्म चतुःशृङ्गः गौरः ऋषभः अवमीत्-' आह्मांकडून प्रणवाच्या योगानें स्तुति केल्या जाणाऱ्या व आमच्या समीप असलेल्या तत्त्ववेत्त्यांकडून ऐकल्या जाणाऱ्या या ब्रह्मतत्त्वाला अकार-उकार-मकार-नादरूप चार शृंगांनीं युक्त असलेला श्वेत–पांढरा प्रणवात्मक वृषभ ओकता झाला. (ह्म० उक्त प्रणव ब्रह्मतत्त्वाचें प्रतिपादन करतो.)

चत्वारि शृङ्गा त्रयो अस्य पादा द्वे शीर्षे सप्त हस्तासो अस्य ।
त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति महो देवो मर्त्याँ आविवेश ॥ (२)

**अन्वयार्थ**—'अस्य चत्वारि शृङ्गा-' ब्रह्म प्रणवप्रतिपाद्य असल्यामुळें प्रणवाचीं जीं आकारादि चार शृंगें तीं याचीच आहेत. 'त्रयः पादाः-' त्याचप्रमाणें त्या ब्रह्माचे विश्व तैजस प्राज्ञ हे तीन अध्यात्म व विराट्-हिरण्यगर्भ-अव्याकृत हे तीन अधिदैव पाद आहेत (ज्यांच्या योगानें ब्रह्मत्व.स प्राप्त होतां येतें ते पाद.) 'द्वे शीर्षे अस्य-' चिदचिद्रूप दोन शक्ति हींच दोन मस्तकें आहेत. 'सप्त हस्तासः-' त्याचप्रमाणें या ब्रह्माचे भुरादि सात लोक हेच जणुं काय सात हात आहेत 'त्रिधा बद्धः वृषभः महः रोरवीति-'अकार उकार-मकारांमध्यें विश्व-तैजस-प्राज्ञ व विराट्-हिरण्यगर्भ-अव्याकृत या तीन प्रकारें संबद्ध असलेला प्रणवरूप वृषभ तेजोरूप ब्रह्मतत्त्वाचें अतिशय प्रतिपादन करतो. (आतां तें प्रतिपाद्यतत्त्व स्पष्ट करतात–) 'देवः मर्त्यान् आविवेश-' परमेश्वर मनुष्यदेहामध्यें सर्वतः प्रविष्ट झालेला आहे.

त्रिधा हितं पाणिभिर्गुह्यमानं गवि देवासो घृतमन्वविन्दन् ।
इन्द्र एकं सूर्य एकं जजान वेनादेकं स्वधया निष्टतक्षुः ॥

**अन्वयार्थ**—'त्रिधा हितं पाणिभिः गुह्यमानं घृत देवासः गवि अन्वविन्दन्-' शरीरांत विश्व-तैजस-प्राज्ञसंज्ञक तीन प्रकारांनीं व ब्रह्मांडांत विराडादि तीन प्रकारांनीं असलेलें व स्मृति आणि उपदेश करणाऱ्या आचार्यांकडून परम रहस्य म्हणून गुप्त ठेविलें

जाणारें जें स्वप्रकाश ब्रह्मतत्त्व त्याला देवांसारखे सात्त्विक अंतर्मुख पुरुष तत्त्वमस्यादि वेदरूप वाणींत अनुक्रमानें प्राप्त झाले ( म्ह० दुर्वांना तें महावाक्यांत सांपडलें ) ' इन्द्रः एक अजान ' परम ऐश्वर्ययुक्त विराट् पुरुष एका जागरणरूपाला उत्पन्न करता झाला. ' सूर्य एक अजान हिरण्यगर्भ स्वप्नरूपाला उत्पन्न करता झाला ' वेनात् एकं ' सर्व दु खादित व त्यामुळेंच रमणाय अशा अव्याकृतापासून एक सुषुप्तरूप निष्पन्न झालें ' स्वधया निष्टतक्षु ' स्वत च्याच आधारानें राहणारी म स्वरूप चित् हेंच स्वधा आहे तिच्या योगानें वर सांगितलेले इंद्र, सूर्य व वेन या नांवाचे विराट्, हिरण्यगर्भ व अव्याकृत जागरित, स्वप्न व सुषुप्त यांस निरुपम करिते झाले

यो देवानां प्रथमं पुरस्ताद्विश्वाधियो रुद्रो महर्षि । हिरण्यगर्भं पश्यत जायमानꣳस नो देवः शुभया स्मृत्या संयुनक्तु ॥

अन्वयार्थ—' य विश्वाधिप', रुद्र', महर्षि देवानां प्रथम पुरस्तात् जायमानं हिरण्यगर्भं पश्यत ( पश्यति ) ' जो जगाचें कारण असल्यामुळें त्याहून अधिक असलेला, वैदिक शब्दाला प्राप्त होणारा ( म्ह० वेदप्रतिपाद्य, ) व अतीन्द्रिय वस्तूना जाणणाऱ्या ऋषींतील श्रेष्ठ देव इंद्रादि देवांच्या आरंभीं असलेल्या व इंद्रादिकांच्या पूर्वी उत्पन्न झालेल्या हिरण्यगर्भाला साक्षात् पाहतो ' स देव न शुभया स्मृत्या संयुनक्तु ' तो परमेश्वर आम्हांला शुभ स्मृतीनें म्ह० सर्व संसारनिवर्तक सुंदर ब्रह्मतत्त्वानुस्मरणानें संयुक्त करो ( ब्रह्मविद्येच्या प्राप्तीकरितां या मंत्राचा जप करावा )

आतां स्मरणीय तत्त्वाचा निर्देश करतात—

यस्मात्परं नापरमस्ति किंचिद्यस्मान्नाणीयो न ज्यायोऽस्ति कश्चित् ।
वृक्ष इव स्तब्धो दिवि तिष्ठत्येकस्तेनेदं पूर्णं पुरुषेण सर्वम् ॥

अन्वयार्थ—' यस्मात् परं च अपरं अपि किंचित् वस्तु नास्ति ' ज्या ब्रह्मतत्त्वाहून उत्कृष्ट किंवा निकृष्ट कांहीं नाहीं, ' यस्मात् किंचिदपि अणीय वस्तु नास्ति ' ज्या तत्त्वाहून अत्यल्प वस्तुही नाहीं, ' तथा ज्याय आप किंचित् नास्ति व दुसरी अधिक वस्तूही नाहीं, ( या मंत्रांतील ' पर ' व ' अपर ' या शब्दांनीं गणांचा उत्कर्ष व निकर्ष आणि ' अणीय ' व ' ज्याय ' या शब्दांनीं परिमाणाचा उत्कर्ष व अपकर्ष, विवक्षित आहे ) ' वृक्ष इव एक स्तब्ध दिवि तिष्ठति ' ज्याप्रमाणें व्यवहारांत वृक्ष गमन व आगमन यांनीं रहित होऊन एकाच जागीं स्तब्ध स्थिर राहतो त्याप्रमाणें हा एक परमेश्वर निर्विकार होऊन स्वप्रकाशस्वरूपानें राहतो ' तेन पुरुषेण इदं सर्वं पूर्णम् ' त्या पूर्ण विवेक रस परमात्म्याच्या योगानें हें सर्व जगत् पूर्ण आहे ( म्ह० हा जगाचा आकार नाहीं तर हें केवळ ब्रह्मतत्त्वच आहे )

त्या पूर्वोक्त ब्रह्मतत्त्वस्मरणाचें सर्वत्यागरूप अंतरंग साधन या मंत्रांत सांगितलें आहे.

न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशु ।
परेण नाकं निहितं गुहायां विभ्राजदेतद्यतयो विशन्ति ॥

**अन्वयार्थ**—'न कर्मणा तदमृतत्वं लभ्यते-' वेदांत अग्निहोत्रापासून सहस्र संवत्सरसत्रान्त जें कर्म सांगितलें आहे त्या कर्माच्या योगानें अमृतत्व प्राप्त होत नाहीं. 'न प्रजया-' पितृ ऋणांतून सोडविण्यास कारण होणारी जी पुत्ररूप प्रजा तिच्या योगानेंही अमृतत्व प्राप्त होत नाहीं. 'न च धनेन-' धनदान अनेक प्रकारच्या फलाचें साधन आहे, असें 'दाने सर्वं प्रतिष्ठितं, तस्माद्दानं परमं वदन्ति' ही श्रुति सांगते व त्या दानाचें साधन धन आहे. पण त्या धनानेंही अमृतत्व प्राप्त होत नाहीं. 'किंतु तेषां त्यागेन एके अमृतत्वं आनशुः-' तर कर्म, प्रजा, धन इत्यादि सर्व लौकिक व वैदिक व्यवहारांचा त्याग केल्यानें कांहीं थोड्याशा अन्तर्मुख पुरुषांनाच अमृतत्व प्राप्त होतें. 'यत् एतत् यतयः विशन्ति तत् अमृतत्वं नाकं परेण सत् गुहायां निहितं विभ्राजते-' ज्या अमृतत्वांत यती प्रवेश करितात तें अमृतत्व स्वर्गाहूनही उत्कृष्ट असून आपल्या एकाग्र बुद्धींतच अवस्थित आहे, असा अन्तर्मुख अधिकारी अनुभव घेतात.

वरील ऋचेंत त्याग हें मोक्षाचें साधन सांगितलें आहे; पण दुसऱ्या श्रुति-स्मृतिवचनांत ज्ञानच मोक्षाचें साधन आहे, असें म्हटलें आहे. तेव्हां त्याचा विरोध घालविण्यासाठीं ज्ञान व संन्यास यांचा मोक्षाशीं कसा पृथक् संबंध आहे तें दाखवितात—

वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः ।
ते ब्रह्मलोके तु परान्तकाले परामृतात्परिमुच्यन्ति सर्वे ॥

**अन्वयार्थ**—'ये वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः संन्यासयोगात् शुद्धसत्त्वाः यतयः' वेदान्त वाक्यावरून उत्पन्न झालेलें जें विशिष्ट ज्ञान त्याच्या योगानें ज्यांनीं जीवब्रह्मैक्यलक्षण अर्थ निश्चित केला आहे ते वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थ पुरुष होत. संन्यासपूर्वक केलेला जो योग तो संन्यासयोग. (संन्यास म्ह० पूर्वोक्त कर्म, प्रजा व धन, यांचा त्याग आणि योग म्हणजे चित्तवृत्तिनिरोध.) त्याच्यायोगानें ज्यांचें चित्त शुद्ध झालें आहे व त्यामुळेंच जे यती (म्ह० नियमशील) आहेत 'ते सर्वे तु ब्रह्मलोके सति परान्तकाले परामृतात् परिमुच्यन्ति-' ते संसारी पुरुषांहून निराळ्या प्रकारचे असलेले सर्व ब्रह्माचा साक्षात्कार झाला असतां परान्तकाळीं (म्ह० आत्मसाक्षात्कारानंतर एकदाच होणारा जो शेवटचा देहपात-अन्त-त्या वेळीं) अव्याकृतापासूनही मुक्त होतात. (अज्ञानदशेंतील मरण हा अपर अन्तकाळ आहे. कारण त्या मरणानंतरही अज्ञानी पुनः देहधारण करतो. पण ज्ञानानंतर येणारें जें शेवटचें मरण त्यानंतर पुनरपि देहग्रहण करण्याचा प्रसंग येत नाहीं. म्हणून तो परान्त काळ आहे. त्या वेळीं ज्ञानी संसारबंधापासून मुक्त होतो. अज्ञानी सुद्धां मरणसमयीं स्थूल व सूक्ष्म अशा दोन्ही शरीरांपासून मुक्त होतो, हें खरें; पण अज्ञानी तत्त्वज्ञानाभावामुळें नाश न पावणाऱ्या अव्याकृतापासून मुक्त होत नाहीं आणि तत्त्वज्ञ अव्याकृतापासूनही मुक्त होतो.)

तत्त्व जाणण्यास असमर्थ असलेल्या पुरुषाला सूक्ष्म उपाय सांगतात—

दह्रं विपापं परवेश्मभूतं यत्पुण्डरीकं पुरमध्यसंस्थम् ।
तत्रापि दह्रं गगनं विशोकस्तस्मिन्यदन्तस्तदुपासितव्यम् ॥

**अन्वयार्थ**—'पुरमध्यसंस्थं दह्र विपापं परमेश्मभूतं यत्पुण्डरीकं-' राजधानींतील राजप्रासादासारखें जें हें अल्प, शारिरदोषांनीं दूषित न होणारें व परमात्म्याचें गृहरूप अष्टदल कमल आहे, व 'तत्रापि यत् दह्र विशोकः गगन तस्मिन् अन्तः यत् महत्तत्वं अस्ति तदुपासितव्यम्-' त्या अत्यल्प पुरांतही जें अतिशय अल्प शोकरहित गगनाख्य ब्रह्म आहे त्या कमलांतील महत्तत्वाची ( सतत–अविच्छिन्न ) उपासना करावी.

यो वेदादौ स्वरः प्रोक्तो वेदान्ते च प्रतिष्ठितः ।
तस्य प्रकृतिलीनस्य यः परः स महेश्वरः ॥ ( १२ )

**अन्वयार्थ**—'वेदादौ यः स्वरः प्रोक्तः वेदान्ते च प्रतिष्ठितः-' 'अग्निमीळे०,' 'इषे त्वोर्जे त्वा०' इत्यादि वेदाच्या आरंभीं जो स्वर असतो व जो उपनिषदांतही प्रतिपादिलेला आहे तो प्रणव ध्यानकालीं अव्याकृतसंज्ञक जगत्कारणांत लीन होतो. ( 'म्हणजे त्याचा अकार, उकार व मकार या तीन मात्रांचे ठिकाणीं क्रमानें विराट्, हिरण्यगर्भ व अव्याकृत यांचें ध्यान करून विराड्रूप अकाराचा उकारांत लय करून म्हणजे अकार उकाररूप आहे, असें समजून त्या हिरण्यगर्भरूप उकाराला मूळ प्रकृतिरूप मकारांत लीन करून, याप्रमाणें )' तस्य प्रकृतिलीनस्य यः परः सः महेश्वरः ज्ञेयः-' त्या प्रकृतींत लीन झालेल्या प्रणवाचा जो पर म्हणजे नादामध्यें चतुर्थ मात्रारूपानें ध्यान करण्यास योग्य असा उत्कृष्ट आत्मा आहे तो हा परमेश्वर, असें समजावें. ( या मंत्रांत पूर्वोक्त गगनाख्य वस्तूचा विस्तार केला आहे ). ११

---

मागल्या अनुवाकाच्या शेवटीं हृदयकमलांत उपासना करावयास योग्य असें जें महेश्वराचें रूप दाखविलें त्या उपास्यांतील विशेष गुण या अनुवाकांत विस्तारानें दाखवितात—

सहस्रशीर्षं देवं विश्वाक्षं विश्वशंभुवम् ।
विश्वं नारायणं देवमक्षरं परमं पदम् ॥

**अन्वयार्थ**—'सहस्रशीर्षं विश्वाक्षं विश्वशंभुवं विश्वं नारायणं देवं अक्षरं परमं पदं देवं ध्यायेत्-' अनंत शिरांनीं युक्त असलेला, ( सर्व जगदात्मक विराड्रूप, हाच महेश्वराचा देह आहे. वास्तव आम्हां जीवांचीं शिरें हीं त्याचींच शिरें आहेत, त्यामुळें तो महेश्वर अनंत शिरांनीं युक्त आहे. त्याच न्यायानें ) सर्व नेत्रांनीं युक्त असलेला, सर्व जगाचें सुख ज्याच्यापासून होतें तो विश्वशंभु, जगदात्मक, नारायण ( जगत्कारणभूत पंचभूतांमध्यें राहिलेला ), स्वप्रकाश, अक्षर, सर्वांचें कारण असल्यामुळें श्रेष्ठ व ज्ञान्यांकडून प्राप्त करून घेतलें जाणारें असें जें ब्रह्म–महेश्वर त्याचें ध्यान करावें.

विश्वतः परमान्नित्यं विश्वं नारायणꣳहरिम् ।
विश्वमेवेदं पुरुषस्तद्विश्वमुपजीवति ॥

**अन्वयार्थ**—'विश्वतः परमात् नित्यं विश्वं, नारायणं, हरिं, इदं विश्वं पुरुषः एव इति ध्यातव्यं-' सर्व जड वर्गाहून तो परमात्मा उत्कृष्ट, विनाशरहित असल्यामुळें नित्य, सर्वा-

त्मक असल्यामुळें विश्व, जगत्कारणांत स्थित असल्यामुळें नारायण आणि पाप व अज्ञान यांचें हरण करणारा असल्यामुळें हरि आहे, तसेंच अज्ञदृष्ट्या दिसणारें हें सर्व तत्त्वदृष्ट्या परमात्माच आहे, असें ध्यान करावें. 'सः पुरुषः तत् विश्वं उपजीवति-' तो परमात्मा त्या विश्वावर उपजीविका करतो. (म्हणजे स्वतःच्या व्यवहाराचा निर्वाह व्हावा म्हणून त्याचा आश्रय करतो.)

पतिं विश्वस्यात्मेश्वरꣳ शाश्वतꣳ शिवमच्युतम् ।
नारायणं महाज्ञेयं विश्वात्मानं परायणम् ॥

अन्वयार्थ—'विश्वस्य पतिं, आत्मेश्वरं, शाश्वतं, शिवं, अच्युतं, नारायणं, महाज्ञेयं, विश्वात्मानं, परायणं ध्यायेत्-' जगाचा पालक असल्यामुळें पति, आत्म्यांचा ह्म॰ जीवांचा नियामक असल्यामुळें ईश्वर, निरन्तर असल्यामुळें शाश्वत, परम मंगल असल्यामुळें शिव, चित्स्वभाव पासून च्युत होत नसल्यामुळें अच्युत, नारायण, ज्ञेय तत्त्वांमध्यें श्रेष्ठ असल्यामुळें महाज्ञेय, जगाचें उपादान व त्यामुळेंच जगाहून अभिन्न असल्यामुळें विश्वात्मा, व उत्कृष्ट असल्यामुळें परायण, अशा ईश्वराचें ध्यान करावें.

नारायण परो ज्योतिरात्मा नारायणः परः ।
नारायण परं ब्रह्म तत्त्वं नारायणः परः ॥
नारायण परो ध्याता ध्यानं नारायणः परः ॥

अन्वयार्थ—'नारायणः परः, ज्योतिः-' पुराणांत नारायण या शब्दानें बोलला जाणारा जो परमेश्वर तेंच सत्य-ज्ञानादि वाक्यप्रतिपादित पर तत्त्व आहे. (नारायणच परमात्मा आहे.) तीच सर्वोत्कृष्ट ज्योति आहे. 'नारायणः परः आत्मा-' म्हणूनच नारायण परमात्मा आहे. 'नारायणः परं ब्रह्मतत्त्वं-' नारायण परब्रह्मतत्त्व आहे. 'नारायणः परः-' नारायणच सर्वोत्कृष्ट आहे. 'नारायणः परः ध्याता, ध्यानं च परः-' तोच ध्याता (वेदान्ताचा अधिकारी), ध्यान (प्रत्यगात्मविषयक वृत्तिविशेष) व पाप्यांचा शत्रु आहे. 'एवंविधः नारायणः ध्येयः-' अशा नारायणाचें ध्यान करावें.

यच्च किंचिज्जगत्सर्वं दृश्यते श्रूयतेऽपि वा ।
अन्तर्बहिश्च तत्सर्वं व्याप्य नारायणः स्थितः ॥

अन्वयार्थ—'यत् किंचित् सर्वं जगत् दृश्यते अपि वा श्रूयते तत् सर्वं वस्तुजातं अयं नारायणः अन्तर्बहिः च व्याप्य स्थितः-' या वर्तमान जगांत जें कांहीं समीपवर्ती वस्तुजात दिसत आहे; अथवा दूर असलेलें जें वस्तुजात ऐकूं येत आहे त्या सर्वांला नारायण आंतून व बाहेरून व्यापून राहिला आहे. (ज्याप्रमाणें मुकुट, कडें इत्यादि आभरणांचें उपादानकारण-सुवर्ण-त्यांना आंतून व बाहेरून व्यापून राहतें, त्याप्रमाणें नारायण सर्वांला व्यापून राहतो)

अनन्तमव्ययं कविꣳ समुद्रेऽन्तं विश्वशंभुवम् ।
पद्मकोशप्रतीकाशꣳ हृदयं चाप्यधोमुखम् ॥

अधोनिष्ट्या वितस्त्यान्ते नाभ्यामुपरि तिष्ठति ।
ज्वालामालाकुलं भाती विश्वस्यायतनं महत् ॥

**अन्वयार्थ**—' अनन्त, अव्यय, कविं, समुद्रे अन्त, विश्वशंभुव नारायण उपासीत-' नारायणाचें स्वरूप देशपरिच्छेदशून्य, विनाशरहित, चिद्रूपानें सर्वज्ञ, समुद्रासारख्या अफाट संसाराचें अवसानरूप कारण ( पुरुष जेव्हां नारायणाचें स्वरूप जाणतो तेव्हांच त्याच्या संसाराचा क्षय होतो ), व तें नारायणस्वरूप संसाराच्या उत्पत्तीचें कारण आहे. अशा नारायणाचें ध्यान करावें. ( आतां याच श्लोकाच्या उत्तरार्धांत उपासनेचें स्थान सांगतात-) ' पद्मकोशप्रतीकाशं अपि च अधोमुख हृदय निष्ट्या अधः नाभ्यां उपरि वितस्त्यान्ते तिष्ठति ' ज्याप्रमाणें अष्टदलकमलाचें मध्याछिद्र असतें त्यासारखें अधोमुख हृदय आहे. तें गळ्याच्या खालीं व नाभीच्या वर एक वीत अंतरावर असतें. ' तत्र विश्वस्य आयतन ज्वालामालाकुल महत् भाती ( भाति )-' त्यांत तें ब्रह्मांडाचें आधारभूत व प्रकाशाच्या परंपरेनें युक्त असें परब्रह्म भासतें. ( वास्तव तें संसाराचें अवसानरूप आहे )

संततꣳ शिलाभिस्तु लम्बत्याकोशसन्निभम् ।
तस्यान्ते सुषिरꣳ सूक्ष्मं तस्मिन्त्सर्वं प्रतिष्ठितम् ॥

**अन्वयार्थ**—' आकोशसन्निभ हृदयकमल लम्बति ' कमळाच्या कळ्याप्रमाणें तें हृदयकमल शरीरांत अधोमुख लोंबतें. ' तस्य शिलाभि ( शिराभिः ) संतत ' तें सभोंवार नाड्यांनीं व्यापलेलें आहे. ' तस्य अन्ते सूक्ष्म सुषिरं अस्ति-' त्या हृदयाजवळ सूक्ष्म छिद्र ( सुषुम्ना नाडीचें नाळ ) आहे ' तस्मिन् सर्व प्रतिष्ठितम् ' त्यांत हें सर्व जगत् राहिलें आहे.

तस्य मध्ये महानग्निर्विश्वार्चिर्विश्वतोमुखः ।
सोऽग्रभुग्विभजन्तिष्ठन्नाहारमजरः कविः ।
तिर्यगूर्ध्वमधःशायी रश्मयस्तस्य संतताः ॥

**अन्वयार्थ**—' तस्य मध्ये विश्वार्चि विश्वतोमुख महानग्नि ' त्या सुषुम्नानाळाच्या मध्यमार्गी अनेक ज्वालांनीं युक्त व अनेक मुखांनीं संपन्न असलेला महान् अग्नि राहतो. ' स. अग्रभुक् अजरः कवि. आहार विभजन् तिष्ठन् ' आपल्या अग्रभागीं आलेलें अन्न खाणारा, अन्नाला जिरविणारा पण स्वत जीर्ण न होणारा व त्यामुळें कुशल असा तो वैश्वानर खाल्लेल्या आहाराचा शरीरांतील सर्व अवयवांमध्यें विभाग करीत ( अन्नरसाला शरीरभर वाटून देत ) राहतो ' तस्य तिर्यगूर्ध्वमधःशायी रश्मय संतता -' त्या अग्नीचे खालीं, वर व तिरकस पसरणारे किरण सर्वत्र व्यापलेले असतात.

संतापयति स्व देहमापादतलमस्तग' ।
तस्य मध्ये वह्निशिखा अणीयोर्ध्वा व्यवस्थितः ॥
नीलतोयदमध्यस्थाद्विद्युल्लेखेव भास्वरा ।
नीवारशूकवत्तन्वी पीता भास्वत्यणूपमा ॥

तस्याः शिखाया मध्ये परमात्मा व्यवस्थितः ।
स ब्रह्मा स शिवः स हरिः सेन्द्रः सोऽक्षरः परमः स्वराट्॥ १२

अन्वयार्थ—'आपादतलमस्तकः स्वं देहं संतापयति-' पायांच्या तळापासून मस्तका-पर्यंत राहून तो आपल्या देहाला सर्वदा संतप्त करतो. ( तो संतापच अग्नीच्या अस्तित्वाचें चिन्ह आहे. ) 'तस्य मध्ये वन्हिशिखा अणीया ऊर्ध्वा च व्यवस्थितः (व्यवस्थिता)-' आपल्या विशेष प्रकारच्या ज्वालांनीं सकल देहाला व्यापणाऱ्या त्या अग्नीच्या मध्यें एक अग्नीची ज्वाला आहे ती अत्यन्त सूक्ष्म असून सुषुम्ना नाडीच्या द्वारा वर ब्रह्मरन्ध्रा-पर्यंत पसरून राहिली आहे. 'नीलतोयदमध्यस्थात् विद्युल्लेखा इव भास्वरा नीवारशूकवत् तन्वी पीता भास्वती अणूपमा-' जलानें भरल्यामुळें नीलवर्ण दिसणाऱ्या मेघांच्या मध्यें असलेल्या विद्युल्लेखेप्रमाणें ती अग्निशिखा प्रभायुक्त, सांव्याच्या कुसवासारखी सूक्ष्म ( पातळ ), बाहेरून पिवळी दिसणारी व दीप्तियुक्त असते. तिला लौकिक अणूंचीच उपमा देतां येणें शक्य आहे. 'तस्याः शिखायाः मध्ये परमात्मा व्यवस्थितः' त्या अग्निशिखेच्या मध्यें जगत्कारणभूत परमात्मा विशेषतः अवस्थित आहे. ( त्याच्या उपासनेचें स्थान जरी असें अल्प असलें तरी तो स्वतः अल्प नाहीं.तर सर्व देवात्मक आहे, असें सांगतात-) 'सः ब्रह्मा, सः शिवः, सः हरिः, सः इन्द्रः, सः अक्षरः, परमः स्वराट्-' तोच ब्रह्मदेव, तोच गौरीपति, तोच हरि, तो इंद्र, तोच अक्षरसंज्ञक मायाविशिष्ट अन्तर्यामी, तोच परम म्ह० मायारहित शुद्ध चिद्रूप व त्यामुळेंच म्ह० पारतंत्र्याच्या अभावीं तोच स्वराट् म्ह० स्वयं राजा आहे. ( सारांश, त्या सहस्रशीर्षादि पुरुषाचें वर सांगितल्याप्रमाणें ध्यान करावें ) १२.

---

आतां आदित्यमंडलांत परब्रह्माची उपासना सांगतात— .

आदित्यो वा एष एतन्मण्डलं तपति तत्र ता ऋचस्तदृचां मण्डलꣳ स ऋचां लोकोऽथ य एष एतस्मिन्मण्डलेऽर्चिर्दीप्यते तानि सामानि स साम्नां लोकोऽथ य एष एतस्मिन्मण्डलेऽर्चिषि पुरुषस्तानि यजूꣳषि स यजुषां मण्डलꣳ स यजुषां लोकः सैषा त्रय्येव विद्या तपति य एषोऽन्तरादित्ये हिरण्मयः पुरुषः ॥ ( १४ )

अन्वयार्थ—'यः परमेश्वरः पूर्वानुवाके अभिहितः सः एषः आदित्यः वै-' ज्याच्या अनुवाकांत नारायणनांवाचा जो परमेश्वर सांगितला तो हा आदित्य आहे. कारण तो सोपाधिक होऊन आदित्यरूपानें प्रकाशमान होत राहतो. 'तस्य एतत् मण्डलं तपति-' त्या आदित्याचें हें जें आम्हांला दिसणारें वर्तुल उष्ण मण्डळ तें तापतें ( संताप करतें. ) 'तत्र ताः ऋचः वर्तन्ते-' त्यांत 'अग्निमीळे' इत्यादि अध्यापकांना माहीत असलेल्या ऋचा आहेत. 'तत् मण्डलं ऋचां निष्पादितं-' त्यामुळें तें मंडल ऋचेच्या योगानें निष्पन्न केलेलें आहे. 'सः ऋचां लोकः-' ऋचांच्या योगानें निष्पन्न केलेला तो भाग, हाच ऋग-भिमानी देवतांचा लोक आहे. ( निवासस्थान आहे. याप्रमाणें मंडल ऋग्रूप आहे, असें

ध्यान करून नंतर तें सामात्मक आहे, असें ध्यान करावें म्हणजे ) 'अथ एतस्मिन् मण्डले यः एषः अर्चिः दीप्यते तानि अर्चिःस्वरूपाणि बृहद्रथंतरादिसामानि·' नंतर या मंडलांत जी ही अर्चि–ज्वाला दीप्त झालेली दिसते ( म्ह० प्रकाशमान तेज दिसतें ) तीं अर्चिःस्वरूपेंच बृहद्रथंतरादि सामें आहेत, असें ध्यान करावें. 'सः आर्चिर्भागः साम्नां लोकः·' तो अर्चिभाग सामाभिमानी देवांचा लोक आहे. असें सामध्यान केल्यावर तें मंडल यजुरात्मक आहे, असें समजावें. 'अथ यः एषः शास्त्रे प्रसिद्धः एतस्मिन् दृश्यमाने मण्डले तद्रूपे अर्चिषि च पुरुषः वर्तते तानि देवतारूपाणि यजूंषि ध्यायेत्·' जो हा शास्त्रांत प्रसिद्ध असलेला व या प्रत्यक्ष दिसणाऱ्या मंडलांत देवतारूप राहणारा पुरुष आहे तींच देवतारूप यजुर्वे आहेत. 'सः यजुरात्मकः पुरुषः यजुषा निष्पादितं मण्डलं इति ध्येयः-' तो यजुरात्मक पुरुषच यजूंच्या योगानें संपादन केलेलें मंडल आहे, असें चिन्तन करावें. 'सः यजुषां लोकः' तो यजुर्भाग यजुरभिमानी देवतांचा लोक आहे. 'सा एषा त्रयी एव विद्या तपति-' मण्डल, त्याची अर्चि व त्यांतील पुरुष ही त्रयीच ऋक्, यजु व सामरूप आहे; व तीच विद्या प्रकाशमान होते. 'यः पुरुषः अत्र अभिहितः सः एषः अन्तरादित्ये हिरण्मयः विद्यते·' जो पुरुष येथें सांगितला आहे, तोच आदित्यमंडलामध्यें हिरण्मय आहे. १४

---

आतां त्या पूर्वोक्त आदित्याचाच सर्वात्मकरूप अवशिष्ट गुण दाखवितात–

आदित्यो वै तेज ओजो बलं यशश्चक्षुः श्रोत्रमात्मा मनो मन्युर्मनुर्मृत्युः सत्यो मित्रो वायुराकाशः प्राणो लोकपालः कः किं कं तत्सत्यमन्नममृतो जीवो विश्वः कतमः स्वयंभु ब्रह्मैतदमृत एष पुरुष एष भूतानामधिपतिर्ब्रह्मणः सायुज्यꣳ सलोकतामाप्नोत्येतासामेव देवतानाꣳ सायुज्यꣳ सार्ष्टिताꣳ समानलोकतामाप्नोति य एवं वेदेत्युपनिषत् ॥ ( १५ )

**अन्वयार्थ**—'यः अयं आदित्यः सः एव सर्वात्मकत्वात् तेजः, ओजः, इत्यादि·' जो हा उपासना करण्यास योग्य म्हणून सांगितलेला आदित्य तोच सर्वात्मक असल्यामुळें तेज ( दीप्ति ), ओज ( बलाचें कारण ), बल ( शरीरशक्ति ), यश, चक्षु व श्रोत्रेन्द्रिय, देह, मन, कोप, वैवस्वतादि मनु, यम, सत्य व मित्र या नांवाचे देव, वायु व आकाश, पंचवृत्ति प्राण, इन्द्रादि लोकपाल, प्रजापति, अनिर्वचनीय वस्तु, सुख, परोक्ष वस्तु, यथार्थ भाषण, अन्न, देवसमुदाय किंवा मोक्षरूप अमृत, समस्त जीवकोटि, सर्व जगत्, अत्यन्त सुख व उत्पत्त्यादिरहित ब्रह्म आहे. 'एषः पुरुषः, एषः भूतानां अधिपतिः·'तसेंच हा नित्य आदित्य पूर्ण असल्यामुळें पुरुष व सर्व भूतांचा अधिपति आहे. ( आतां हें जाणणाऱ्या पुरुषाला कोणतें फळ मिळतें तें सांगतात– ) 'यः एवं वेद सः ब्रह्मणः सायुज्यं, सलोकतां प्राप्नोति-' जो उपासक अशा रीतीनें आदित्याची उपासना करितो तो ब्रह्माच्या सायुज्यादिकांस प्राप्त होतो. ( समष्टिरूप हिरण्यगर्भाची उपासना व त्याच्या अवयवभूत देवतांची उपासना, अशी दोन प्रकारची उपासना आहे. त्यांतील हिरण्यग-

र्भांच्या उपासनेनें भावना दृढ झाली असतां उपासक हिरण्यगर्भांच्या सायुज्यास म्ह० तादात्म्यास प्राप्त होतो. पण भावना दृढ न होतां मंद राहिल्यास ) हिरण्यगर्भांच्या सलोकतेला म्ह० त्याच्याच लोकांतील निवासाला प्राप्त होतो. 'एतासां एव देवतानां सायुज्यं, सार्ष्टितां समानलोकतां च आप्नोति इति उपनिषद्-' आतां, अंगभूत देवतांची उपासना करून भावना दृढ झाल्यास उपासक इन्द्रादि देवतांच्या सायुज्याला प्राप्त होतो; भावना मध्यम असल्यास सार्ष्टितेस म्ह० समान ऐश्वर्यास प्राप्त होतो आणि तीच मंद राहिल्यास समानलोकतेस प्राप्त होतो. याप्रमाणें पूर्वोक्त अनुवाकांनीं सांगितलेली ही रहस्यविद्या समाप्त झाली. ( १५ ).

---

आतां यापुढें नूतन शिवालयादि करून त्यांत लिंगाची प्रतिष्ठापना करावयाचे वेळीं किंवा प्रत्यहीं पार्थिव लिंगाची प्रतिष्ठापना करावयाचे वेळीं ज्यांचा विनियोग केलेला आहे ते, किंवा नुसता जप केल्यानेंही पापक्षयाला कारण होणारे मंत्र सांगतात—

निधनपतये नमः । निधनपतान्तिकाय नमः । ऊर्ध्वाय नमः । ऊर्ध्वलिङ्गाय नमः । हिरण्याय नमः । हिरण्यलिङ्गाय नमः । सुवर्णाय नमः । सुवर्णलिङ्गाय नमः । दिव्याय नमः । दिव्यलिङ्गाय नमः । भवाय नमः । भवलिङ्गाय नमः । शर्वाय नमः । शर्वलिङ्गाय नमः । शिवाय नमः । शिवलिङ्गाय नमः । ज्वलाय नमः । ज्वललिङ्गाय नमः । आत्माय नमः । आत्मलिङ्गाय नमः । परमाय नमः । परमलिङ्गाय नमः । एतत्सोमस्य सूर्यस्य सर्वलिङ्गꣳस्थापयति पाणिमन्त्रं पवित्रम् ॥

**अन्वयार्थ**—( या अनुवाकाचा अन्वय सरळ आहे. ) पुष्कळ धनाच्या स्वामीला म्ह० कुबेररूप पार्वतीपतीला नमस्कार असो. निधनाचें जो रक्षण करतो तो 'निधनप' भक्तांना तें जो देतो तो 'त' आणि भक्तांच्या जो समीप असतो तो अन्तिक. त्या निधनपन्त-अन्तिकाला नमस्कार असो. ऊर्ध्व लोकीं देवतारूपानें असणाऱ्या शंकराला नमस्कार असो. ऊर्ध्व लोकीं देवांनीं लिंगरूपानें स्थापिलेल्या व पूजा केल्या जाणाऱ्या पार्वतीपतीला नमस्कार असो. सर्वात्मक असल्यामुळें सुवर्णरूप, रौप्यनिर्मित लिंगाकार, स्वर्ग लोकांतील सुखरूप, इन्द्रादिकांनीं स्थापिलेल्या स्वर्गलोकस्थ लिंगाकार, संसाररूप, ज्याच्यापासून ब्रह्माण्ड निर्माण होतें त्या भवसंज्ञक, भूलोकीं सर्व लोकांकडून पूजिल्या जाणाऱ्या, महत्सुखास प्राप्त होणाऱ्या, ब्रह्माण्डदीपक, ज्योतिर्मय, द्वादशज्योतिर्लिंगरूप, सर्व जगदात्मक, आत्मलिंगरूप व परमलिंगरूप शंकराला नमस्कार असो. या पूर्वोक्त मंत्रानें सोम, सूर्य व सर्व देव यांच्या कारणभूत, सर्व मन्त्र ज्याचे अवयव आहेत व पाप्यांना सुद्धां स्मरणानेंच जें पवित्र करितें, अशा सर्व प्रकारच्या लिंगाला सर्व लोक स्थापितात ( १६ ).

---

आतां शास्त्राधिकारी त्रैवर्णिकांना ज्ञानोत्पत्ति व्हावी म्हणून महादेवाच्या पांच मुखांतील पश्चिम मुखाचें प्रतिपादन करणारा मन्त्र सांगतात—

सद्योजातं प्रपद्यामि सद्योजाताय वै नमो नमः ।
भवे भवे नाति भवे भवस्व माम् । भवोद्भवाय नमः ॥ ( १७ )

अन्वयार्थ—' सद्योजात प्रपद्यामि ' सद्योजातनांवाचें जें पश्चिम मुख तद्रूप परमेश्वराला मी प्राप्त होतों, ' सद्योजाताय नमो नम अस्तु ' तशा प्रकारच्या सद्योजाताला नमस्कार असो 'हे सद्योजात, मां भवे भवे न भवस्व' हे सद्योजात, मला निरनिराळ्या जन्म निमित्तांमध्यें प्रेरणा करूं नको, ' अतिभवे भवस्व ' तर जन्माच्या उल्लंघनासाठीं तत्त्वज्ञानांत प्रेरणा कर ' भवोद्भवाय सद्योजाताय नम अस्तु- ' संसारांतून उद्धार करणाऱ्या सद्योजाताला नमस्कार असो ( १७ )

---

उत्तर वक्त्रप्रतिपादक मंत्र सांगतात—

वामदेवाय नमो ज्येष्ठाय नमः श्रेष्ठाय नमो रुद्राय नमः कालाय नमः कलविकरणाय नमो बलविकरणाय नमो बलाय नमो बलप्रमथनाय नमः सर्वभूतदमनाय नमो मनोन्मनाय नमः ॥ ( १८ )

अन्वयार्थ—( या अनुवाकाचा अन्वय सरळ आहे ) सुंदर दीप्त वामदेवाला जगदुत्पत्तीच्या पूर्वीच असलेल्या ज्येष्ठाला, अतिशय प्रशस्त असलेल्या श्रेष्ठाला, प्रलयसमयीं प्राण्यांना रडविणाऱ्या रुद्राला, सर्व प्राण्यांच्या आयुष्य क्षयाला कारण होणाऱ्या कालाला, सुखाचा स्वीकार करणाऱ्या व नानाप्रकारच्या जगदुत्पत्तीच्या साधनाला, राक्षसांचें बळ ज्याच्या योगानें नाहींसें केलें जातें त्या बलविकरणाला,बळाला,बलप्रमथनाला, सर्व भूतांचें दमन करणाऱ्या सर्व भूतदमनाला व अतिशय सर्वज्ञ मनोन्मनाला नमस्कार असो. (१८)

---

दक्षिणमुख प्रतिपादक मन्त्र—

अघोरेभ्योऽथ घोरेभ्यो घोरघोरतरेभ्यः ।
सर्वेभ्यः सर्व शर्वेभ्यो नमस्ते अस्तु रुद्ररूपेभ्यः ( १९ )

अन्वयार्थ—' हे सर्व, त अघोरभ्य अथ घोरेभ्य , घोरघोरतरेभ्य सर्वेभ्यः, रुद्ररूपेभ्यः नम अस्तु ' हे परमेश्वरा, तुझें दक्षिणमुखरूप अघोर म्ह० सात्त्विक असल्यामुळें शांत, तसेंच घोर म्ह० राजस असल्यामुळें उग्र आणि तामस असल्यामुळें घोराहूनही अतिघोर आहे अशा तीन प्रकारच्या व लयकालीं हिंसा करणाऱ्या रुद्ररूपाला सर्व देशीं व सर्व कालीं नमस्कार असो ( १९ )

---

पूर्वेकडील मुखाचें प्रतिपादन करणारा मन्त्र—

तत्पुरुषाय विद्महे महादेवाय धीमहि । तन्नो रुद्र प्रचोदयात् ॥ (२०)

अन्वयार्थ—' तत्पुरुषाय विद्महे महादेवाय धीमहि । तत् नः रुद्रः प्रचोदयात्-' प्राग्वक्त्रदेवाचें नांव ' तत्पुरुष ' असें आहे. त्या तत्पुरुष देवाला आम्ही गुरुशास्त्रमुखानें जाणतों; आणि जाणून त्या महादेवाचें ध्यान करतों. यास्तव तो रुद्रदेव आम्हांला ज्ञान व ध्यान यांकरितां प्रेरणा करो. ( २० )

---

ऊर्ध्वमुखाचा प्रतिपादक मन्त्र—

ईशानः सर्वविद्यानामीश्वरः सर्वभूतानाम् ।
ब्रह्माधिपतिर्ब्रह्मणोऽधिपतिर्ब्रह्मा शिवो मे अस्तु सदाशिवोम् ॥ (२१)

अन्वयार्थ—' यः अथ ऊर्ध्ववक्त्रः देवः सः सर्वविद्यानां ईशानः-' जो हा ऊर्ध्वमुख देव तो सर्व विद्यांचा नियामक आहे. ' तथा सर्वभूतानां ईश्वरः, ब्रह्माधिपतिः, ब्रह्मणः अधिपतिः ' त्याचप्रमाणें सर्व प्राण्यांचा नियामक, वेदाचा सर्वोत्तम पालक, व हिरण्यगर्भाचा अधिपति आहे ' ब्रह्मा मे शिवः अस्तु-' अशा प्रकारचा जो व्यापक परमात्मा तो मजवर अनुग्रह करण्यासाठीं शांत होवो. 'स' एव सदाशिवः अहं अस्मि-' तोच सदाशिव मी आहें. ( २१ )

---

पुनरपि रुद्रदेवताक मंत्र—

नमो हिरण्यबाहवे हिरण्यवर्णाय हिरण्यरूपाय हिरण्यपतयेऽम्बिकापतय उमापतये पशुपतये नमो नमः ॥ ( २२ )

अन्वयार्थ—' हिरण्यबाहवे, हिरण्यवर्णाय, हिरण्यरूपाय, हिरण्यपतये, अम्बिकापतये, उमापतये, नमः ' सोन्याप्रमाणें ज्याचे बाहू व इतर अवयव दिसतात त्याला, सो न्यासारखीं दुर्लभ वेदाक्षरें ज्याच्यापासून उद्भवतात त्याला, तेजोमयाला, नवनिधींच्या स्वामीला, पार्वतीपतीला व उमापतीला नमस्कार असो. ' पशुपतये नमोनमः-' आब्रह्मस्तम्बपर्यंत जीव हेच पशु आहेत. त्यांच्या नायकाला नमस्कार असो; ('नमः' या शब्दाचा हिरण्यवर्णादि प्रत्येक शब्दाशीं संबंध व्हावा, म्हणून नमःशब्दाची आवृत्ति केली आहे. २२ )

---

आतां वर सांगितल्याप्रमाणें उपासना करणाऱ्या पुरुषानें उपास्याला नमस्कार करते वेळीं म्हणावयाचा मंत्र—

ऋतꣳ सत्यं परं ब्रह्म पुरुषं कृष्णपिङ्गलम् ।
ऊर्ध्वरेतं विरूपाक्षं विश्वरूपाय वै नमो नमः ( २३ )

अन्वयार्थ—' यत् एतत् परं ब्रह्म तत् ऋतं सत्यं, पुरुषं, कृष्णपिङ्गलं, ऊर्ध्वरेतं, विरूपाक्षं-' हें जें परब्रह्म तें सत्य ब्र॰ अबाध्य आहे. सत्यत्व व्यावहारिक व पारमार्थिक असें दोन प्रकारचें आहे. ( हिरण्यगर्भरूप व्यावहारिक सत्य आहे त्याचें निराकरण करून

पारमार्थिक सत्याचें प्रतिपादन करण्यासाठीं ' ऋतं सत्यं ' ह्म० अत्यंत सत्य, असें झटलें आहे. ) तशा प्रकारचें भग्न भक्तांवर अनुग्रह करण्यासाठीं उमा-महेश्वरात्मक पुरुषरूप होतें. त्याचा महेश्वररूप दक्षिणभाग कृष्णवर्ण ( काळा ) व डावीकडचा उमाभाग पिंगल-वर्ण आहे तो आपल्या सामर्थ्यानें वीर्याला ब्रह्मरंध्रांत धारण करून ऊर्ध्वरेता होतो. त्याला तीन नेत्र असल्यामुळें तो विरूपाक्ष आहे. ' तस्मै विश्वरूपाय नमो नमः-' त्या सर्व जगद्रूप परमात्म्याला नमस्कार असो. ( २३ )

---

आतां रुद्रदेवताक मन्त्र पठतात—

सर्वो वै रुद्रस्तस्मै रुद्राय नमो अस्तु । पुरुषो वै रुद्रः सन्महो नमो नमः । विश्वं भूतं भुवनं चित्रं बहुधा जातं जायमानं च यत् सर्वो ह्येष रुद्रस्तस्मै रुद्राय नमो अस्तु ॥ ( २४ )

अन्वयार्थ—' सर्वः वै रुद्रः-' पुराणामध्यें जो पार्वतीपति रुद्र प्रसिद्ध आहे तोच सर्व आहे. कारण तो जीवरूपानें सर्व शरीरांत प्रविष्ट झाला आहे 'तस्मै रुद्राय वै नमः अस्तु ' त्या सर्वात्मक रुद्राला नमस्कार असो. ' यः पुरुषः सः एव रुद्रः सत् महः तस्मै नमो नमः-' प्रकृति-पुरुषांतील जो चिदात्मक पुरुष तोच भक्तांवर अनुग्रह करण्याकरितां रुद्र रूपानें प्रतीत होतो. तेंच सद्रूप तेज आहे. तशा रुद्राला पुनः पुनः नमस्कार असो. ' यत् जडं विश्वं यत् च चेतनं भूतं, यत् च चित्रं भुवनं, यत् च जातं, जायमानं सर्वः हि एषः रुद्रः-' जें जड विश्व आहे व चेतन प्राणिवर्ग आहे तसेंच हें जें चेतनाचेतनरूपानें विचित्र जगत् आहे आणि त्यांतही जें जगत् पूर्वी उत्पन्न झालेलें व यापुढें उत्पन्न होणारें आहे तो हा सर्व प्रपंच रुद्रच आहे. ' तस्मै रुद्राय नमः अस्तु-' तशल्या सर्वात्मक रुद्राला नमस्कार असो ( २४ )

---

कद्रुद्राय प्रचेतसे मीढुष्टमाय तव्यसे । वोचेम शंतमꣳ हृदे ।
सर्वो ह्येष रुद्रस्तस्मै रुद्राय नमो अस्तु ॥ ( २५ )

अन्वयार्थ—' कद्रुद्राय, प्रचेतसे, मीढुष्टमाय, तव्यसे, हृदे शन्तमं वोचेम-' प्रशस्त, अतिशय ज्ञानयुक्त, भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारा, स्तुति करण्यास योग्य व हृदयरूप अशा रुद्राला उद्देशून आम्ही अतिशय सुखकर स्तुतिरूप वाक्य बोलतों. ' सर्वः हि एषः रुद्रः तस्मै रुद्राय नमः अस्तु-' हा सर्व रुद्र आहे. त्या रुद्राला नमस्कार असो. ( २५ )

---

आतां अग्निहोत्रकर्मात होम-साधनद्रव्याला कारण होणाऱ्या एका वृक्षाचें विधान करितात.—

यस्य वैकङ्कत्यग्निहोत्रहवणी भवति प्रत्येवास्याहुतयस्तिष्ठन्त्यथो प्रतिष्ठित्यै ॥

अन्वयार्थ—' यस्य अग्निहोत्रहवणी वैकङ्कती भवति तस्य अग्निहोत्रिणः आहुतयः तिष्ठन्ति-' अग्निहोत्रामध्यें ज्या दर्वीनें हवि अग्नींत दिला जातो ती अग्निहोत्रहवणी. ज्या

अग्निहोत्रशाळी तो हवनी विकङ्कत वृक्षाच्या लांकडाची असेल त्या अग्निहोत्रानें तिच्या योगानें दिलेल्या आहुत्या निश्चयानें फलप्रद होतात 'अथो प्रतिष्ठित्यै सपद्यन्ते' तशाच त्या चित्तशुद्धीच्या द्वारा तत्त्वज्ञानाच्या अभिप्रेत कारण होतात (२६)

---

चित्तशुद्धीला कारण होणाऱ्या कर्मांचा उपयोग या मोक्षप्रकरणांत संक्षेपतः सुचवून मतिप्रतिबन्धनिवारक रक्षोघ्न मन्त्र सांगतात. ते जपाच्या उपयोगी आहेत--

कृणुष्व पाज इति पञ्च ॥

अन्वयार्थ—'कृणुष्व पाज इति पञ्च ऋचः जपितव्याः' 'कृष्णयजुःसंहितेच्या प्रथम काण्डांत तृतीय प्रपाठकामध्ये 'कृणुष्व पाज' इत्यादि ज्या पांच ऋचा आहेत त्यांचा जप करावा (या पुढें त्या पांची ऋचा क्रमानें अन्वयार्थासह देतों)

कृणुष्व पाजः प्रसितिं न पृथ्वीं याहि राजेवामवाꣳ इभेन ।
तृष्वीमनु प्रसितिं द्रूणानोऽस्तासि विध्य रक्षसस्तपिष्ठैः ॥

अन्वयार्थ—'हे अग्ने, पृथ्वीं प्रसितिं न पाजः कृणुष्व' हे अग्ने, ज्याप्रमाणें पक्षि-भक्षक निषाद पक्ष्यांना धरण्यासाठीं मोठें जाळें पसरतात त्याप्रमाणें आमच्या काम क्रो-धादि शत्रूंच्या संहारार्थ आम्हांला बल दे 'ततः राजा इव अमवान् सन् इभेन (शत्रून् प्रति) याहि' नंतर जसा एखादा राजा सहायसंपन्न होऊन हत्तीवरून चतुरंगसेनेसह शत्रूवर चाल करून जातो त्याप्रमाणें तूही आमच्या शत्रूंचा संहार करावयास जा 'त्वं तृष्वीं प्रसितिं अनु द्रूणानः अस्ता असि' कारण तू शीघ्र संहार करणाऱ्या प्रसितिसंज्ञक साधनानें युक्त होऊन पळणाऱ्या शत्रूंच्या मागें त्यांचा हिंसा करीत व त्यांवर बाण फेंकीत जाणारा आहेस 'तस्मात् रक्षसः तपिष्ठैः विध्य' यास्तव राक्षसांना अति संताप देणाऱ्या आयुधांनीं वेध-ताडन कर.

तव भ्रमास आशुया पतन्त्यनुस्पृश धृषता शोशुचानः ।
तपूꣳष्यग्ने जुह्वा पतङ्गानसंदितो विसृज विष्वगुल्काः ॥

अन्वयार्थ--'भो अग्ने, भ्रमासः आशुयाः ये पतन्ति तान् पतङ्गान् त्वं तपूंषि तव धृषता तेजसा अनुस्पृश' हे अग्ने, प्राण्यांना पीडा देण्यासाठीं सर्वत्र भ्रमण करणारे या व अहोरात्र इतस्ततः शीघ्र गमन करणारे जे पिशाच भक्षक असतात अशा त्यांना आणि सर्व प्रपञ्चाला संताप देण्याचेंच ज्यांचें शील आहे अशा राक्षसांना तू आपल्या प्रगल्भ तेजानें जाळून टाक '... शोशुचानः जुह्वा हविष्मान् राक्षसैः न असंदितः विष्वक् उल्काः विसृज' अन्तर्बाह्य शत्रूंना अतिशय दुःख देणारा, स्रुचेनें हवन केलेल्या घृत पुरो-डाशादिरूप हवीनें युक्त असलेला व राक्षसांकडून सर्वदा असंडित असा तू शत्रूवर सर्व बाजूंनीं उल्कांचा वर्षाव कर

प्रति स्पशो विसृज तूर्णितमो भवा पायुर्विशो अस्या अदब्धः ।
यो नो दूरे अघशꣳसो यो अन्त्यग्ने माकिष्टे व्यथिरादधर्षीत् ॥

अन्वयार्थ—' भो अग्ने तूर्णितमः त्व स्पश ' हे अग्ने, अतिशय वेगवान् असलेला तू आम्हाला पीडा देणाऱ्या शत्रूंना पाशांनीं बांधून ने. 'अस्याः विशः पायु. ( भव )-' या आमच्या पुत्रादि प्रजेचा रक्षक हो. ' नः दूरे अन्ति य' अघशंसः तमपि अपावृह ' आम्हापासून दूर अथवा समीप आमच्या नाशाची इच्छा करणारा जो असेल त्यालाही दूर कर. ' अहमपि अदब्ध मदाभि ' मीही दारूकडून न पीडिलेला, असा व्हावें ' कि. व्यथि ते पुरस्तात् मा आदधर्षीत् ' कोणीही व्यथा देणारा राक्षस तुझ्यापुढें कधीही धृष्ट न होवो.

उदग्ने तिष्ठ प्रत्यातनुष्व न्यमित्राꣳ ओषतात्तिग्महेते ।
यो नो अरातिꣳ समिधान चक्रे नीचा तं धक्ष्यतसं न शुष्कम् ॥

अन्वयार्थ—' भो अग्ने, उत्तिष्ठ ' हे अग्ने, आम्हांवर अनुग्रह करण्याकरितां तू उठ ' आतनुष्व ' आम्हावर दया कर. ' अमित्रान् नि ओषत त्-' आमच्या कामादिक शत्रूंना जगदीं भस्म करून टाक ' हे तिग्महेते, न य अराति चक्रे त शुष्क अतस न धक्षि ' हे तीक्ष्णायुध, आम्हांवर जो कोणी शत्रुत्व घातो, त्या आमच्या शत्रूला शुष्क वृक्षाप्रमाणें जाळू नकोस, 'नीचा कुरु-' तर अधोमार्गात टाक ' भो समिधान, सर्व एतत् साधय ' हे देदीप्यमान अग्ने, तू हें सर्व आमचें कार्य कर.

ऊर्ध्वो भव प्रतिविध्याध्यस्मदाविष्कृणुष्व दैव्यान्यग्ने ।
अव स्थिरा तनुहि यातुजूना जामिमजामिं प्रमृणीहि शत्रून् (१७)

अन्वयार्थ—' हे अग्ने, अस्मत् रिपून् अधि प्रतिविध्य ' हे अग्ने, आमच्या कामादि शत्रूंना अतिशय ताडन कर ' दैव्यानि आविष्कृणु ' त्याचप्रमाणें सत्कर्म व सदुपासना यांस प्रकट कर. ' उर्ध्व. भव ' सत्यलोकप्रभृति ऊर्ध्वलोक देणारा हो ' यातुजूनां स्थिरा अवतनुहि ' पुण्यलोकांचा विरोध करणाऱ्या राक्षसांचीं स्थिर धनुष्यें शिथिल कर आणि ' जामि परित्यज्य प्रमृणीहि ' आलस्यादि सोडून त्यांचा नाश कर ' अजामिं शत्रून् प्रमृणीहि ' जयाचा संहार करावयास तयार झालेल्या शत्रूंना आळस सोडून मारून टाक. ( या पांची ऋचांचा अभिप्राय असा-हे त्रैलोक्यनायक अग्ने, आमच्या अन्तर्बाह्य शत्रूचें उन्मूलन करून, आम्हांला सत्कर्मामध्येंच प्रवृत्त करून, अ मचें अन्त.- करण शुद्ध करून, भार्या पुत्रादिकांसह शभर वर्षें भोग देऊन मरणानतर सर्व कुटुम्बासह मला मुक्ति दे ) ( १७ )

---

जीवनाला कारण होणाऱ्या क्षेत्राच्या लाभादिकांच्या द्वारा मुक्तीला कारण होणारा पृथ्वीदेवताक मंत्र--

अदितिर्देवा गन्धर्वा मनुष्याः पितरोऽसुरास्तेषाꣳ सर्वभूतानां माता मेदिनी महता महीसावित्री गायत्री जगत्युर्वी पृथ्वी बहुला विश्वा भूता कतमा काया सा सत्येत्यमृतेति वसिष्ठ. ॥ ( १८ )

अन्वयार्थ—' देवा, गन्धर्वा, मनुष्याः, पितरः, असुराः, तेषां सर्वभूतानां अदितिः माता ' देव, गन्धर्व, मनुष्य, पितर व असुर हे सर्व अदितिरूप आहेत, म्हणून सर्व देहांचें उपादान कारण असलेली ती अदिति सर्वांची माता आहे. ' मेदिनी ' मधु कैटभ राक्षसाच्या मेदानें झालेल्या तिला मेदिनी म्हणतात, किंवा कठिन असल्यामुळें ती मेदिनी होय. ' महता, मही, सावित्री, गायत्रा, जगती, उर्वी, पृथ्वी, बहुला, विश्वा, भूता, कतमा काया, धा, सत्या इत्येव वसिष्ठ. आह ' ती महता म्ह० गुणांनीं अथवा धैर्यानें युक्त आहे. सर्व प्राण्यांचा उपद्रव सहन करणें हाच तो गुण अथवा हेंच धैर्य आहे ती पुत्र अन्तर्यामीशीं संबंध ठेवणारी, आपल्या उपासकांचें रक्षण करणारी, जगदाश्रयभूत, अनेक प्रकारच्या शेतांनीं युक्त, विस्तार पावलेली दाट अवयवांनी युक्त, सर्वात्मिका, प्राणिदेहांच्या उत्पत्ताच्या पूर्वीं असणारी, अनिर्वाच्य सुखरूप, सर्व प्राणिदेहरूपानें परिणाम पावलेली, प्रसिद्ध, व व्यवहार दशेंत बाधरहित, अशा प्रकारची आहे, असें वसिष्ठमुनींनीं सांगितलें आहे. ' अमृता इत्यपि स. एव आह-' तसेंच, ती मरण-धर्मरहित आहे म्ह० चतुर्युगाच्या प्रत्येक आवृत्तीबरोबर ती नाश पावत नाहीं, असेंही त्यांनीं म्हटलें आहे. ' अस्य मन्त्रस्य ऋषि वसिष्ठ. ' वास्तव या मन्त्राचा ऋषि वसिष्ठ आहे. ( २८ )

---

आतां वृष्टीच्या अभावामुळें होणाऱ्या उपद्रवाचा परिहार करून उपकार करणाऱ्या अब्देवताक मन्त्राचा उपदेश करितात—

आपो वा इदꣳ सर्वं विश्वा भूतान्यापः प्राणा वा आपः पशव आपोऽन्नमापोऽमृतमापः सम्राडापो विराडापः स्वराडापश्छन्दाꣳस्यापो ज्योतीꣳष्यापो यजूꣳष्यापः सत्यमापः सर्वा देवता आपो भूर्भुवः सुवराप ॐ॥२९

अन्वयार्थ--' यत् इदं जगत् अस्ति तत् सर्वं आपः एव ' हें जें जगत् आहे तें सर्व जलच आहे ( कसें तें सांगतात- ) ' विश्वा भूतानि आपः ' सर्व शरीरें ( रेतोरूप जलाचा विकार असल्यामुळें ) जल आहे ' प्राण. वै आपः ' जलानेंच प्राणाचें पोषण होत असल्यामुळें शरीरांतील प्राणधारक वायुही जल आहे ' पशवः अपि आप. ' गाय, बकरी इत्यादि पशूही जल आहे कारण तें त्यांच्यामध्यें दुधाच्या रूपानें परिणत होत असतें. ' अन्नं आपः ' जल अन्नाचें कारण आहे, हें प्रसिद्ध असल्यामुळें व्रीहियवादिरूप अन्नही जल आहे. ' अमृत आप. ' अमृतही जल आहे ' सम्राड् आप ' उत्तम प्रकारें प्रकाशमान होणारा सूत्रात्मा हिरण्यगर्भ, ' विराड् आप ' ब्रह्माण्ड देहानें स्पष्ट भासणारा विराट् ' स्वराड् आप ' इंद्रियांची अपेक्षा न करिताच स्वयं प्रकाशमान होणारा अध्याकृताभिमानी ईश्वर, ' छंदांसि आप. ' गायत्र्यादिप्रभृति छंद, ' ज्योतींषि आप ' आदित्यादि ज्योति, ' यजूंषि आप ' अनियत अक्षरांचे मंत्र यजु, ' सत्य आप ' यथार्थ कथनरूप सत्य, ' सर्वा देवता. आप ' इन्द्रादि सर्व देवता, ' भूः, भुव, सुव, आप ' भू, भुव., सुव हे तीन लोक इत्यादि सव आप आहे.' ॐ ' आप मूलकारण परमात्मरूपानें प्रणवप्रतिपाद्य आहेत, असें सांगण्याकरितां शेवटीं ' ओं ' असें म्हटलें आहे. ( २९ )

---

माध्याह्न संध्येंत अभिमंत्रित जलाचें प्राशन करण्याचा मंत्र—

आपः पुनन्तु पृथिवीं पृथिवी पूता पुनातु माम् ।
पुनन्तु ब्रह्मणस्पतिर्ब्रह्म पूता पुनातु माम् ॥
यदुच्छिष्टमभोज्यं यद्वा दुश्चरितं मम ।
सर्वं पुनन्तु मामापोऽसतां च प्रतिग्रहं स्वाहा ॥ (२०)

**अन्वयार्थ**—'आपः पृथिवी पुनन्तु-' आप पृथ्वीला प्रक्षालनानें शुद्ध करोत. 'पृथिवी-पूता सती मां पुनातु-' ती पृथ्वी शुद्ध होऊन मज अनुष्ठानकर्त्याला पावन करो. 'ब्रह्मणः पतिः पुनन्तु-' त्याचप्रमाणें आप वेदाचा पालक जो आचार्य त्याला पावन करोत. 'ब्रह्म पूता मां पुनातु-'आचार्यानें उपदेशिलेलें ब्रह्मस्वरूप स्वतः पवित्र होऊन मला शुद्ध करो. 'यत् उच्छिष्टं अभोज्यं यत् वा मम दुश्चरितं तत् सर्वं (परिहृत्य) मां आपः पुनन्तु' दुसऱ्यानें खाऊन राहिलेलें जें उच्छिष्ट तसेंच जें अभोज्य ( म्ह० खाण्यास अयोग्य ) तसेंच जें माझें दुश्चरित तें सर्व नाहींसें करून जल मला पावन करो. 'असतां मया कृत परिग्रहं च पुनन्तु-' त्याचप्रमाणें शूद्रादिकांचा मीं केलेला जो प्रतिग्रह त्यालाही आप पवित्र करोत. 'तदर्थं इदं उदकं स्वाहा-' त्याकरितां मंत्रविलेलें हें जल माझ्या मुखरूप अग्नींत स्वाहा म्ह० हुतहुत असो. (२०)

---

सायं संध्याकाळी जलपान करण्याचा मंत्र—

अग्निश्च मा मन्युश्च मन्युपतयश्च मन्युकृतेभ्यः ।
पापेभ्यो रक्षन्ताम् । यदह्ना पापमकार्षम् ॥
मनसा वाचा हस्ताभ्याम् । पद्भ्यामुदरेण शिश्ना ॥
अहस्तदवलुम्पतु । यत्किंच दुरितं मयि ।
इदमहं माममृतयोनौ । सत्ये ज्योतिषि जुहोमि स्वाहा ॥ (२१)

**अन्वयार्थ**—'यः अग्निः च मन्युः च ये मन्युपतय ते सर्वे अपि मन्युकृतेभ्यः पापेभ्यः मां रक्षन्तां-' जो हा अग्नि, क्रोधाभिमानी देव व क्रोधस्वामी म्ह० क्रोधाचें नियमन करणारे देव ते सर्वही क्रोधामुळें घडलेल्या पापापासून माझें रक्षण करोत. ' 'अह्ना यत् पापं मनसा, वाचा, हस्ताभ्यां, पद्भ्यां, उदरेण, शिश्ना अकार्षं तत् अहः अवलुम्पतु-' या संपलेल्या दिवशीं मीं जें पाप मन, वाणी, दोन्ही हात, पाय, पोट व शिश्न यांनीं केलें असेल तें दिवसाचा अभिमानी देव नाहींसें करो. (दुसऱ्याच्या नाशादिकाचें चिन्तन करणें हें मानस; अप्रिय, मिथ्या इत्यादि भाषण हें वाचिक; अभिचारहोमादि हें हस्तकृत; गाय, ब्राह्मण, इत्यादि पूज्यांना पायाचा स्पर्श करणें हें पादकृत, अभोज्यभोजन हें उदर-कृत आणि अगम्यागमन हें शिश्न-कृत पाप आहे. )' किंच, यत् मयि दुरितं इदं अहं मां अमृतयोनौ सत्ये ज्योतिषि जुहोमि स्वाहा-'तसेंच माझें दुसरेंही जें जें पाप असेल त्याच्या या कार्याला ( म्ह० लिंगशरीररूप मला ) मी मरणरहित जगत्कारणामध्यें ( म्ह० अपा-

पित स्वयंप्रकाश तत्त्वामध्यें ) टाकतों. ह्म० या होमानें मी तें सर्व भस्म करून सोडतों.) त्यासाठीं मंत्रविलेलें हें जल माझ्या मुखाग्नींत हुतुत असो. ( ३१ )

---

प्रातःसंध्यासमयीं जलपानार्थ मंत्र—

सूर्यश्च मा मन्युश्च मन्युपतयश्च मन्युकृतेभ्यः
पापेभ्यो रक्षन्ताम् । यद्रात्रिया पापमकार्षम् ।
मनसा वाचा हस्ताभ्याम् । पद्भ्यामुदरेण शिश्ना ॥
रात्रिस्तदवलुम्पतु । यत्किंच दुरितं मयि ॥
इदमहं माममृतयोनौ । सूर्ये ज्योतिषि जुहोमि स्वाहा ॥ ( ३२)

अन्वयार्थ—'सूर्यः च मन्युः च मन्युपतयः मां मन्युकृतेभ्यः पापेभ्यः रक्षन्ताम्' सूर्य, मन्यु व मन्युपति हे देव कोधामुळें घडलेल्या पापापासून माझें रक्षण करोत. 'रात्रिया मनसा, वाचा, हस्ताभ्यां, पद्भ्यां, उदरेण, शिश्ना यत् पापं अकार्षं तत् रात्रिः अवलुम्पतु' मी गेल्या रात्रीं मनानें, वाणीनें, हातांनीं, पायांनीं, उदरानें व शिश्नानें जें पाप केलें तें रात्रीची अभिमानी देवता नाहींसें करो. 'किंच मयि, यत् दुरितं इदं अहं मां अमृतयोनौ सूर्ये ज्योतिषि जुहोमि स्वाहा' तसेंच मजमध्यें दुसरेंही जें काय पाप आहे त्या सर्वांच्या कर्त्याला ह्म० या मला मी सूर्योपाधिक, स्वयंप्रकाश, नित्य जगत्कारणामध्यें टाकितों. त्यासाठीं मंत्रविलेलें हें जल माझ्या मुखाग्नीमध्यें हुतुत असो ( ३२ )

---

प्राणायामादि सर्व कर्मांमध्यें अवश्य असलेल्या ओंकाराचे ऋष्यादि सांगतात—

ओमित्येकाक्षरं ब्रह्म । अग्निर्देवता ब्रह्म इत्यार्षम् ॥
गायत्रं छन्दं परमात्मं सरूपम् । सायुज्यं विनियोगम् ॥ ( ३३ )

अन्वयार्थ—'ओमिति यत् एकाक्षरं तत् ब्रह्म-तस्य देवता अग्निः' ॐ असें जें एकाक्षर आहे तें ब्रह्म ( ह्म० सर्व ब्रह्माण्डाची उत्पत्ति, स्थिति व नाश, यांचें कारण आहे. ) त्याची देवता अग्नि आहे. (अग्नि ह्म० सर्वव्यापक परमात्मा.) 'ब्रह्म इति यत् तत् आर्षं' अग्निशब्दोपलक्षित ब्रह्मच त्याचा ऋषि आहे. ( मंत्रही ब्रह्म, ऋषिही ब्रह्म व देवताही ब्रह्म. तात्पर्य ॐकार स्वतःच सर्व आहे. ) 'गायत्रं छन्दः परमात्मं सरूप विनियोगं सायुज्यं' दैवी गायत्री हा याचा छन्द, परमात्मलक्षण सर्वात्मक परब्रह्माची प्राप्ति हाच याचा विनियोग आहे. ( ३३ )

---

तिन्ही संध्यांत मार्जनानंतर गायत्रीच्या आवाहनाचा मंत्र—

आयातु वरदा देवी अक्षरं ब्रह्म संमितम् ।
गायत्रीं छन्दसां मातेदं ब्रह्म जुषस्व मे ।
यदह्नात्कुरुते पापं तदह्नात्प्रतिमुच्यते ॥

यद्रात्रियात्कुरुते पापं तद्रात्रियात्प्रतिमुच्यते ।
सर्ववर्णे महादेवि संध्याविद्ये सरस्वति ॥ ( ३४ )

अन्वयार्थ—' वरदा देवी अक्षरं संमितं ब्रह्म उद्दिश्य आयातु ' आम्हांला अभीष्ट वर देणारी गायत्री देवी विनाशरहित व वेदान्तप्रमाणानें निश्चित असें जें जगत्कारण ब्रह्म त्याचा उपदेश करण्यासाठीं येवो. ' छन्दसां माता गायत्री इदं ब्रह्म मे जुषस्व ' गायत्री, त्रिष्टुप् इत्यादि छन्दांची अथवा वेदांची जी माता ती आम्हांला या वेदान्तप्रतिपाद्य ब्रह्मतत्त्वाचा उपदेश करो. ' हे संध्याविद्ये, सरस्वति, महादेवि, सर्ववर्णे, यदह्नात् पापं कुरुते तदह्नात् प्रतिमुच्यते ' हे संध्याविद्ये, ह्म० संध्यारूप विद्ये, हे सरस्वति, हे महादेवि, हे सर्ववर्णे, ( ह्म० रक्त, श्वेत, कृष्ण या वर्णांनीं युक्त ) तुझा भक्त ज्या दिवशीं जें पाप करितो त्या दिवशींच तो त्यापासून मुक्त होवो. ' यत् रात्रियात् पापं कुरुते तत् रात्रियात् प्रतिमुच्यते ' तसेंच ज्या रात्रीं जें पाप करितो त्या रात्रींच तो त्यापासून मुक्त होवो. (३४)

---

आतां गायत्रीच्या आवाहनाचे मंत्र—

ओजोऽसि सहोऽसि बलमसि भ्राजोऽसि देवानां धामनामासि विश्वमसि विश्वायुः सर्वमसि सर्वायुरभिभूरों गायत्रीमावाहयामि सावित्रीमावाहयामि सरस्वतीमावाहयामि छन्दऋषीनावाहयामि श्रियमावाहयामि गायत्रिया गायत्रीच्छन्दो विश्वामित्र ऋषिः सविता देवताऽग्निर्मुखं ब्रह्मा शिरो विष्णुर्हृदयꣳ रुद्रः शिखा पृथिवी योनिः प्राणापानव्यानोदानसमाना सप्राणा श्वेतवर्णा सांख्यायनसगोत्रा गायत्री चतुर्विꣳशत्यक्षरा त्रिपदा षट्कुक्षिः पञ्चशीर्षोपनयने विनियोगः ॥

अन्वयार्थ—' हे गायत्रि, त्वं ओजः असि ' हे गायत्रि, तूं ओज ( बळाला कारण होणारा जो आठवा धातु तद्रूप ) आहेस, ' सहः असि ' तूं सह ( शत्रूंना पराभूत करणारी शक्ति ) आहेस. ' बलं असि ' तूं बल ( शरीरांतील व्यवहारसामर्थ्य ) आहेस. ' भ्राजः असि ' तूं दीप्तिरूप आहेस. ' देवानां यत् धाम तत् नाम असि ' देवांचें जें तेज तेंच तुझें नांव आहे. ' विश्वं असि ' सर्व जगद्रूप तूंच आहेस. ' विश्वायुः असि ' तूं पूर्ण आयुष्यरूप आहेस. ' सर्वं असि ' तूं सर्व आहेस. ' सर्वायुः असि ' तूं सर्वायु आहेस. ' अभिभूः असि ' तूं सर्व पापाचा तिरस्कार करणारी आहेस व ' ॐ असि ' प्रणवप्रतिपाद्य परमात्मा आहेस ' गायत्रीं आवाहयामि ' ( पुढील अन्वय सरळ आहे. ) तशा प्रकारच्या गायत्रीचें मी मनामध्यें आवाहन करितों, सावित्रीचें आवाहन करितों, सरस्वतीचें आवाहन करितों. सर्व छन्द व ऋषि यांचें आवाहन करितों. सर्व वेदांच्या श्रीचें आवाहन करितों. ( याप्रमाणें गायत्रीचें आवाहन करून व तिच्या छन्दादिकांचें स्मरण करून ध्यान करावें. ) गायत्रीचा गायत्री हाच छन्द, विश्वामित्र ऋषि, सविता देवता; प्रसिद्ध अग्नि हेंच मुख, चतुर्मुख ब्रह्मा हें शिर, विष्णु हें हृदय, रुद्र हा शिखा; व पृथ्वी

हीच योनि आहे. प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे पांच वायु तिच्यामध्यें प्रवहा-दिरूपानें राहतात. वागादि इन्द्रियांनीं युक्त असलेली ती समान आहे. शुद्धसत्त्वगुणप्रधान असल्यामुळें ती श्वेतवर्ण आहे. सांख्यायन म्ह० परमात्मा; त्याचें जें गोत्र तेंच हिचें गोत्र आहे. ती गायत्री मंत्ररूप आहे. तिच्यामध्यें चोवीस अक्षरें आहेत. त्यामुळें तिचे तीन पाद आहेत. सर्व वेदरूप असलेल्या तिच्या सहा वेदाङ्गें ह्याच कुक्षि ( कुशी ) आहेत. चार वेदांचे चार उपनिषद्ग्रन्थ हीं तिचीं चार शिरें व इतिहास-पुराणें हें पांचवें शिर आहे. हिचा विनियोग बटूच्या उपनयनाकडे केला आहे. ( ३४ )

---

गायत्रीचें आवाहन व ध्यान, यानंतर प्राणायामासाठीं मंत्र—

ॐ भूः । ओं भुवः । ओं॑ सुवः । ओं महः ।
ओं जनः । ओं तपः । ओं॑ सत्यम् ॥
ॐ तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि ।
धियो यो नः प्रचोदयात् । ओमापो ज्योती रसोऽमृतं ब्रह्मभूर्भुवःसुवरोम् ॥

अन्वयार्थ—' ॐ भूः......ॐ सत्यं ' भूः, भुवः इत्यादि सात व्याहृती सात लोकांच्या प्रतिपादक आहेत. ते लोक प्रणवप्रतिपाद्य ब्रह्मस्वरूप आहेत असें सांगण्याच्या इच्छेनें प्रत्येक व्याहृतीवरोबर प्रणवाचा उच्चार केला आहे. ' तत्सवितुः• ' येथून पुढचा गायत्री मंत्र आहे. ' ॐ यः नः धियः प्रचोदयात् तस्य सवितुः देवस्य वरेण्यं तत् भर्गः धीमहि ' त्याचें प्रतिपाद्य ब्रह्मच आहे,असें सांगण्याच्या इच्छेनें त्या मंत्राच्या पूर्वींही प्रणवाचा उच्चार केला आहे. जो सविता ( परमेश्वर ) आमच्या बुद्धिवृत्तींना ब्रह्मतत्त्वामध्यें प्रेरित करितो, त्या प्रेरक अन्तर्यामी देवाच्या त्या श्रेष्ठ तेजाचें आम्हीं ध्यान करितों. ( यापुढें गायत्रीचें शिर सांगतात- ) ' ॐ आपः, ज्योतिः, रसः, अमृतं इति यत् तत् सर्व ॐ ब्रह्म-' ज्या समुद्र, नद्या इत्यादिकांतील आप आहेत; त्याचप्रमाणें जी आदित्यादि ज्योति आहे; तसाच मधुर, अम्ल इत्यादिक जो रस आहे तसेंच देवानीं प्यालेलें जें अमृत आहे तें सर्व प्रणवप्रतिपाद्य ब्रह्मच आहे. ' भूः, भुवः, सुवः, ॐ ' भूः, भुवः, सुवः हे तीन लोकही प्रणवप्रतिपाद्य ब्रह्म आहे. ३५

---

यानंतर गायत्रीच्या विसर्जनाचा मन्त्र—

उत्तमे शिखरे जाते भूम्यां पर्वतमूर्धनि ।
ब्राह्मणेभ्योऽभ्यनुज्ञाता गच्छ देवि यथासुखम् ॥

अन्वयार्थ—' भूम्या, पर्वतमूर्धनि, उत्तमे शिखरे जाते देवि ब्राह्मणेभ्यः अभ्यनुज्ञाता यथासुखं गच्छ ' भूमीवरील मेरुनांवाच्या पर्वतावर जें उत्तम शिखर आहे त्यावर वर सांगितलेल्या प्रकारची गायत्री देवता राहते. यास्तव हे देवि, तुझे उपासक व तुझ्या अनुग्रहानें संतुष्ट झालेले जे ब्राह्मण त्यांची अनुमति मिळाली असतां तूं स्वतःला सुख होईल अशा रीतीनें स्वस्थानीं जा.

स्तुतो मया वरदा वेदमाता प्रचोदयन्ती पवने द्विजाता ।
आयुः पृथिव्यां द्रविणं ब्रह्मवर्चसं मह्यं दत्त्वा प्रजातुं ब्रह्मलोकम् ॥

**अन्वयार्थ**—(पूर्व मंत्रांत अपरोक्षतेनें सांगितलेला मंत्र या मन्त्रांत परोक्ष रीतीनें स्पष्ट करितात–) ' द्विजाता गायत्री पृथिव्यां विद्यमानाय मह्यं आयुः, द्रविणं, ब्रह्मवर्चसं दत्त्वा पवने प्रचोदयन्ती वेदमाता वरदा मया स्तुतो ( स्तुता सती ) प्रजातुं ( प्रजातं ) ब्रह्मलोकं प्रयातु.' द्विजांकडून उपासना केली जाणारी गायत्री किंवा सूर्यमण्डल व ब्रह्म- लोक यांत प्रादुर्भूत झालेली गायत्री या पृथ्वीवर विद्यमान असलेल्या मला पूर्ण आयुष्य द्रव्य व ब्रह्मवर्चस देऊन ज्याप्रमाणें प्राणवायु सर्व प्राण्यांना प्रेरणा करून त्यांच्याकडून क्रिया करवितो त्याप्रमाणें अन्तर्यामिरूपानें प्रेरणा करणारी चारी वेदांची जननी उपास- कांना इष्टार्थ देणारी आणि मजकडून स्तुति केली गेलेली अशी होत्साती परमात्म्यापासून उत्पन्न झालेल्या ब्रह्मलोकास जावो. ( ३६ )

---

' पूर्वोक्त उपासना करण्यास असमर्थ असलेल्या पुरुषाला जप करावयास योग्य असा, आदित्यदेवताक मंत्र सांगतात—'

घृणिः सूर्य आदित्यो न प्रभा वात्यक्षरम् । मधु क्षरन्ति तद्रसम् ।
'सत्यं वै तद्रसमापो ज्योती रसोऽमृतं ब्रह्म भूर्भुवः सुवरोम् ॥ ३७

**अन्वयार्थ**—' घृणिः, सूर्यः, अक्षर, आदित्यः, प्रभा न वाति-' दीप्तिमान्, जगाला प्रसवणारा व नित्य आदित्य आपल्या प्रभेप्रमाणें आकाशमार्गानें गमन करतो. ' नद्यः तत् रसं मधु क्षरन्ति-' नद्या त्या आदित्यापासून उत्पन्न झालेल्या रसाला म्हणजे उद- काला तें मधुर होईल अशा रीतीनें वाहतात. ' तत् सत्यं, रसं, आपः, ज्योतिः, रसः, अ- मृतं, ब्रह्म, भूः, भुवः, सुवः, ॐ एतत् सर्वं आदित्यः एव-' तें आदित्यरूप ब्रह्मच यथार्थ भाषण, मधुरादि रस, नद्यांतील जल, चन्द्र, अग्नि इत्यादि ज्योति, प्रत्येक पदार्थाचें सार, अमृत, वेदविद्या, भूः, भुवः, सुवः हे तीन लोक व प्रणव आहे. म्ह॰ सत्यादि हें सर्व आदित्यच आहे, असें मनानें चिन्तन करावें. (३७)

---

ज्ञानप्रतिबन्धक महा पातकांची निवृत्ति करणारे त्रिसुपर्णनामक मंत्र सांगतात—

ब्रह्ममेतु माम् । मधुमेतु माम् ॥ ब्रह्ममेव मधुमेतु माम् । यास्ते सोम प्रजा वत्सोऽभि सो अहम् ॥ दुष्ष्वप्नहं दुरुष्षह । यास्ते सोम प्राणा१ँस्ताञ्जुहोमि ॥

अन्वयार्थ—' ब्रह्म मां एतु-' ब्रह्मतत्त्व मला प्राप्त होवो. ' मधु मां एतु-' परमानन्द- रूप वस्तु मला प्राप्त होवो. ' मधु ब्रह्म एव मां एतु-' मधुर ब्रह्मच मला प्राप्त होवो. ' हे सोम, ते याः प्रजाः ताः अभि सः अहं वत्सः अस्मि-' हे परमात्मन् सोम, ( उमा म्ह॰ ब्रह्मविद्या तिच्यासह असणारा तो सोम ) तुझ्या ज्या देव-मनुष्यादि प्रजा आहेत त्यांतील तुझा सेवक, बालक अशा प्रकारचा हा मी तुझ्या करुणेला योग्य आहें. ' हे दुष्ष्वप्नहन्, दुरुष्षह-' यास्तव संसाररूप दुःस्वप्नाचा नाश करणाऱ्या परमेश्वरा, तू माझ्या दुःसह संसा-

याचा विनाश कर. 'सोम, यः ते प्राणः तान् जुहोमि-' हे परमात्मन्, तुझ्या प्राणवृत्तींमध्यें मी आपल्या प्राणवृत्तींचा होम करतों. झ० इन्द्रियांना विषयांपासून निवृत्त करून मी आपलें चित्त केवळ तुझ्या ठिकाणीं लावतों.

आतां या पहिल्या त्रिसुपर्णमन्त्राचें माहात्म्य ब्राह्मणरूपानें सांगतात—

त्रिसुपर्णमयाचितम् । ब्राह्मणाय दद्यात् ॥
ब्रह्महत्यां वा एते घ्नन्ति । ये ब्राह्मणास्त्रिसुपर्णं पठन्ति ॥
ते सोमं प्राप्नुवन्ति । आसहस्रात्पङ्क्तिं पुनन्ति ॥ ओम् ( १८ )

**अन्वयार्थ**—' त्रिसुपर्णं अयाचित एव ब्राह्मणाय दद्यात्-' शिष्यानें विद्योपदेशासाठीं प्रार्थना केल्यावांचून त्याला तो सांगूं नये, असें शास्त्र आहे. पण हें त्रिसुपर्ण शिष्याच्या याचनेवांचूनच ब्राह्मणाला द्यावें. ' ये ब्राह्मणाः त्रिसुपर्णं पठन्ति एते ब्रह्महत्यां घ्नन्ति ते सोमं प्राप्नुवन्ति-' नतर जे ब्राह्मण या त्रिसुपर्णाचा सर्वदा जप करितात ते ब्रह्महत्यादोषाचा नाश करितात. त्यांना सोमयागाचें फळ मिळतें. ' आसहस्रात् पङ्क्तिं पुनन्ति ओं-' ते ज्या पंक्तींत बसून भोजन करितात त्या पंक्तींतील एक सहस्र लोकांस पावन करितात. यास्तव प्रणवप्रतिपाद्य परमात्माच या मन्त्राची देवता आहे. ( १८ )

---

दुसरें त्रिसुपर्ण सांगतात—

ब्रह्म मेधया । मधु मेधया । ब्रह्ममेव मधु मेधया ॥
अद्या नो देव सवितः प्रजावत्सावीः सौभगम् ।
परा दुःष्वप्नियꣳ सुव । विश्वानि देव सवितर्दुरितानि परासुव ॥
यद्भद्रं तन्म आसुव । मधु वाता ऋतायते ॥
मधु क्षरन्ति सिन्धवः । माध्वीर्नः सन्त्वोषधीः ॥
मधु नक्तमुतोषसि मधुमत्पार्थिवꣳ रजः । मधुद्यौरस्तु नः पिता ॥
मधुमान्नो वनस्पतिर्मधुमाꣳअस्तु सूर्यः ।
माध्वीर्गावो भवन्तु नः ॥

**अन्वयार्थ**—' यत् ब्रह्म तत् मेधया लभ्यतां-' जें जगत्कारण ब्रह्म तें मला गुरूनें उपदेशिलेलें महावाक्य व त्याचा अर्थ यांच्या धारण-शक्तीच्या योगानें प्राप्त होवो. 'मधु मेधया लभ्यतां-' तसेंच मधु ( झ० सुख ) मेधेनें ( धारणाशक्तीनें ) प्राप्त होवो. ' ब्रह्म एव मधु मेधया लभ्यतां-' ब्रह्मरूप मधुही मेधेच्या योगानें प्राप्त होवो. ' हे सवितः देव, अद्य नः प्रजावत् सौभग सावीः-' हे प्रेरक देवा, आज आम्हां विद्यार्थ्यांना शिष्य, प्रशिष्य, पुत्र इत्यादिकांनीं युक्त असें आचार्यरूप सौभाग्य दे. ' दुःष्वप्निय परासुव-' दुष्ट स्वप्नासारख्या या द्वैतप्रत्ययाचें निराकरण कर. ' हे सवितः देव, विश्वानि दुरितानि परासुव-' हे प्रेरक देवा, आमच्या ज्ञानाला प्रतिबंध करणारीं सर्व पापें दूर कर. ' यत् भद्रं तत् मे

आसुव-' असंभावना, विपरीत भावना इत्यादिकांनीं रहित असें कल्याणरूप तत्त्वज्ञान मज उपासकाला पूर्णपणें दे. ' ऋतायते मह्यं वाताः मधु वान्तु-' महाची इच्छा करणाऱ्या मला वायु सुखकर होतील असा रीतीनें वाहोत. (कारण वायूचा क्षोभ झाल्यास रोगांची उत्पत्ति होऊन तत्त्वज्ञानाला मोठें विघ्न होईल. यास्तव तें न व्हावें म्हणून वायूच्या अनुकूलतेची येथें प्रार्थना केली आहे. यापुढील प्रार्थनांचाही असाच अभिप्राय जाणावा.) ' सिन्धवः मधु क्षरन्ति-' नद्या मधुर व आरोग्यकर जल संपादन करोत. ' नः ओषधीः माध्वीः सन्तु-' व्रीहि-यवादि ओषधी आम्हांला पथ्यकर होवोत. ' नक्तं च उषसि उत मे मधु अस्तु-' रात्रीं व प्रभातसमयीं आणि दिवसाही मज विद्यार्थ्याला सुख होवो. (म्ह० आम्हांला कालकृत विघ्न न होवो.) ' पार्थिवं रजः मधुमत् अस्तु-' पृथ्वीतील रजही माधुर्ययुक्त, कंटकपाषाणादिरहित व त्यामुळेंच अनुकूल असो. ' नः पिता द्यौः मधु अस्तु-' आमच्या पित्यासारखा द्यौही अतिवृष्ट्यादि प्रातिकूल्यानें रहित असो. ' नः वनस्पतिः मधुमान् अस्तु-' आम्र, पनस इत्यादि वृक्ष मधुरफलांनीं युक्त होऊन आमच्या जीवनाला कारण होवोत. ' सूर्यः मधुमान् अस्तु-' सूर्यही पुष्कळ सन्ताप न देतां अनुकूल प्रकाशानें युक्त होवो. ' गावः नः माध्वीः भवन्तु-' गायीही आमच्या जीवनाला कारण होणाऱ्या मधुर दुग्धानें युक्त होवोत.

या त्रिसुपर्ण मंत्राचा महिमा सांगतात—

य इमं त्रिसुपर्णमयाचितं ब्राह्मणाय दद्यात् ।
भ्रूणहत्यां वा एते घ्नन्ति । ये ब्राह्मणास्त्रिसुपर्णं पठन्ति ॥
ते सोमं प्राप्नुवन्ति । आसहस्रात्पङ्क्तिं पुनन्ति ॥ (२९)

**अन्वयार्थ—**' यः इमं त्रिसुपर्णं अयाचितं ब्राह्मणाय दद्यात्-' जो कोणी हा त्रिसुपर्ण मंत्र याचना केल्यावांचून ब्राह्मणाला देतो तो महापुण्यवान् होय. ' ये ब्राह्मणाः त्रिसुपर्णं पठन्ति ते एते भ्रूणहत्यां घ्नन्ति वै-' जे ब्राह्मण या त्रिसुपर्णाचा जप करितात ते ब्राह्मणगर्भाच्या अथवा क्षत्रिय-गर्भाच्या हत्येचा नाश करितात. म्ह० भ्रूणहत्या दोषापासून मुक्त होतात. ' ते सोमं प्राप्नुवन्ति-' ते सोमयागाच्या फलाला प्राप्त होतात. 'आसहस्रात् पङ्क्तिं पुनन्ति-' पंक्तींतील एक सहस्र लोकांना पावन करितात. ' ॐ-' प्रणवप्रतिपाद्य परमात्माच याची देवता आहे. (२९)

---

आतां तिसरा त्रिसुपर्ण मंत्र सांगतात—

ब्रह्म मेधवा । मधु मेधवा । ब्रह्ममेव मधु मेधवा ॥
ब्रह्मा देवानां पदवीः कवीनामृषिर्विप्राणां महिषो मृगाणाम् ॥
श्येनो गृध्राणाꣳ स्वधितिर्वनानाꣳ सोमः पवित्रमत्येति रेभन् ॥
हꣳसः शुचिषद्वसुरन्तरिक्षसद्धोता वेदिषदतिथिर्दुरोणसत् ॥
नृषद्वरसदृतसद्व्योमसदब्जा गोजा ऋतजा अद्रिजा ऋतं बृहत् ॥

**अन्वयार्थ**—' मम मेधया- ' मम मेधवत् आहे म्ह० यज्ञ-दानादिकांनीं प्राप्त होणारी जी जिज्ञासा तिच्या योगानें ब्रह्मज्ञानाचा लाभ होतो. ' मधु मेधया ' तसेंच मधु मेधवत् आहे. मधु म्हणजे मेधवत् आहे. ( या पुढील अन्वयार्थ मागें पृष्ठ ३२, ३३ वांतर आहे. )

ऋचे त्वा रुचे त्वा समित्स्रवन्ति सरितो न धेनाः ।

अन्तर्हृदा मनसा पूयमानाः । घृतस्य धारा अभिचकाकशीमि ॥

**अन्वयार्थ**—( ब्रह्मा, विष्णु, महेश्वर किंवा विश्व, तैजस, प्राज्ञ अथवा विराट्, हिरण्यगर्भ, ईश्वर हे तीन सुपर्ण-पक्षी ज्याच्याप्यासून उत्पन्न झाले त्या परमात्म्याला त्रिसुपर्ण म्हणतात. त्या त्रिसुपर्णाचें प्रतिपादन करणारा हा मन्त्रही त्रिसुपर्ण होय. यास्तव ) ' हे ऋचे, त्वा रुचे समित् निक्षिप्यते ' हे ऋचे, ऋग्वेदरूप अशा तुला उद्देशून ही समिध अग्नीमध्यें वेदप्राप्त्यर्थं दिली जाते. ' सरितः न धेनाः अन्तर्हृदा मनसा पूयमानाः घृतस्य धाराः स्रवन्ति ' मी अग्नीमध्यें टाकलेल्या ह्या नद्यांसारख्या, देवांकडून प्याल्या जाणाऱ्या व हृदयस्थ मनानें पवित्र केल्या जाणाऱ्या घृताच्या धारा तुजकडे वहात आहेत. ' एवंविधाः आज्यधाराः अभिचाकशीमि- ' अशा प्रकारच्या या घृतधारा मी सर्व देवतांना देतों.

हिरण्ययो वेतसो मध्य आसाम् ।

तस्मिन्त्सुपर्णो मधुकृत्कुलायी भजन्नास्ते मधु देवताभ्यः ॥

तस्याऽऽसते हरयः सप्त तीरे स्वधां दुहाना अमृतस्य धाराम् ॥

**अन्वयार्थ**—' आसां मध्ये तस्मिन् सुपर्णः देवताभ्यः मधु भजन् आस्ते ' या पूर्वोक्त घृतधारांमध्यें त्या आहवनीय अग्नींत त्रिसुपर्ण ( परमात्मा ) सर्व देवतांना मधुर हवि वांटून देत राहतो. ' यः हिरण्ययः वेतसः मधुकृत् कुलायी आस्ते ' तो तेजोमय, बहुद्रव्यवान्, स्वर्गादि सुख देणारा व सर्व प्राण्यांच्या देहरूपी घरट्यांचा आश्रय आहे, ' तस्य तीरे सप्त हरयः अमृतस्य धारा दुहानाः आसते ' अशा प्र .रच्या त्या परमात्म्याच्या समीप केवळ स्मरणानेंच पाप हरण करणाऱ्या अमृताच्या .रेसारख्या स्वधेला म्ह० हव्यद्रव्याच्या परंपरेला त्या त्या देवतेस पोंचविणारे सात ऋषि राहतात.

य इदं त्रिसुपर्णमयाचितं ब्राह्मणाय दद्यात् ॥

वीरहत्यां वा एते घ्नन्ति । ये ब्राह्मणास्त्रिसुपर्णं पठन्ति ॥

ते सोमं प्राप्नुवन्ति । आसहस्रात्पङ्क्तिं पुनन्ति ॥ ॐ ॥ ( ४० )

**अन्वयार्थ**—' यः इदं त्रिसुपर्णं अयाचितम्० ' इत्यादि अन्वय पूर्वीप्रमाणें व अर्थहि पूर्वीप्रमाणेंच. केवळ वेद-शास्त्रसंपन्न व वेद-शास्त्रोक्त अनुष्ठान करणारा ब्राह्मण किंवा अभिषिक्त राजा हा वीरशब्दाचा अर्थ आहे. ४०

ब्रह्मज्ञानाला प्रतिबन्ध करणाऱ्या महा पातकांची निवृत्ति करण्यासाठीं तीन जप्य त्रिसुपर्ण मंत्र सांगितले.त्यांतील केवल ब्राह्मणजातीच्या पुरुषाचा वध करणें ही ब्रह्महत्या असून तें पंच महापातकांतील प्रबल महापातक आहे. भ्रूणहत्या त्याहून अधिक व वीरहत्या त्याहूनही अधिक आहे. पण या त्रिसुपर्ण मंत्रांचा जप यावज्जीव केल्यास तो तसल्या पातकांचेंही जर निवर्तन करतो तर तो जप सुरापानादि त्याहून निकृष्ट असलेल्या पापांचें निवर्तन करतो, हें काय सांगावें ! अशा रीतीनें प्रतिबन्धाच्या निवृत्तीचा उपाय सांगून जीवात्म्याच्या ईश्वराशीं असलेल्या अभेदाचें ज्ञान व्हावें म्हणून धारणाशक्तीच्या अभिमानी देवतेची प्रार्थना करण्यासाठींच ऋचा सांगतात.

मेधा देवी जुषमाणा न आगाद्विश्वाची भद्रा सुमनस्यमाना ।
त्वया जुष्टा नुदमाना दुरुक्तान्बृहद्वदेम विदथे सुवीराः ॥

**अन्वयार्थ**—' मेधा, देवी, विश्वाची, भद्रा, सुमनस्यमाना जुषमाणा सती नः आगात्-' ग्रन्थ व त्याचा अर्थ यांना धारण करणारी शक्ति ( म्ह० मेधा ), तिची अभिमानी देवी, विश्वव्यापिनी, कल्याणी, आम्हांवर अनुग्रह करील, अशा प्रकारच्या सुमनाची इच्छा करणारी देवी संतुष्ट होत्साती आम्हांकडे येवो. ' हे देवि, त्वया जुष्टाः दुरुक्तान् नुदमानाः सुवीराः विदथे बृहत् वदेम- ' हे देवि, तूं ज्यांच्यावर अनुग्रह केला आहेस त्याप्रमाणें पुरुषार्थाच्या उपयोगी नसलेलें वेदबाह्य अर्थ ज्यांनीं सोडले आहेत म्ह० जे केवल वेदनिष्ठ आहेत तसेच जे उत्तम पुत्र, शिष्य इत्यादिरूप आहेत ते आम्ही यज्ञाचें अनुष्ठान केलें असतां शुद्धान्तःकरणयुक्त होऊन परब्रह्म तत्त्वाचें कथन करतों.

त्वया जुष्ट ऋषिर्भवति देवि त्वया ब्रह्मागतश्रीरुत त्वया ॥
जुष्टश्चित्रं विन्दते वसु सा नो जुषस्व द्रविणो न मेधे ( ४१ )

**अन्वयार्थ**—' हे देवि मेधे, त्वया जुष्टः ऋषिः भवति-' हे देवि मेधे, तुजकडून अनुग्रह केला गेलेला पुरुष ऋषि म्ह० अतीन्द्रियार्थदर्शी होतो. ' त्वया जुष्टः पुरुषः ब्रह्मा भवति-' तसाच तुजकडून अनुग्रह केला गेलेला पुरुष ब्रह्मा-हिरण्यगर्भ होतो. ' उत त्वया जुष्टः आगतश्रीः भवति- ' आणि तुजकडून अनुगृहीत झालेला संपत्तिमान् होतो. ' त्वया जुष्टः चित्रं वसु विन्दते-' म्हणूनच तुजकडून अनुगृहित झालेला पुरुष पशु, सुवर्ण, धान्य इत्यादि विविध धनास प्राप्त होतो. ' हे मेधे, सा त्वं नः द्रविणः न जुषस्व-' हे मेधे, तशा तऱ्हेची तूं आम्हांवर धनाढ्याप्रमाणें अनुग्रह कर. ( म्ह० ज्याप्रमाणें एखाद्या धनपतीनें अनुग्रह केला असतां दरिद्रीही कृतार्थ होतो, त्याप्रमाणें मी कृतार्थ होईन. ) ( ४१ )

---

आतां मेधा देणाऱ्या देवतांची प्रार्थना करण्यासाठीं मंत्र—

मेधां म इन्द्रो दधातु मेधां देवी सरस्वती ॥
मेधां मे अश्विनावुभावाधत्तां पुष्करस्रजा ॥

अन्वयार्थ—' इन्द्रः मे मेधा ददातु ' इन्द्र मला मेधा देवो. ' देवी सरस्वती मेधां ददातु ' देवी सरस्वती मला मेधा देवो. ' पुष्करस्रजा उभौ अश्विनौ मे मेधां आधत्तां ' कमलमालांनीं युक्त असलेले अश्विनीकुमार मला मेधा देवोत.

अप्सरासु च या मेधा गन्धर्वेषु च यन्मनः ॥
दैवीं मेधा सरस्वती सा मां मेधा सुरभिर्जुषताऽस्वाहा ( ४२ )

अन्वयार्थ—' अप्सरासु या मेधा च गन्धर्वेषु यत् मनः दैवीं मेधा सरस्वती सा सुरभिः मां जुषतां स्वाहा ' देव-स्त्रियांमध्यें जी मेधा आहे, गन्धर्वांमध्यें जें मेधारूप मन आहे, हिरण्यगर्भादि देवामध्यें जी मेधा आहे आणि वेदशास्त्ररूप जी मेधा आहे ती सर्व सुगन्धयुक्त अथवा सर्व कामनापूर्ण करणारी होऊन माझें सेवन करो. ( ४२ )

---

आ मां मेधा सुरभिर्विश्वरूपा हिरण्यवर्णा जगती जगम्या ऊर्जस्वती पयसा पिन्वमाना सा मां मेधा सुप्रतीका जुषन्ताम् ( ४३ )

अन्वयार्थ—' सुरभिः, विश्वरूपा, हिरण्यवर्णा, जगती, जगम्या, ऊर्जस्वती पयसा पिन्वमाना मेधा मां आगच्छतु ' सुगन्धयुक्त अथवा कामना पूर्ण करणारी, बहुरूप देवता, शरीरांत सुवर्णासारख्या वर्णानें युक्त असलेली, जगद्रूप, पुरुषार्थयुक्त पुरुषांना गमन करण्यास अत्यन्त योग्य, बलवती व दुग्धादि रसांनें आम्हांला संतुष्ट करणारी धारणाशक्ति मजकडे सर्व प्रकारें येवो. 'सा मेधा सुप्रतीका मा जुषन्ताम् ' तशा गुणांनीं युक्त असलेली ती मेधा सुखी होऊन माझें सेवन करो. ( ४३ )

---

पुनरपि मेधादिकांच्या सिद्धीकरितां अग्नि, इन्द्र व सूर्य यांच्या प्रार्थनेचा मन्त्र—

मयि मेधा मयि प्रजां मय्यग्निस्तेजो दधातु । मयि मेधां मयि प्रजां मयीन्द्र इन्द्रियं दधातु । मयि मेधां मयि प्रजां मयि सूर्यो भ्राजो दधातु ॥

अन्वयार्थ—' अग्निः मयि मेधां, मयि प्रजां, मयि तेजः दधातु ' अग्नि माझ्या ठिकाणीं मेधा, अविच्छिन्न सन्तति व तेज देवो. ' इन्द्रः मयि मेधां, प्रजां, इन्द्रियं दधातु ' इन्द्र माझ्या ठिकाणी मेधा, अविच्छिन्न सन्तति व वीर्यपुष्टि करो. ' सूर्यः मयि मेधां, प्रजां, भ्राजः दधातु ' सूर्य माझ्या ठिकाणीं मेधा, अविच्छिन्न सन्तति व भ्राज देवो. ( एखाद्याच्या तोंडाकडे पाहतांच भीति उत्पन्न करणारें जें मुखतेज त्याला भ्राज म्हणतात. ) (४४)

---

या पुढील ऋचेनें परमात्म्यापासून आपल्या अभीष्टाची याचना करतो.

अपैतु मृत्युरमृतं न आगन्वैवस्वतो नो अभयं कृणोतु ।
पर्णं वनस्पतेरिवाभि नः शीयताऽ रयिः सचतां नः शचीपतिः ॥ (४५)

**अन्वयार्थ**—' हे परमात्मन्, मृत्युः अस्मत्तः अपैतु-' हे परमात्म्या, मृत्यु आम्हांपासून दूर होवो. ' अत एव नः अमृतं आगन्-' त्यामुळेंच आम्हांकडे मोक्ष येवो. 'वैवस्वतः नः अभयं कृणोतु-' त्यामुळेंच वैवस्वत यम आम्हांस अभय करो. म्हणजे आम्हांला नरकदुःख न देवो. ' नः पापं वनस्पतेः पर्णं इव अभिशीयताम्-' आमचें पाप अश्वत्थादि वनस्पतींच्या पर्णाप्रमाणें क्षीण होऊन नाश पावो.; ' नः शचीपतिः रयिः सचताम्-' आम्हांला इन्द्राच्या उपभोगास योग्य असें महत् ऐश्वर्य प्राप्त होवो. ( ४५ )

---

परं मृत्यो अनु परेहि पन्थां यस्ते स्व इतरो देवयानात् ।
चक्षुष्मते शृण्वते ते ब्रवीमि मा नः प्रजाꣳ रीरिषो मोत वीरान् ॥(४६)

**अन्वयार्थ**—' हे मृत्यो, देवयानात् यः इतरः ते स्वः पन्थाः अस्ति तं परं पन्था ( पन्थानं ) अनुपरेहि-' हे मृत्यो, देवयान मार्ग व पितृयाण मार्ग या दोन्ही मार्गांहून भिन्न जो तुझा स्वतःचा मार्ग आहे त्या श्रेष्ठ मार्गानें तूं जा. ' उत नः प्रजां वीरान् मा रीरिषः ' त्याचप्रमाणें आमच्या प्रजेची व भृत्यांचीही हिंसा करूं नकोस. ' चक्षुष्मते शृण्वते ते ब्रवीमि-' दर्शनशक्ति व श्रवणशक्ति यांनीं युक्त असलेल्या तुला मी हें बोलत आहें. ( यास्तव तू मजकडे पाहून माझी ही प्रार्थना सफल कर.) (४६)

---

वातं प्राणं मनसान्वारभामहे प्रजापतिं यो भुवनस्य गोपाः ।
स नो मृत्योस्त्रायतां पात्वꣳहसो ज्योग्जीवा जरामशीमहि ४७

**अन्वयार्थ**—' वयं तं प्राणं, वातं यः भुवनस्य गोपाः तं प्रजापतिं मनसा अन्वारभे-' आम्ही सर्व पिण्डांतील प्राणरूप, अन्तरिक्षस्थ वायुरूप ब्रह्माण्डाचा रक्षक अशा परमात्म्याला अन्तरंगानें चिन्तितों. ( त्याच्या सत्तेनें प्रत्येक कार्य करितों.) ' सः नः मृत्योः त्रायतां -' तो प्रजापति आमचें मृत्यूपासून रक्षण करो. ' अंहसः पातु-' आम्हांला पापापासून सोडवो. 'ज्योग्जीवाः सन्तः वार्धक्यावस्थां अशीमहि- ' आम्ही चिरजीव होऊन वार्धक्यावस्थेचा अनुभव घेऊं असें करो. ( ४७ )

---

अमुत्रभूयादध यद्यमस्य बृहस्पतेरभिशस्तेरमुञ्चः ।
प्रत्यौहतामश्विना मृत्युमस्माद्देवानामग्ने भिषजा शचीभिः ॥ ४८

**अन्वयार्थ**—' हे बृहस्पते, यमस्य यत् भयं तस्मात् मां अमुञ्च-' देववाणींना पति अशा हे बृहस्पते परमात्म्या, आम्हांला यमाच्या भयापासून सोडीव. 'अभिशस्तेः अपि मां अमुञ्चः 'अपयशापासूनहि मुक्त कर.'अध अमुत्रभूयात्(परलोकभवेन सुखेन मां संयोजय).' त्यानंतर परलोकसंबंधीं सुखानें युक्त कर. 'अश्विनौ (देववैद्यौ) अस्मात् मृत्युं प्रत्यौहताम्-' तसेंच अश्विनीकुमार या नांवाचे देव-वैद्य आम्हांपासून मृत्यूला दूर करोत. 'हे अग्ने, देवानां भिषजा त्वया अहं रक्षणीयः- ' हे अग्ने, देवांचा वैद्य अशा तुजकडून मी रक्षणीय आहें. 'शचीभिः त्वं संयोजय-' इन्द्रपत्नीशीं ह्म• ऐश्वर्याशीं आमचा संयोग कर. ( ४८ )

---

हरिं॒ हर॑न्त॒मनु॑यन्ति दे॒वा विश्व॒स्येशा॑नं वृष॒भं म॑ती॒नाम् ।
ब्रह्म॒ सरू॑प॒मनु॑ मे॒दमा॑गा॒दय॑नं॒ मा वि॑व॒धीर्विक्र॑मस्व ॥ ( ४९ )

अन्वयार्थ—( 'हे परमात्मन्, हरिं, पापं हरन्तं, विश्वस्य ईशानं, मतीनां वृषभं देवाः अनुयन्ति-'हे परमात्म्या, विष्णुरूप, भक्तांच्या पापांचें हरण करणारा, सर्व जगाचा ईश, व प्राण्यांच्या बुद्धींचा श्रेष्ठ नियन्ता अशा तुझें अनुकरण सर्व देव करितात. 'त्वद्-नुमहात् सरूपं इदं ब्रह्म मे अनु आगात्-'तुझ्या अनुमहानें अपशब्दादि वैषम्यानें रहित व सर्व द्विजांकडून प्रशस्त अध्ययन केलें जाणारें असें हें ब्रह्म ( इ० चार वेद ) मला प्राप्त होवो. 'अयनं मा विवधीः-' त्व चरमार्गे आम्हीं संपादन केलेल्या मोक्षमार्गाची हिंसा करूं नकोस. 'किंतु विक्रमस्व-'तर तो देण्यासाठीं उद्यम कर. ( ४९ )

शल्कैर॒ग्निमि॑न्धा॒न उ॒भौ लो॒कौ स॑नेम॒हम् ।
उ॒भयो॑र्लो॒कयो॑र्‌ऋ॒द्ध्वाऽति॑ मृ॒त्युं त॑राम्य॒हम् ॥ (५०)

अन्वयार्थ—' हे भगवन्, ( त्वदनुमहात् ) शल्कैः अग्निं इन्धानः अहं उभौ लोकौ सनेम्-' हे भगवन्, तुझ्या अनुमहानें समिधरूप शुष्क काष्ठांनीं आहवनीयादि अग्नीला दीप्त करणारा मी दोन्ही लोकांस प्राप्त होतों ( म्ह० सत्कर्मानें दोन्ही लोक सिद्ध होतात.) अत एव उभयो. लोकयोः ऋद्ध्वा अहं अतिमृत्युं तरामि-' म्हणूनच दोन्ही लोकांस प्राप्त होऊन मी अतिमृत्यूचें उल्लंघन करितों. ( म्ह० आयुष्य असेपर्यंत ऐहिक भोग भोगून अन्तीं देव होतों, असा याचा भावार्थ. (५०)

मा छि॑दो मृत्यो॒ मा व॑धी॒र्मा मे॒ बलं॒ विवृ॑हो॒ मा मा॒ प्र मो॑षीः ।
प्र॒जां मा मे॑ रीरिष॒ आयु॑रुग्र नृ॒चक्ष॑सं त्वा ह॒विषा॑ विधेम ॥ ५१

अन्वयार्थ—' हे मृत्यो, हे उग्र, त्वं बोधं मा छिदः-' हे मृत्यो, हे क्रूरा, माझ्या बोधाचा विच्छेद करू नकोस 'सत्कर्मानुष्ठानं मा वधीः-' आमच्या सत्कर्मानुष्ठानाचा विघात करू नकोस, 'मे बलं मा विवृहः-' माझें शरीरबल नाहींसें करूं नकोस. 'परलोकसाधनं मा प्रमोषीः ' माझ्या परलोक-साधनाचा अपहार करू नकोस. 'मे प्रजां आयुः च मा रीरिष -' माझी प्रजा व आयुष्य याचा क्षय करू नकोस. 'तदर्थं नृचक्षसं त्वा हविषा विधेम-' त्यासाठीं प्राण्यांच्या पुण्य-पापांचें परीक्षण करणाऱ्या, त्यांना पाहणाऱ्या तुझी हविष्प्रदानानें परिचर्या करितों ( ५१ )

मा नो॑ म॒हान्त॑मु॒त मा नो॑ अर्भ॒कं मा न॒ उक्ष॑न्तमु॒त मा न॑ उक्षि॒तम् ।
मा नो॑ वधीः पि॒तरं॒ मोत मा॒तरं॑ प्रि॒या मा न॑स्त॒न्वो॑ रुद्र रीरिषः ॥(५२)

अन्वयार्थ—' हे रुद्र, नः महान्तं मा वधीः-' दुष्टांना रडविणाऱ्या रुद्रा, आमच्या गुरु प्रभृति पूज्यवर्गास मारू नकोस. ' अर्भकं, उक्षन्तं, उक्षितं, पितरं मातरं उत मा

वधीः-' त्याचप्रमाणें स्तनपान करणाऱ्या अर्भकास, तरुणास, गर्भस्थ पिण्डास, पित्याला अथवा मातेला मारूं नकोस. 'हे रुद्र, प्रियाः नः तनुवः (तनूः) मा रीरिषः-' हे रुद्रा, आम्हांला इष्ट असलेल्या ज्या आमच्या तनू (शरीरें) त्यांची हिंसा करूं नकोस. (५२)

मा नस्तोके तनये मा न आयुषि मा नो गोषु मा नो अश्वेषु रीरिषः ।
वीरान्मा नो रुद्र भामितो वधीर्हविष्मन्तो नमसा विधेम ते ॥ (५३)

अन्वयार्थ—'हे रुद्र, भामितः सन् नः तोके मा, तनये मा, नः आयुषि मा, नः गोषु मा, च नः अश्वेषु मा रीरिषः-' हे रुद्रा, आमच्या अपराधामुळें क्रोधाविष्ट होऊन तूं आमच्या अर्भकाला, तरुण पुत्राला, आयुष्याला, गाईंना व घोड्यांना (एकंदरींत सर्वस्वाला) क्षीण करूं नकोस. 'हे रुद्र, हविष्मन्तः वयं ते नमसा विधेम-' यथाशास्त्र संपादन केलेल्या हवींनीं युक्त असलेले आम्ही प्रणामानें तुझी पूजा करितों. (५३)

प्रजापते न त्वदेतान्यन्यो विश्वा जातानि परि ता बभूव ।
यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तु वयꣳ स्याम पतयो रयीणाम् ॥ (५४)

अन्वयार्थ—'हे प्रजापते, त्वद् जातानि एतानि विश्वा भूतानि ता अन्यः न तु परिबभूव-' हे प्रजापते, पार्वतीवल्लभ, हीं जीं तुझ्यापासून झालेलीं भूतें (म्ह० देवादि प्राणी, चवदा भुवनें, नानाप्रकारचीं ब्रह्माण्डें) त्यांचा संहार तुजवांचून दुसरा कोणी करीत नाहीं. तर सृष्टिसमयीं तूंच त्यांना उत्पन्न करतोस, स्थितिसमयीं तूंच त्यांचें पालन करतोस व प्रलयकालीं तूंच त्यांचा संहार करतोस. 'तस्मात् ते जुहुमः-' यास्तव मी तुज भगवानाला उद्देशून होम करितों. 'यत्कामाः वय जुहुमः तत् नः अस्तु' आम्ही ज्याविषयीं अभिलाष धरून होम करितों, तो तो पदार्थ आम्हांला प्राप्त होवो. 'वयं रयीणां पतयः स्याम-' आम्हीं विद्या, विनय आणि ऐहिक व पारमार्थिक संपत्ति यांचे स्वामी व्हावें. (ब्राह्मणभोजनादि प्रसंगीं पार्वती-पतीच्या प्रीत्यर्थ उदक सोडतांना याच मंत्राचा विनियोग केला आहे. त्यापक्षीं 'जुहुमः' या शब्दाचा अर्थ ब्राह्मणमुखरूप अग्नींत मिष्टान्नरूप हवीचा त्याग करितों असा करावा. ५४)

स्वस्तिदा विशस्पतिर्वृत्रहा विमृधो वशी ।
वृषेन्द्रः पुर एतु नः स्वस्तिदा अभयंकरः ॥ (५५)

अन्वयार्थ—'स्वस्तिदा, विशस्पतिः, वृत्रहा, विमृध, वशी, वृषा, स्वस्तिदा, अभयंकरः इन्द्रः, नः पुरः एतु-' मृत्युलोकचें सुख देणारा, नानाविध प्रजेचा स्वामी, वृत्रासुराला मारणारा, राक्षसजातीचें मर्दन करणारा, त्रैलोक्याला आपले स्वाधीन ठेवणारा, पावसाद्वारें वर्षाव करणारा, पारलौकिक शुभ देणारा व आपल्या आश्रितांना निर्भय करणारा इन्द्र इतस्ततः गमन करणाऱ्या आमच्या समोर आमचें रक्षण करावयास येवो. (५५)

त्र्यम्बकं यजामहे सुगन्धि पुष्टिवर्धनम् ।
उर्वारुकमिव बन्धनान्मृत्योर्मुक्षीय माऽमृतात् ॥ ( ५६ )

अन्वयार्थ—'हे भगवन् पार्वतीपते,त्वां त्र्यंबकं सुगन्धि पुष्टिवर्धनं यजामहे-' हे भगवन्, मी तुज त्रिनेत्र, सुगन्धयुक्त, लौकिक व वैदिक पुष्टि देणाऱ्या पार्वती-पतीची पूजा करितों. ' उर्वारुकं बन्धनात् इव मृत्योः मुक्षीय-' हे भगवन्, संध्या-वंदनादि सत्कर्मांच्या योगानें तुझें पूजन करून, पिकलेलें वाळूक वगैरे देंठापासून जसें सुटतें तसे आम्ही मृत्यूपासून मुक्त व्हावें ' अमृतात् मा-' पण मोक्षापासून वियुक्त होऊं नये. (५६)

---

ये ते सहस्रमयुतं पाशा मृत्यो मर्त्याय हन्तवे ।
तान्यज्ञस्य मायया सर्वानवयजामहे ॥ ( ५७ )

अन्वयार्थ—' हे मृत्यो, मर्त्याय हन्तवे सहस्रं, अयुतं ये ते पाशाः तान् सर्वान् यज्ञस्य मायया अवयजामहे-' हे मृत्यो, मर्त्यांना मारण्यासाठीं तुझे जे सहस्र किंवा दशसहस्र पाश आहेत त्या सर्वांचें सत्कर्मानुष्ठानाच्या बळानें आम्ही निवारण करितों. येथील मायाशब्द शक्ति, बल याअर्थी आहे. (५७)

---

मृत्यवे स्वाहा मृत्यवे स्वाहा ॥ ( ५८ )

अन्वयार्थ—' मृत्यवे स्वाहा मृत्यवे स्वाहा-' ज्याच्या योगानें प्राणी मरतात त्या मृत्युला उद्देशून दिलेलें हें आज्य सुहुत असो. ( सर्व पापांच्या नाशाकरितां येथें हे दोन मंत्र सांगितले आहेत. (५८).

---

देवकृतस्यैनसोऽवयजनमसि स्वाहा । मनुष्यकृतस्यैनसोऽवयजनमसि स्वाहा॥
पितृकृतस्यैनसोऽवयजनमसि स्वाहा । आत्मकृतस्यैनसोऽवयजनमसि स्वाहा॥
अन्यकृतस्यैनसोऽवयजनमसि स्वाहा । अस्मत्कृतस्यैनसोऽवयजनमसि स्वाहा॥
यद्दिवा च नक्तं चैनश्चकृम तस्यावयजनमसि स्वाहा ।
यत्स्वपन्तश्च जाग्रतश्चैनश्चकृम तस्यावयजनमसि स्वाहा ॥
यत्सुषुप्तश्च जाग्रतश्चैनश्चकृम तस्यावयजनमसि स्वाहा ।
यद्विद्वांसश्चाविद्वांसश्चैनश्चकृम तस्यावयजनमसि स्वाहा ।
एनस एनसोऽवयजनमसि स्वाहा ॥ ( ५९ )

अन्वयार्थ—' हे आज्य, त्वं देवकृतस्य, मनुष्यकृतस्य, पितृकृतस्य, आत्मकृतस्य, अन्यकृतस्य, अस्मत्कृतस्य एनसः अवयजनं असि स्वाहा-' हे घृता, तूं देवकृत (ह्म० देवकर्मामध्यें अगवैकल्यादिरूप अथवा इन्द्रियांच्या योगानें झालेल्या ) पापांचें निवारण करणारें आहेस. यास्तव आमीला उद्देशून दिलेलें हें आज्य सुहुत असो, त्याचप्रमाणें मनु-

ष्याला उद्देशून केलेल्या ( म्ह० धिक्कार, 'अन्न न देणें इत्यादिरूप ) पापाचें निवारक आहेस. पितृकर्मामध्यें घडलेल्या अंगवैकल्यादिरूप पापाचें निवारक आहेस. स्वतः केलेल्या अगम्यागमनादिरूप पापाचें निवारक आहेस. आमच्या भार्यादिकांनीं केलेल्या पापाचें निवारक आहेस. तसेंच आमच्या सजातीयादिकांनीं केलेल्या पापाचें निवारक आहेस. ' दिवा च नक्तं च यत् एनः चकृम स्वपन्तः जाग्रतः च यत् एनः चकृम सुषुप्तः जाग्रतः च एत् एनः चकृम विद्वांसः अविद्वांसः च एत् एनः चकृम तस्य अवयजनं असि स्वाहा-' दिवसा व रात्रीं आम्ही जें पाप केलें आहे त्याचें, स्वप्नांत किंवा जागेपणीं, गाढ झोंप घेत असतांना, ज्ञानतः अथवा अज्ञानतः आम्हीं जें पाप केलें आहे त्या सर्व पापाचें तूं निवारक आहेस. यास्तव अमीला उद्देशून दिलेलें हें घृत सुहुत असो. ' एनसः एनसः अवयजनं असि स्वाहा-' तू प्रत्येक पापाचें निवारण करणारें आहेस स्वाहा (५९)

---

यद्वो देवाश्चकृम जिह्वया गुरुमनसो वा प्रयुती देवहेडनम् ।
अरा वायो नो अभि दुच्छुनायते तस्मिन्तदेनो वसवो निधेतन स्वाहा ॥६०

अन्वयार्थ—' हे वसवः, गुरुमनसः, देवाः, वः उद्दिश्य यत् प्रयुती देवहेडनं जिह्वया वयं चकृम तत् एनः तस्मिन् निधेतन-' सर्व प्राण्यांचा निवास करविणाऱ्या व गम्भीर मनानें युक्त असलेल्या हे देवांनो, तुम्हांला उद्देशून मी जी असह्यात विडम्बना जिह्वेनें ( वाणीनें ) केली आहे त्याचें पाप तुम्ही आपल्या मनामध्यें ठेवा. ( म्हणजे वाणीनें त्याचा उच्चार करूं नका. म्हणजे आमचा तो अपराध सहन करा. ) ' हे वायो, नः अभिदुच्छुनायते अरा स्वाहा-' हे वायो, आमचें जें पाप दुष्ट कुत्र्याप्रमाणें आचरण करीत आहे तें तुम्ही त्या तुमच्या गम्भीर मनांत ठेवा. कारण तें पाप मरण देणारें आहे. त्यासाठीं हें आज्य त्या देवांना उद्देशून सुहुत असो. ( ६० )

---

कामोऽकार्षीन्नमो नमः । कामोऽकार्षीत्कामः करोति नाहं करोमि कामः कर्ता नाहं कर्ता कामः कारयिता । नाहं कारयिता । एष ते काम कामाय स्वाहा ॥ ( ६१ )

अन्वयार्थ—' हे देवाः युष्मभ्यं नमो नमः पूर्वोक्तानि पापानि कामः अकार्षीत्-' अहो सर्व देवांनो, तुम्हांला वारंवार नमस्कार असो. पूर्वोक्त पापें कामानें केलेलीं आहेत. 'कामः अकार्षीत् कामः करोति-' खरोखर तीं कामानें केलीं आहेत. कामच करतो.' अहं न करोमि-' मी करीत नाहीं.' कामः कर्ता । अहं न कर्ता ' कामच कर्ता आहे. मी कर्ता नव्हे. ' कामः कारयिता । अहं न कारयिता-' कारण तो कामच सर्व जगाला आपल्या अधीन करून घेऊन त्याच्याकडून पाप करविणारा आहे. मी तें करविणारा नव्हे. 'हे काम, ते कामाय एषः स्वाहा-' हे कामा, त्या पापाच्या निवृत्त्यर्थ तुज सुंदर देवाला उद्देशून दिलेला हा आज्य-भाग सुहुत होवो. ( ६१ )

---

मन्युरकार्षीन्नमो नमः । मन्युरकार्षीन्मन्युः करोति नाहं करोमि मन्युः कर्ता नाहं कर्ता मन्युः कारयिता नाहं कारयिता । एष ते मन्यो मन्यवे स्वाहा ॥ ( ६२ )

अन्वयार्थ—' मन्युः अकार्षीत्-' कोपाभिमानी देवानें पाप केलें आहे.' हे देवाः युष्मभ्यं नमो नमः-' हे देवांनो, तुम्हांला वारंवार नमस्कार असो. 'मन्युः अकार्षीत्-' मन्यूनें पाप केलें आहे.' मन्युः करोति । अहं न करोमि । इत्यादि पूर्ववत्-' मन्यु ह्या० कोपदेवच तें करितो, मी करीत नाहीं. मन्यु कर्ता आहे. मी कर्ता नव्हे. मन्यु करविता आहे. मी करविता नव्हे. हे मन्यो, तुज क्रोधरूप देवाला उद्देशून दिलेला हा आज्य-भाग सुहुत होवो. ( ६१ )

---

आतां यापुढें सर्वोत्कृष्ट चतुर्थाश्रमाचा स्वीकार करीत असतांना तदंगभूत विरजा होम-कर्मामध्यें ज्यांचा विनियोग केला आहे ते सर्व पाप-निवारक मंत्र सांगतात—

तिलाञ्जुहोमि सरसाꣳसपिष्टान्गान्धार मम चित्ते रमन्तु स्वाहा ।
गावो हिरण्यं धनमन्नपानꣳ सर्वेषाꣳ श्रियै स्वाहा ॥
श्रियं च लक्ष्मिं च पुष्टिं च कीर्तिं चानृण्यताम् ॥
ब्रह्मण्यं बहुपुत्रताम् । श्रद्धामेधे प्रजाः संददातु स्वाहा ॥ ( ६३)

अन्वयार्थ—' हे गन्धार, सरसान् सपिष्टान् तिलान् जुहोमि-'हे गन्धार ह्या० उत्तम देहसौरभ्ययुक्त परमात्मन्, तुजसाठीं सरस व सातुप्रभृति -धान्याच्या पिठानें युक्त अशा तिळांचा होम करतों. 'त्वदीयाः पावनाः गुणाः मम चित्ते रमन्तु स्वाहा-' त्याचें फळ म्हणून तुझे पावन गुण माझ्या चित्तांत रममाण होवोत. ( स्वाहाशब्दाचा अर्थ वरील-प्रमाणेंच करावा. )'हे परमात्मन् त्वत्प्रसादात् गावः हिरण्यं धनं अन्नपानं मम सिध्यन्तु-' हे परमात्मन्, तुझ्या प्रसादानें मला गायी, सुवर्ण, इतर धन व अन्नपान मिळो. 'सर्वेषां भोग्यपदार्थानां प्राप्तिः अस्तु-' सर्व भोग्य पदार्थांची प्राप्ति होवो. 'श्रियै इदं हविः स्वाहा-' गजान्त लक्ष्मीसाठीं तुला उद्देशून दिलेला हा हवि सुहुत होवो. ' लक्ष्मीं, पुष्टिं, कीर्तिं, आनृण्यतां, ब्रह्मण्य, बहुपुत्रतां, श्रद्धामेधे, प्रजाः मह्यं प्रददातु स्वाहा-' परमात्मा मला राज्यलक्ष्मी, मोक्षलक्ष्मी, शरीराची पुष्टि, अक्षय कीर्ति, देव, ऋषि व पितर यांच्या ऋणांतून मुक्ति, ब्राह्मणोत्तमत्व, बहुपुत्रत्व, गुरु व वेदान्त यांच्या वाक्यावरील विश्वास वेदशास्त्रार्थाचें ग्रहण व धारण, यांचें पटुत्व, कन्या, नातु इत्यादि देवो. ( ६३ )

---

तिलाः कृष्णास्तिलाः श्वेतास्तिलाः सौम्या वशानुगाः ।
तिलाः पुनन्तु मे पापं यत्किंचिद्दुरितं मयि स्वाहा ॥
चोरस्यान्नं नवश्राद्धं ब्रह्महा गुरुतल्पगः ।
गोस्तेयꣳ सुरापानं भ्रूणहत्या तिला शान्तिꣳ शमयन्तु स्वाहा ॥

श्रीश्च लक्ष्मीश्च पुष्टीश्च कीर्तिं चानृण्यताम् । ब्राह्मण्यं बहुपुत्रताम् ॥
श्रद्धामेधे प्रज्ञा तु जातवेदः संददातु स्वाहा ॥ (६४)

अन्वयार्थ—' हे परमात्मन्, मे यत् किंचित् दुरितं तत् पापं तिलाः पुनन्तु तुभ्यं स्वाहा-' हे परमात्म्या,तुझ्या आज्ञेनें, माझें जें कांहीं अकर्तव्यरूप पाप आहे तें दूर करून तिळ मला पावन करोत. त्याकरितां हा हवि तुला उद्देशून सुहुत होवो. ' किंचित् तिलाः कृष्णाः, केचित् श्वेताः-' त्यांतील कांहीं तिळ काळे आहेत व कांहीं पांढरे आहेत. ' परं तु सर्वे अपि सौम्याः वशानुगाः-' पण ते दोन्ही प्रकारचे तिळ रोगादि उपद्रव न करणारे व आमच्या अधीन राहणारे आहेत. ( स्व० स्वतः धर्मानें संपादन केलेलें धन देऊन ते विकत आणलेले आहेत. चौर्यादि अकृत्यानें संपादन केलेले नाहींत. ) ' हे परमात्मन्, त्वदाज्ञया तिलाः चोरस्य अन्न, नवश्राद्धं, ब्रह्महा, गुरुतल्पगः गोस्तेयं, सुरापानं, भ्रूणहत्या इत्यादि पापानां शमयन्तु स्वाहा-' हे परमात्मन्, तुझ्या आज्ञेनें तिळ चोराचें अन्न, एकोद्दिष्टादि श्राद्धान्नाचें भोजन, ब्रह्महत्या, गुरुस्त्री-गमन, गाईंची चोरी, मद्यप्राशन, गर्भहत्या इत्यादि पापांची शान्ति करोत. त्यासाठीं हा हवि तुला उद्देशून सुहुत असो.' हे जातवेदः, श्रीः, लक्ष्मीः, पुष्टीः, इत्यादि सर्व मह्यं सः संददातु-' हे सर्व ज्ञानाच्या अथवा धनाच्या उत्पादक परमात्म्या,वरील अनुवाकाच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणें तूं मला श्री,लक्ष्मी,पुष्टि, कीर्ति,अनृणता,उत्तम ब्राह्मणत्व,बहुपुत्रत्व श्रद्धा,मेधा व कुशाग्र बुद्धि उत्तम प्रकारें दे.(६४)

---

प्राणापानव्यानोदानसमाना मे शुध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासᳪ स्वाहा । वाङ्मनश्चक्षुःश्रोत्रजिह्वाघ्राणरेतोबुद्ध्याकूतिःसंकल्पा मे शुध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासᳪ स्वाहा ॥ त्वक्चर्ममाᳪसरुधिरमेदोमज्जास्नायवोऽस्थीनि मे शुध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासᳪ स्वाहा । शिरःपाणिपादपार्श्वपृष्ठोरूदरजङ्घाशिश्नोपस्थपायवो मे शुध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासᳪ स्वाहा । उत्तिष्ठ पुरुष हरित पिङ्गल लोहिताक्षि देहि देहि दापयिता मे शुध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासᳪ स्वाहा ॥ (६५)

अन्वयार्थ—' मे प्राणापानव्यानोदानसमानाः शुध्यन्तां-' या आज्यहोमाच्या योगानें प्राणादि पांच वायु शुद्ध होवोत. ' ततः अहं विपाप्मा विरजाः ज्योतिः भूयासं-' त्यामुळें ज्ञान-प्रतिबन्धक पापरहित व पापकारणीभूत रजोगुणानेंही रहित होऊन जें जगत्कारणभूत परब्रह्म तेंच मी व्हावें. त्यासाठीं हें आज्य सुहुत असो. ' मे वाङ्मनश्चक्षुःश्रोत्रजिह्वाघ्राणरेतोबुद्ध्याकूतिः संकल्पाः शुध्यन्तां-' माझीं वागादि-घ्राणान्त इन्द्रियें, गुह्येन्द्रिय, निश्चयात्मिका बुद्धिवृत्ति, अनिश्चयरूप आकूतिवृत्ति व हें चांगलें आहे अशा प्रकारची संकल्पवृत्ति हीं सर्व शुद्ध होवोत. ' अहं विरजाः विपाप्मा ज्योतिः भूयासं स्वाहा-' मी निष्पाप, रजोगुणरहित व स्वप्रकाश परब्रह्म व्हावें स्वाहा. 'मे त्वक्चर्म...स्थीनि शुध्यन्तां

अहं विपाप्मा॰ इत्यादि-' माझ्या स्थूल शरीरांतील त्वचा, चर्म, मांस, रक्त, मेद, मज्जा, स्नायु व अस्थि शुद्ध होवोत व त्यामुळें मीं निष्पाप, रजोगुणरहित व स्वयंप्रकाश व्हावें. स्वाहा. ' शिरःपाणि...... पायवः शुध्यन्ताम् अहं विपाप्मा॰ इत्यादि-' माझ्या स्थूल शरीराचे मस्तक, हात, पाय, कुशी, पाठ, मान्या, उदर, जघा, शिश्न, उपस्थ व पायु हे अवयव शुद्ध होवोत व त्यामुळें मी निष्पाप, रजोगुणरहित व स्वप्रकाश व्हावें. ' इलित, पिङ्गल, लोहिताक्षि, हे पुरुष, उत्तिष्ठ-' हे प्रतिबन्धनिवारक, पिंगलवर्ण व रक्तनयन पुरुषा, ऊठ व॰ औदासिन्य सोडून मजवर अनुग्रह करावयास उद्युक्त हो. ' देहि देहि-' त्याच प्रमाणें मला पुनः पुनः शुद्धि दे. ' दापयिता भव-' त्याचप्रमाणें आचार्याच्या मुखानें तत्त्वज्ञान देणारा हो. ' मे चित्तवृत्तयः शुध्यन्ताम्-' माझ्या चित्तवृत्ति शुद्ध होवोत. ' अहं विपाप्मा, विरजाः, ज्योतिः भूयासं स्वाहा-' मीं निष्पाप, रजोगुणरहित व स्वप्रकाश व्हावें. स्वाहा. (६५)

---

पृथिव्यापस्तेजोवायुराकाशा मे शुध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा । शब्दस्पर्शरूपरसगन्धा मे शुध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा । मनोवाक्कायकर्माणि मे शुध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा । अव्यक्तभावैरहंकारैर्ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा । आत्मा मे शुध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा । अन्तरात्मा मे शुध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा । परमात्मा मे शुध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा । क्षुधे स्वाहा । क्षुत्पिपासाय स्वाहा । विविट्यै स्वाहा । ऋग्विधानाय स्वाहा । कषोत्काय स्वाहा । क्षुत्पिपासामलं ज्येष्ठामलक्ष्मीर्नाशयाम्यहम् । अभूतिमसमृद्धिं च सर्वान्निर्णुद मे पाप्मानꣳ स्वाहा । अन्नमयप्राणमयमनोमयविज्ञानमयमानन्दमयमात्मा मे शुध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा ॥ (६६)

**अन्वयार्थ**—' पृथिव्यापस्तेजोवायुराकाशाः मे शुध्यन्तां अहं विपाप्मा इ॰-' माझ्या शरीराचीं उपादान कारणभूत पृथिव्यादि भूतें शुद्ध होवोत. मी निष्पाप, रजोगुणरहित, स्वयंप्रकाश व्हावें. स्वाहा (पुढील सर्व पर्यायांत ' ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासं स्वाहा ' याचा अर्थ असाच समजावा.) ' शब्दस्पर्शरूपरसगन्धाः मे शुध्यन्तां॰-' माझ्या शरीरांतील पंचमहाभूतांत असणारे जे शब्दादि गुण ते शुद्ध होवोत. ' मनोवाक्कायकर्माणि मे शुध्यन्तां॰-' माझीं मन, वाणी व शरीर यांच्यायोगानें होणारीं कर्मे शुद्ध होवोत. ' हे परमात्मन् अव्यक्तभावैः अहङ्कारैः विमुक्तः भूयासं-' हे परमात्म्या, ज्यांचा अभिप्राय लोकांमध्यें प्रकट केलेला नाहीं, अशा व्यर्थ कर्मांपासून तुझ्या प्रसादानें मीं मुक्त व्हावें. ' मे आत्मा शुध्यन्तां अहं ज्योतिः॰-' माझें शरीर शुद्ध होवो, ' मे अन्तरात्मा

शुध्यन्तां अहं ज्योतिः०' माझें अन्तःकरण शुद्ध होवो; 'परमात्मा मे शुध्यन्तां अहं ज्योतिः०' माझा परमात्मा शुद्ध होवो. (परमात्मा जरी नित्यशुद्ध आहे तरी अविद्या-दोषानें त्याचें प्रतिभान न होणें हीच अशुद्धि आहे आणि त्याचें स्वात्मत्वानें प्रतिभान होणें हीच त्याची शुद्धि आहे.) 'क्षुधे स्वाहा-' क्षुधेच्या अधिष्ठात्री देवतेला उद्देशून दिलेला हा हवि सुहुत असो. 'क्षुत्पिपासाय स्वाहा विविट्यै स्वाहा ऋग्विधानाय स्वाहा कषोत्काय स्वाहा-' क्षुधा व तृषा यांच्या देवतांना, विशेष प्रकारें व्यापणाऱ्या मायाला ऋचांना उत्पन्न करणाऱ्या परमात्म्याला व कार्य-प्रपंचावर उपकार करणाऱ्या परमेश्वराला उद्देशून दिलेला हा हवि सुहुत होवो. 'हे परमात्मन् अहं क्षुत्पिपासामलं लक्ष्म्याः ज्येष्ठां अलक्ष्मीं, अभूतिं, असमृद्धिं एतान् सर्वान् नाशयामि-' हे परमात्मन्, मी तुझ्या प्रसादानें क्षुत्पिपासारूप मळ, लक्ष्मीची वडील बहीण अलक्ष्मी, अनैश्वर्य, धनधान्यादि समृद्धीचा अभाव ह्या सर्वांचा नाश करतों. 'मे पाप्मानं निर्णुद स्वाहा-' तूं माझ्या पापाचा नाश कर आणि त्यासाठीं हें सुहुत असो. 'अन्नमयप्राणमयमनोमयविज्ञानमयं आनन्दमयं आत्मा मे शुध्यन्तां अहं विपाप्मा ज्योतिः विरजाः भूयासं स्वाहा-' वारुणी उपनिषदांत (सार्थ तैत्तिरीयोपनिषदांत) सांगितलेले पञ्च कोश व तद्रूप शरीरेन्द्रियें अधिक शुद्ध होवोत आणि त्यामुळें मी निष्पाप, रजोगुणरहित व स्वप्रकाशक व्हावें (६६)

---

आतां यापुढें वैश्वदेव कर्मांत ज्यांचा विनियोग केला आहे, अशा सहा होममन्त्रांचें व्याख्यान करितात—

अग्नये स्वाहा । विश्वेभ्यो देवेभ्यः स्वाहा ।
ध्रुवाय भूमाय स्वाहा । ध्रुवक्षितये स्वाहा ।
अच्युतक्षितये स्वाहा ॥ अग्नय स्विष्टकृते स्वाहा ॥
धर्माय स्वाहा । अधर्माय स्वाहा ॥
अद्भ्यः स्वाहा ॥ ओषधिवनस्पतिभ्यः स्वाहा ॥
रक्षोदेवजनेभ्यः स्वाहा ॥ गृह्याभ्यः स्वाहा ।
अवसानेभ्यः स्वाहा । अवसानपतिभ्यः स्वाहा ॥
सर्वभूतेभ्यः स्वाहा ॥ कामाय स्वाहा ॥ अन्तरिक्षाय स्वाहा ॥
यदेजति जगति यच्च चेष्टति नाम्नो भागो यन्नाम्ने स्वाहा ॥
पृथिव्यै स्वाहा । अन्तरिक्षाय स्वाहा ।
दिवे स्वाहा । सूर्याय स्वाहा । चन्द्रमसे स्वाहा ।
नक्षत्रेभ्यः स्वाहा । इन्द्राय स्वाहा । बृहस्पतये स्वाहा ।
प्रजापतये स्वाहा । ब्रह्मणे स्वाहा ॥
स्वधापितृभ्यः स्वाहा ॥ नमो रुद्राय पशुपतये स्वाहा ॥

देवेभ्यः स्वाहा ॥ पितृभ्यः स्वधास्तु ॥ भूतेभ्यो नमः ॥ मनुष्येभ्यो हन्ता ॥
प्रजापतये स्वाहा ॥ परमेष्ठिने स्वाहा ॥
यथा कूपः शतधारः सहस्रधारो अक्षितः ।
एवा मे अस्तु धान्यं सहस्रधारमक्षितम् ॥ धनधान्यै स्वाहा ॥
ये भूताः प्रचरन्ति दिवानक्तं बलिमिच्छन्तो वितुदस्य प्रेष्याः ।
तेभ्यो बलिं पुष्टिकामो हरामि मयि पुष्टिं पुष्टिपतिर्दधातु स्वाहा ।

अन्वयार्थ—' अग्नये स्वाहा......परमेष्ठिने स्वाहा-' एवढ्या भागाचा अन्वय सरळ आहे. अग्नि, विश्वेदेव व ध्रुव हे तीन प्रसिद्ध आहेत. ज्याची स्थिति स्थिर असते तो ध्रुवस्थिति, व ज्याची स्थिति च्युत होत नाहीं तो अच्युतस्थिति. प्रमाद, आलस्य इत्यादिकांच्या योगानें दुरिष्ट म्ह० वाईट रीतीनें केलेलें यजन जो स्विष्ट करतो तो स्विष्टकृत्. या देवतांना उद्देशून दिलेलें हें अन्नादि हवि सुहुत असो. ( *यापुढें बलिहरण-कर्मामध्यें ज्यांचा विनियोग केला आहे त्या मन्त्रांचें व्याख्यान–* ) धर्माची देवता, अधर्माची देवता, जलदेवता, ओषधिवनस्पतींची देवता, राक्षस व देवांचे भृत्य, गृहांत असणाऱ्या गृह्य कुलदेवता, गृहाच्या आसपास प्रदेशीं असलेल्या अवसाननांवाच्या देवता, अवसानदेवतांचे स्वामी, पंचभूतें, त्रैलोक्याला मोहित करणारा रति-पति, अन्तरिक्षस्थ वायु, जगांत जें वृक्षादि वस्तुजात वाय्वादि निमित्तानें कांपतें व जें मनुष्यादि गमनागमनादिरूप चेष्टा करितें तें सर्व ज्या परमात्म्याचा भक्षणीय भाग आहे तो परमात्मा, पृथिवी, मध्यलोकाधिष्ठानभूत देवता, द्यौ, सूर्य, चन्द्रमा, नक्षत्रें, इन्द्र, बृहस्पति, प्रजापति, ब्रह्मा, अग्निष्वात्तादि पितर, पशुपति, रुद्र, इन्द्रादि देव, पितर, भूतनांवाचे विशेष देव, मनुष्यें, प्रजापति व परमेष्ठी या सर्वांना उद्देशून दिलेला हा हविर्भाग सुहुत असो. ( *वरील मंत्रांत स्वधा, नमः व हन्ता हे तीन शब्द पितर, रुद्र व भूतें, आणि मनुष्य यांना उद्देशून अन्नभाग देतांना* स्वाहाशब्दाप्रमाणेंच योजिले आहेत. ' यथा कूपः शतधारः, सहस्रधारः अपि अक्षितः एवा ( एवं ) मे सहस्रधारं अक्षितं धान्यं अस्तु धनधान्यै स्वाहा-' ज्याप्रमाणें कूप म्ह० जलाशय शेंकडों व सहस्रावधि धारांनीं युक्त असला तरी म्ह० त्यांतील उदक कितीही जरी काढून घेतलें तरी क्षीण होत नाहीं त्याप्रमाणें परमात्म्याच्या प्रसादानें मला सहस्रधारांनीं युक्त पण अक्षय्य धान्य प्राप्त होवो. त्यासाठीं हें अन्न धनधान्यी देवतेला उद्देशून सुहुत असो. ' ये वितुदस्य प्रेष्याः भूताः बलिं इच्छन्तः सन्तः दिवानक्तं प्रचरन्ति तेभ्यः अहं पुष्टिकामः भूमौ बलिं हरामि पुष्टिपतिः मयि पुष्टिं दधातु-' पापी प्राण्यांना पीडा देणाऱ्या भगवान् कालाग्निरुद्राचे भृत्य, असे जे भूत ( विशेष प्रकारचे ग्रह ) आहाराची इच्छा करीत अहोरात्र संचार करितात त्यांना उद्देशून पुष्टीची इच्छा करणारा मी हा बलि भूमीवर ठेवतों. पुष्टिपति भगवान् माझ्या ठिकाणीं पुष्टीची स्थापना करो. ( ६७ )

---

केवळ जपानेंच पाप-क्षय व्हावा म्हणून हा मंत्र—

ॐ तत्सत्यम् ॥ ॐ तद्ब्रह्म । ॐ तद्वायुः ॐ तदात्मा । ॐ तत्सर्वम् ।

ॐ तत्पुरोर्नमः । अन्तश्चरति भूतेषु गुहायां विश्वमूर्तिषु ॥ त्वं यज्ञस्त्वं वषट्कारस्त्वमिन्द्रस्त्व्ँरुद्रस्त्वं विष्णुस्त्वं ब्रह्म त्वं प्रजापतिः । त्वं तदाप आपो ज्योती रसोऽमृतं ब्रह्म भूर्भुवः सुवरोम् ( ६८ )

**अन्वयार्थ**—' ॐ तत् सत्यं,-' ॐ हेंच तें अबाधित तत्त्व आहे.'तत् ब्रह्म,-' ओम्त्व कार मोठें ब्रह्म आहे.' तत् वायुः, तत् आत्मा,तत् सर्वं, तत् पुरः नमः अस्तु-' तेंच वायु, तेंच जीव, किंबहुना तेंच सर्व चराचर जगत् आहे. तेंच विस्तीर्ण ब्रह्माण्डाचें कारण आहे. 'विश्वमूर्तिषु भूतेषु गुहायां अन्तश्चरति-' अशा प्रकारचें जें ब्रह्म तें नानाविध प्राणि-शरीरांतील हृदयपुण्डरीकांत राहतें. याप्रमाणें परोक्षरीतीनें परमात्म्याचें सर्वात्मकत्व सांगून आतां अपरोक्ष रीतीनें तें दाखवितात.'हे भगवन्,त्वं यज्ञः,त्वं वषट्कारः, त्वं इन्द्रः,त्वं रुद्रः, त्वं विष्णुः, त्व प्रजापतिः, त्व तत् आपः, त्वं एव आपः, त्वं एव ज्योतिः, त्वं एव रसः, त्वं अमृतं, त्वं ब्रह्म, त्वं भूः, भुवः, सुवः, त्वं ओम्-' हे भगवन्, तूं यज्ञ ह० नानाविध क्रतुरूप आहेस. तूंच वषट्कार ह० देवांस देतांना उच्चारावयाचा शब्द आहेस. तूंच इन्द्र, रुद्र, विष्णु व ब्रह्मरूप आहेस. तूंच प्रजापति ( विराट् ) आहेस. तूंच तें ब्रह्माण्ड, नद्यादिकांतील जल, समुद्रांतील जल,सूर्यादि ज्योति, मधुरादि रस, अमृत,वेद-राशि, भूर्भुवःसुवःसंज्ञक त्रैलोक्य व तूंच ओंकार आहेस ( ६८ )

---

आतां प्राणाहुती, पूर्व जलप्राशन व उत्तर जलप्राशन यांचे मंत्र सांगतात—

श्रद्धायां प्राणे निविष्टोऽमृतं जुहोमि । श्रद्धायामपानं निविष्टोऽमृतं जुहोमि ॥
श्रद्धायां व्याने निविष्टोऽमृतं जुहोमि । श्रद्धायामुदानं निविष्टोऽमृतं जुहोमि॥
श्रद्धायाँ समाने निविष्टोऽमृतं जुहोमि ।
ब्रह्मणि म आत्माऽमृतत्वाय । अमृतोपस्तरणमसि ॥
श्रद्धायां प्राणे निविष्टोऽमृतं जुहोमि । शिवो मा विशाप्रदाहाय । प्राणाय स्वाहा॥
श्रद्धायामपाने निविष्टोऽमृतं जुहोमि ।
शिवो मा विशाप्रदाहाय । अपानाय स्वाहा ॥
श्रद्धायां व्याने निविष्टोऽमृतं जुहोमि ।
शिवो मा विशाप्रदाहाय । व्यानाय स्वाहा ॥
श्रद्धायामुदाने निविष्टोऽमृतं जुहोमि ।
शिवो मा विशाप्रदाहाय । उदानाय स्वाहा ॥
श्रद्धायाँ समाने निविष्टोऽमृतं जुहोमि ।
शिवो मा विशाप्रदाहाय । समानाय स्वाहा ॥
ब्रह्मणि म आत्माऽमृतत्वाय । अमृतापिधानमसि ॥ ६९

अन्वयार्थ—' श्रद्धायां सत्यां प्राणे निविष्टः अमृतं जुहोमि इ०' वैदिक कर्माविषयीं जो अतिशय विश्वास तीच श्रद्धा होय. ती निष्पन्न झाली असतां शरीरांतील पांच वायूंतील पहिला जो प्राणनामक वायु त्यांत आदरयुक्त झालेला मी हें गोड हविद्रव्य टाकतों. त्याचप्रमाणें अपान, व्यान, उदान व समान यांतही हें मिष्टान्न होमितों.' एताभिः पञ्चभिः आहुतिभिः अमृतत्वाय म आत्मा ब्रह्मणि एकीभवतु' या पांच आहुतींच्या योगानें मोक्षासाठीं माझा जीव परमात्म्यामध्यें एकरूप होवो. ( आतां भोजनाच्या आरंभीं जलप्राशनाचा मंत्र सांगतात.— )' हे जल, त्वं अमृतं प्राणदेवतायाः उपस्तरणं असि' हे जला, तूं प्राणदेवतेचें विनाशरहित उपस्तरण म्ह० अंथरूण आहेस. ( आतां प्राणाहुतींविषयींच विकल्पित मंत्र सांगतात. )' श्रद्धायां प्राणे निविष्टः अमृतं जुहोमि' श्रद्धा उत्पन्न झाली असतां आदरयुक्त असा मी प्राणाचे ठिकाणीं या अमृतासारख्या अन्नाचें हवन करितों. 'हे हूयमानद्रव्यविशेष, त्वं शिवः भूत्वा मां अप्रदाहाय विश प्राणाय स्वाहा इ०' हे होम केल्या जाणाऱ्या अन्ना, तू शान्त होऊन क्षुधाजनित दाहाचें शमन करण्यासाठीं मजमध्यें प्रवेश कर. प्राणाला उद्देशून दिलेलें हें द्रव्य सुहुत असो. ( पुढील सर्व पर्यायांतही असाच अर्थ जाणावा. भोजनोत्तर जलप्राशनाचा मंत्र. ) हे जला, तूं अविनाशी आच्छादन आहेस. ( ६९ )

---

खाल्लेल्या अन्नाचें अभिमंत्रण करण्याचा मंत्र—

श्रद्धायां प्राणे निविश्यामृतꣳ हुतम् । प्राणमन्नेनाप्यायस्व ॥
श्रद्धायामपाने निविश्यामृतꣳ हुतम् । अपानमन्नेनाप्यायस्व ॥
श्रद्धायां व्याने निविश्यामृतꣳ हुतम् । व्यानमन्नेनाप्यायस्व ॥
श्रद्धायामुदाने निविश्यामृतꣳ हुतम् । उदानमन्नेनाप्यायस्व ॥
श्रद्धायाꣳ समाने निविश्यामृतꣳ हुतम् । समानमन्नेनाप्यायस्व ॥७०

अन्वयार्थ—' श्रद्धायां सत्यां प्राणे निविश्य अमृतं हुतं । प्राणं अन्नेन आप्यायस्व' श्रद्धा उत्पन्न झाली असतां प्राणामध्यें प्रवेश करून म्ह० अतिशय आदरपूर्वक हें मधुर अन्न मीं होमिलें आहे. हे प्राणाभिमानिनि देवि, तू मुख-नासिकेंतून संचार करणाऱ्या वायूस या हुतान्नानें वाढीव.' एवमेव अपे-' त्याचप्रमाणें श्रद्धेनंतर अपानामध्यें मोठ्या आदरानें हें अन्न होमिलें आहे. हे अपानाभिमानिनि देवि, या अन्नानें अपान वायु वाढीव. व्यान, उदान व समान यांविषयींही असेंच समजावें ( ७० )

---

क्षुधा, तृषा इत्यादिकांच्या योगानें उत्पन्न झालेला जो चित्त-विक्षेप त्याची शान्ति अन्न व जल यांच्या योगानें करून भोक्ता जो जीव त्याच्या परमेश्वरस्वरूपानुसंधानाचें निमित्त होणारा मंत्र दाखवितात.—

अङ्गुष्ठमात्रः पुरुषोऽङ्गुष्ठं च समाश्रितः ।
ईशः सर्वस्य जगतः प्रभुः प्रीणाति विश्वभुक् ॥ ७१ ॥

अन्वयार्थ—' अङ्गुष्ठमात्रः पुरुषः अङ्गुष्ठं च समाश्रितः अस्ति-' हृदयस्थ आकाश ज्याच्या त्याच्या अङ्गुष्ठप्रमाण असतें. त्यांतील बुद्धिही तेवढीच असते. तिच्या योगानें अवच्छिन्न झालेला जीवरूप पुरुषही त्याङ्गुष्ठप्रमाण असतो. तो ज्ञान-क्रियाशक्तीनें अङ्गुष्ठाचा आश्रय करून राहिला आहे. ( 'अङ्गुष्ठं च ' येथील चकारानें मस्तकाचा आश्रय करून राहिला आहे असाही अर्थ निष्पन्न होतो. अर्थात् तो आपाद-तल-मस्तकव्यापी आहे. ) ' सः सर्वस्य जगतः ईशः, विश्वभुक्, प्रभुः प्रीणाति-' तो आपल्या वास्तवरूपानें सर्व जगाचा नियन्ता व त्यामुळेंच सर्व जगाचा भोग घेणारा आहे. तशा प्रकारचा तो ईश्वर या भोजनानें संतुष्ट होवो. ( ७१ )

---

याप्रमाणें भोजनोत्तर परमेश्वरानुसन्धानाचें प्रतिपादन करणारा मन्त्र सांगून भोजन्यानंतर्या सर्व अङ्गांच्या स्वस्थतेचें प्रतिपादन करणारा मंत्र अनुभवपूर्वक पढतात—

वाङ्म आसन् । नसोः प्राणः । अक्ष्योश्चक्षुः ।
कर्णयोः श्रोत्रम् । बाहुवोर्बलम् । ऊरुवोरोजः ।
अरिष्टा विश्वान्यङ्गानि तनूः ।
तनुवा मे सह नमस्ते अस्तु मा मा हिँ॒सीः ॥ ७२ ॥

अन्वयार्थ—'हे भगवन्, मे वाक् आस्ये, प्राणः नसोः, चक्षुः अक्ष्योः, श्रोत्रं कर्णयोः बलं बाहुवोः ( बाह्वोः ) ओजः ऊर्वोः अभूत्-' हे भगवन्, षड्रस अन्न आकण्ठ खाऊन तृप्त झालेल्या माझी वाणी मुखांत, प्राण दोन्ही नासिकांमध्यें, चक्षुरिन्द्रियाची शक्ति दोन्ही नेत्रांमध्यें व श्रोत्रेन्द्रिय दोन्ही कर्णांमध्यें स्वास्थ्ययुक्त झाली आहेत. (भोजनाच्यापूर्वी क्षुधेमुळें तीं सर्व व्याकूळ झालीं होतीं). त्यामुळें माझ्या दोन्ही बाहूंमध्यें बल आलें आहे. मांड्यांमध्यें गमनागमनाचें सामर्थ्य आलें आहे. 'विश्वानि मम अङ्गानि अरिष्टा अभूवन्-' फार काय पण माझीं सर्व अंगें स्वस्थ झालीं आहेत. सारांश, 'मे तनुवा सह तनूः स्वस्थीभवति स्म-' माझ्या लिंगशरीरासह हें स्थूल शरीर स्वस्थ झालें आहे. म्हणूनच ' मे भगवन् ते नमः अस्तु- ' हे भगवन्, तुझ्या कृपेनें मिष्टान्नाच्या योगानें मी ज्या अर्थी तृप्त झालों आहे त्या अर्थी माझा तुला नमस्कार असो. ' मां मा हिंसीः-' याप्रमाणें प्रत्यहीं सर्व कुटुंबासह माझी तृप्ति करून व सर्वांगस्वास्थ्य करून मरणापर्यंत मला पीडा देऊं नकोस, तर सुख दे. ( माझणांनीं भोजनानंतर प्रत्यहीं परमेश्वराच्या उपकाराचें स्मरण करण्यासाठीं हा मंत्र अर्थानुसन्धानपूर्वक म्हणावा. असें याचें तात्पर्य. ७२ )

---

याप्रमाणें सर्वांगस्वास्थ्य सांगून सर्व पापांचा क्षय व उत्तरोत्तर धनप्राप्ति हीं दोन फलें देणारा इन्द्र-महर्षि-संवादरूप अन्य मंत्र सांगतात-

वयः सुपर्णा उपसेदुरिन्द्रं प्रियमेधा ऋषयो नाधमानाः ।
अपध्वान्तमूर्णुहि पूर्धि चक्षुर्मुमुग्ध्यस्मान्निधयेऽवबद्धान् ॥ ७३ ॥

अन्वयार्थ—' नाधमानाः प्रियमेधाः सुपर्णाः वयः ऋषयः कदाचित् अपध्वान्तं इन्द्रं उपसेदुः' कांहीं तरी याचना करण्याची इच्छा करणारे, सर्व प्राण्यांचें प्रिय करण्याची ज्यांची बुद्धि आहे आणि सुन्दर पंखांनीं युक्त असलेल्या पक्ष्याप्रमाणें जे शीघ्र गमन करणारे आहेत, असे सप्तर्षि एकदा ज्याच्या हृदयांतील अज्ञान-अंधकार नाहींसा झाला आहे; अशा इन्द्रापाशीं गेले. ' उपेत्य च एवं ऊचिरे' आणि म्हणाले. ' हे भगवन्, अस्मान् ऊर्णुहि' हे भगवन् इन्द्र, आम्हांला दिव्य वस्त्र देऊन आच्छादित कर. ' अस्माकं चक्षुः पूर्धि' उत्तम सौन्दर्यादियुक्त पदार्थ दाखवून व देऊन आमचे नेत्र पूर्ण कर. ( *आमच्या नेत्रांची तृप्ति कर.*) *'अस्मान् सर्वेभ्यः पापेभ्यः मुमुग्धि' आम्हांला सर्व पापां*पासून सोडीव. ' अस्मान् निधये अवबद्धान् कुरु' शिवाय आम्हांला निधीकरितां आसक्त कर. म्हणजे अनेक प्रकारचें धन व रत्नें यांनीं आम्हांला समृद्ध कर. ( याप्रमाणें ऋषींनीं ज्याच्यापाशीं याचना केली आहे, अशा इन्द्रानें त्यांचे मनोरथ पूर्ण केले आणि त्यामुळें सुखित झालेले ऋषी भूलोकीं येऊन आपल्या आश्रमांत राहिले. ७३ )

---

या मंत्राच्या जपानंतर हृदयाला हात लावून पुढील मंत्राचा जप करावा—

प्राणानां ग्रन्थिरसि रुद्रो मा विशान्तकः । तेनान्नेनाऽऽप्यायस्व ॥७४॥

अन्वयार्थ-'हे अहंकार, त्वं प्राणानां ग्रन्थिः असि' हे हृदयवर्ति अहंकारा, तूं वायुरूप व इन्द्रियरूप प्राणांची ग्रन्थि आहेस. म्हणजे एकमेकांचा विश्लेष न व्हावा म्हणून त्यांस एकमेकांत गुंतवून ठेवणारा आहेस. ' त्वं रुद्रः, अन्तकः भूत्वा मा विश' अशा प्रकारचा तूं रुद्र–दुःखाचा विनाशक होऊन माझ्या शरीरांत प्रविष्ट हो 'तेन अन्नेन आप्यायस्व' आणि मीं खाल्लेल्या अन्नानें मला वाढीव. ( ७४ )

---

याप्रमाणें हृदयाभिमंत्रण सांगून यावज्जीव मृत्यूचा परिहार व्हावा म्हणून देवताप्रीणनरूप मंत्र सांगतात—

नमो रुद्राय विष्णवे मृत्युर्मे पाहि ॥ ७५ ॥

अन्वयार्थ—'रुद्राय नमः अस्तु' पार्वतीपतीला नमस्कार असो.'विष्णवे नमः अस्तु' लक्ष्मीपतीला नमस्कार असो. ' हे रुद्र, हे विष्णो, त्वं च त्वं च मृत्युः ( मृत्योः ) मे पाहि' हे रुद्र, हे विष्णो, तूं व तूंही मृत्यूपासून माझें रक्षण कर. ( ७५ )

---

*त्वमग्ने द्युभिस्त्वमाशुशुक्षणिस्त्वमद्भ्यस्त्वमश्मनस्परि ।*

त्वं वनेभ्यस्त्वमोषधीभ्यस्त्वं नृणां नृपते जायसे शुचिः ॥ ७६ ॥

अन्वयार्थ—' हे अग्ने, त्वं अपि द्युभिः सहितः सन् मृत्युं निवारय' हे अग्ने, तूंही उत्तम कान्तीनें युक्त होऊन आमच्या मृत्यूचें निवारण कर. ' त्वं आशुशुक्षणिः भव' तूं आ-शुशुक्षणि म्ह० मनाचें पाप शीघ्र धोवून टाकणारा हो. ' त्वं अद्भ्यः उपरि च अश्मनः उपरि तिष्ठसि' तूं जटाचें कारण असल्यामुळें जटाहून अधिक आहेस. त्याच-

प्रमाणें तूं महामेरुरूप पाषाणाच्या वर राहतोस. ( अग्न्यादि देव मेरूच्या शिखरावर राहतात, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. ) 'त्वं वनेभ्यः विहरसि-' तूं नन्दनादि वनांतून विहार करतोस, 'त्वं ओषधीभ्यः व्याप्य तिष्ठसि-' तूं सोमलतादि वल्लींना व्यापून राहतोस.'हे नृपते, त्वं नृणां पूज्यः जायसे-' हे यजमानरूप मनुष्यांच्या अधिपते अग्ने, तूं यजमानांमध्यें पूज्य होतोस. 'तथापि शुचिः एव-' तसाच तूं वैदिक, लौकिक व स्मशानांतील सर्व पदार्थांना खाणारा असलास तरी सर्वदा शुचिच आहेस. (यास्तव मृत्यूपासून माझें रक्षण कर.७६)

---

· आतां परमात्म्याची आपल्या अभीष्टाविषयीं प्रार्थना करतो—

शिवेन मे संतिष्ठस्व स्योनेन मे संतिष्ठस्व सुभूतेन मे संतिष्ठस्व ब्रह्मवर्चसेन मे संतिष्ठस्व यज्ञस्यर्द्धिमनुसंतिष्ठस्वोप ते यज्ञ नम उप ते नम उप ते नमः॥

अन्वयार्थ—'हे यज्ञ, ते उप नमः अस्तु-' हे यज्ञस्वरूप परमात्म्या, तुला अगदीं समीपतेनें नमस्कार असो. तुझ्या समीप, तुझ्या समक्ष मी तुला नमस्कार करतों. 'त्वं शिवेन मे संतिष्ठस्व-' तू कल्याणप्रदानासह माझ्या घरीं रहा. 'स्योनेन मे संतिष्ठस्व सुभूतेन मे संतिष्ठस्व ब्रह्मवर्चसेन मे संतिष्ठस्व-' ऐहिक सुखप्रदानासह, महदैश्वर्यप्रदानासह, व ब्रह्मवर्चस तेजासह माझ्या येथें रहा. ( अशा गुणांनीं युक्त झालेला तूं माझ्या घरीं राहिलास म्ह० मीही अशाच गुणांनीं युक्त होईन. ) 'यज्ञस्य ऋद्धिं अनुसंतिष्ठस्व-' तुझ्या सन्तोषाकरितां केलेल्या या यज्ञाच्या म्ह० सत्कर्मानुष्ठानाच्या समृद्धीच्या मागून रहा.(म्हणजे कर्मानुष्ठानानंतर फल देण्यास आमच्या समीप अचलचित्त होऊन रहा.७७)

---

भोजनप्रकरण व कर्मप्रकरण संपलें. आतां सर्व कर्ममय संसारबीजाच्या दहनार्थ संन्यासप्रकरणाचा आरम्भ केला जातो. त्यांतील ज्ञानप्रतिबंधक महा पातकांच्या परिहारानें ज्ञानयोग्यतारूप शुद्धि सांगून योग्य पुरुषाला अपेक्षित असलेल्या ज्ञान-साधनांतील संन्यास हें साधन सर्वोत्कृष्ट आहे, हें सांगण्यासाठीं सत्यादि अकरा उत्कृष्ट साधनेंही संन्यासाच्या अपेक्षेनें निकृष्ट आहेत हें सांगणें उचित आहे. त्यासाठीं अगोदर पहिलें साधन सांगतात—

सत्यं परं परꣳ सत्यꣳ सत्येन न सुवर्गाल्लोकाच्च्यवन्ते कदाचन सताꣳ हि सत्यं तस्मात्सत्ये रमन्ते।

अन्वयार्थ—'सत्यं परं, परं सत्यं सत्येन स्वर्गलोकात् कदाचन न च्यवन्ते-' जी वस्तु प्रमाणतः जशी पाहिली असेल तशीच तिच्याविषयीं बोलणें हें सत्य होय. तें पुरुषार्थसाधनांमध्यें उत्कृष्ट आहे. कारण तें प्रमाणप्रमाणें अबाधित असतें. यावज्जीव यथार्थ भाषण केल्यानें पुरुष स्वर्गलोकापासून कधींही च्युत होत नाहींत. ( पण जे असत्य भाषण करणारे असतात ते कांहीं पुण्यानें स्वर्गाला प्राप्त होऊनही मिथ्याभाषणाच्या दोषामुळें कर्मांचे फळ पूर्ण झालेंनें नसतांनाही तत्काळ स्वर्गांतून च्युत होतात. ) 'हि सतां सत्यं तस्मात् सत्ये रमन्ते-' ज्या अर्थी सत्य हा सन्मार्गवर्ती ऋष्यादिकांचा धर्म आहे

त्या अर्थी ( ' ऋतमिदं सत्यं ' या व्युत्पत्तीचा आश्रय करून ) सत्यवादित्व हेंच मोक्षाचें उत्तम साधन आहे, असें म्हणून कित्येक महात्मे सत्यामध्यें रत असतात.

आतां दुसरें मत सांगतात—

तप इति तपो नानशनात्परं यद्धि परं तपस्तद्दुर्धर्षं तद्दुराधर्षं तस्मात्तपसि रमन्ते॥

अन्वयार्थ—' तपः परं मोक्षसाधनं इति केषांचित् मतं- ' तप हें परम मोक्षसाधन आहे, असें कित्येकांचें मत आहे. तीर्थयात्रा, जप, होम इत्यादि तपाचे अनेक प्रकार आहेत. ' अनशनात् परं तपः न विद्यते ' तथापि त्या सर्वांमध्यें उपवास, एकभुक्त इत्यादिकांच्या योगानें भोजनाचा त्याग करणें याहून उत्कृष्ट तप नाहीं. ' यत् हि परं तपः तत् दुर्धर्षं अत एव तत् आ दुर्धर्षं ' कारण भोजनत्यागरूप जें कृच्छ्र-चान्द्रायणादिक परम तप आहे तें दुर्धर्ष ह्म० सहन करण्यास अशक्य आणि त्यामुळेंच सर्व प्राण्यांना सर्व प्रकारें सहन करतां येणें अशक्य आहे. ' तस्मात् तपसि रमन्ते-' म्हणून कांहीं थोडेच श्रद्धाळू पुरुष कृच्छ्र-चान्द्रायणादि तपामध्यें रममाण होतात. तिसरें मत सांगतात—

दम इति नियतं ब्रह्मचारिणस्तस्माद्दमे रमन्ते ॥

अन्वयार्थ—' दमः परं साधनं इति ब्रह्मचारिणः नियत वदन्ति-' वाणी व चक्षुरादि बाह्य इन्द्रियें यांना निषिद्ध विषयांपासून निवृत्त करणें हाच दम होय, आणि तेंच मोक्षाचें उत्तम साधन आहे, असें नैष्ठिक ब्रह्मचारी सर्वदा म्हणतात. 'तस्मात् दमे रमन्ते-' त्यामुळें दमामध्यें रममाण होतात. आतां चवथें मत—

शम इत्यरण्ये मुनयस्तस्माच्छमे रमन्ते ॥

अन्वयार्थ—'शमः एव मोक्ष हेतुः इति अरण्ये वर्तमानाः मुनयः मन्यन्ते-'अन्तःकरण क्रोधादि दोषांनीं रहित असणें हाच शम होय. तोच मोक्षाचा उत्तम हेतु आहे, असें अरण्यांत राहणारे मुनि–वानप्रस्थ समजतात. 'तस्मात् ते शमे रमन्ते-' त्यामुळें ते शमामध्यें रत होतात. आतां पांचवें मत—

दानमिति सर्वाणि भूतानि प्रशꣳसन्ति दानान्नातिदुष्करं तस्माद्दाने रमन्ते ॥

अन्वयार्थ—' दानं एव उत्तम मोक्षसाधनं इति सर्वे प्राणिनः प्रशंसन्ति-' गाय, भूमि, सुवर्ण इत्यादि स्वकीय पदार्थांना शास्त्रोक्त मार्गानें दुसऱ्याच्या मालकीचें करणें, हें दान होय. तेंच मोक्षाचें उत्तम साधन आहे, असें म्हणून सर्व प्राणी दानाची प्रशंसा करितात. 'दानात् अतिदुश्चरं न अस्ति-' धनदानाहून अति दुष्कर कर्म कोणतेंही नाहीं. त्यामुळें त्याच्या रक्षणासाठींच पुष्कळ लोक प्राणांचा त्यागही करितात, असें आढळतें. 'तस्मात् दाने रमन्ते-' यास्तव दाते पुरुष दानामध्यें रममाण होतात. सहावें मत—

धर्म इति धर्मेण सर्वमिदं परिगृहीतं धर्मान्नातिदुष्करं तस्माद्धर्मे रमन्ते ॥

अन्वयार्थ—' धर्मः उत्तमः मोक्षहेतुः इति प्रभवः मन्यन्ते-' स्मृत्या व पुराणें यांनीं ज्याचें प्रतिपादन केलें आहे असा, वापी-कूप-तडागादिकांना निर्माण करणें, हाच धर्म येथें विवक्षित आहे. तो धर्मच उत्तम मोक्षहेतु आहे, असें समर्थ लोक मानतात.

'धर्मेण सर्वं इदं जगत् परिगृहीतं-' तडागादिरूप धर्मानें हें सर्व जगत् व्यापिलें आहे. कारण तडागादिकांत स्नान, जलपान इत्यादि करून मनुष्य-पश्वादि सर्व प्राणी सन्तुष्ट होतात. 'धर्मात् अतिदुष्करं नास्ति-',तसल्या धर्माहून अधिक दुष्कर असें कांहीं नाहीं.त्यामुळें श्रीमान् लोक तसल्या धर्मामध्यें रत होतात. सातवें मत—

प्रजन इति भूयाꣳसस्तस्माद्भूयिष्ठाः प्रजायन्ते तस्माद्भूयिष्ठाः प्रजनने रमन्ते॥

अन्वयार्थ—' प्रजनः उत्तमसाधनत्वेन भूयांसः मन्यन्ते-' अपत्योत्पादन हेंच मोठें साधन आहे, असें पुष्कळ मानितात. ( कारण धनिक, दरिद्री, शिष्ट, अशिष्ट, इत्यादि सर्वही पुत्रोत्पादनाविषयीं अतिशय आदर दाखवितात. ) ' तस्मात् भूयिष्ठाः प्रजायन्ते-' त्यामुळें एकेका पुरुषापासून पुष्कळ अपत्यें उत्पन्न होतात. ' तस्मात् भूयिष्ठाः प्रजनने रमन्ते-' म्हणूनच प्रायः सर्व प्राणी प्रजोत्पादनामध्यें रममाण होतात. आठवें मत—

अग्नय इत्याह तस्मादग्नय आधातव्याः ॥

अन्वयार्थ—' गार्हपत्यादयः अग्नयः उत्तमाः मुक्तिहेतवः इति कश्चित् आह-' गार्हपत्यादि अग्नीच मोक्षहेतू आहेत, असें कोणी वेदार्थपरायण पुरुष म्हणतो. ' तस्मात् गृहस्थैः अग्नयः आधातव्याः-' म्हणून गृहस्थांनीं अग्नींचें आधान करावें. नववें मत—

अग्निहोत्रमित्याह तस्मादग्निहोत्रे रमन्ते ॥

अन्वयार्थ—' अग्निहोत्रं उत्तमं मोक्षसाधनं इति परः कश्चित् आह- ' आहिताग्नींत सायंप्रातर्होम करणें हेंच अग्निहोत्र होय. तेंच मोक्षाचें उत्तम साधन आहे, असें दुसरा कोणी वेदार्थपरायण पुरुष म्हणतो. 'तस्मात् केचित् अग्निहोत्रे रमन्ते-' त्यामुळें कित्येक अग्निहोत्रामध्यें रममाण होतात. दहावें मत—

यज्ञ इति यज्ञो हि देवास्तस्माद्यज्ञे रमन्ते ॥

अन्वयार्थ—' यज्ञः उत्तमः मोक्षहेतुः इति अपरे मन्यन्ते-' दर्श-पूर्णमास, ज्योतिष्टोमादि यज्ञ हेंच मोक्षसाधन आहे, असें दुसरे कित्येक वेदार्थपरायण लोक म्हणतात. ' हि यज्ञः देवाः-' कारण यज्ञानेंच पूर्वोक्त इन्द्रादि देव स्वर्गाला गेले आहेत. 'तस्मात् यज्ञे रमन्ते-' त्यामुळेंच अद्यापि कित्येक वैदिक पूर्वोक्त यज्ञामध्यें आसक्त होतात.अकरावें मत

मानसमिति विद्वाꣳसस्तस्माद्विद्वाꣳस एव मानसे रमन्ते ॥

अन्वयार्थ—'मानसं एव उत्तमं मोक्षसाधनं इति विद्वांसः मन्यन्ते-' मानस उपासन हेंच उत्तम साधन आहे, असें कित्येक सगुण ब्रह्मोपासक म्हणतात. 'तस्मात् विद्वांसः मानसे एव रमन्ते-' त्यामुळेंच उपासनेचें तात्पर्य जाणणारे कित्येक वैदिक मानस उपासनेंतच रममाण होतात. बारावें मत—

न्यास इति ब्रह्मा ब्रह्मा हि परः परो हि ब्रह्मा तानि वा एतान्यवराणि पराꣳसि न्यास एवात्यरेचयत् य एवं वेदेत्युपनिषत् ॥ ७८ ॥

अन्वयार्थ—' न्यासः एव उत्तमः मोक्षहेतुः इति ब्रह्मा मन्यते-' कर्मकाण्डोक्त अग्निहोत्रादिकर्मांचा आश्रणि, जाबाल इत्यादि उपनिषदांत सांगितलेल्या प्रकारानें, त्याग करणें

हाच उत्तम मोक्षहेतु आहे, असें हिरण्यगर्भ मानतो. 'सः च ब्रह्मा परः हि परः हि ब्रह्मा-' तो ब्रह्मा परमात्मरूप आहे. तो जरी देहधारी असला तरी परमात्माच आहे. त्यामुळें त्याला ब्रह्मा असें म्हणतां येतें. ' तानि वा एतानि परांसि तथापि संन्यासं अपेक्ष्य अवराणि-' वर सांगितलेलीं जीं सत्यादि तपें तीं जरी श्रेष्ठ असलीं तरी संन्यासाच्या अपेक्षेनें निकृष्टच आहेत. 'संन्यासः एव अत्यरेचयत्-' एका संन्यासानेंच त्या सर्वांचें उल्लंघन केलें आहे. 'यः एव वेद तस्य पूर्वोक्ता उपनिषत् भवति-' तस्मात् जो पुरुष पूर्वोक्त प्रकारानें संन्यास इतर सर्व साधनांहून उत्तम आहे, असें जाणतो तो या रहस्यभूत विद्येला प्राप्त होतो. ( ७८ )

---

आतां पूर्वोक्त मोक्षसाधन-समूहाचें उपपादन करण्यासाठीं आख्यायिका सांगतात—

प्राजापत्यो हारुणिः सुपर्णेयः प्रजापतिं पितरमुपससार किं भगवन्तः परमं वदन्तीति तस्मै प्रोवाच ॥

अन्वयार्थ—'सुपर्णेयः प्राजापत्यः आरुणिः प्रजापतिं पितरं उपससार ह-'सुपर्णेपासुन झालेला आरुणिनांवाचा प्रजापतीचा पुत्र आपल्या प्रजापतिनांवाच्या पित्यापाशीं जाऊन, 'हे प्रजापते, भगवन्तः किं साधनं परमं वदन्ति इति पप्रच्छ च- ' हे प्रजापते,पूज्य महर्षी मोक्ष-साधनांतील कोणत्या साधनाला उत्कृष्ट म्हणतात, असें विचारू लागला. 'ततः प्रजापतिः तस्मै प्रोवाच-' तेव्हां प्रजापति त्याला असें म्हणाला.—

सत्येन वायुरावाति सत्येनाऽऽदित्यो रोचते दिवि सत्यं वाचः प्रतिष्ठा सत्ये सर्वं प्रतिष्ठितं तस्मात्सत्यं परमं वदन्ति ॥

अन्वयार्थ—' वायुः सत्येन आ-वाति-' साम्प्रतकालीं अन्तरिक्षांत वाहणारा जो हा वायु तो पूर्वजन्मीं मनुष्य असून त्यानें सत्यतत्वाचें परिपालन केलें होतें. त्या सत्यत्वामुळेंच तो आतां वायुदेवतात्वास प्राप्त होऊन लोकानुग्रहार्थ अन्तरिक्षांत वाहत आहे. ' तथा आदित्यः सत्येन दिवि रोचते-' त्याचप्रमाणें आदित्यहो पूर्वजन्मीं अनुष्ठिलेल्या सत्याच्या योगानें द्युलोकांत प्रकाशमान होत असतो. ' सत्यं वाचः प्रतिष्ठा-' हें सत्य वागिन्द्रियाची प्रतिष्ठा ह्म॰ स्थिर स्थान आहे. वाणी अनृत भाषण जरी बोलली तरी इतर लोक तिचें निराकरण करतात.ह्मणून अनृत ही वाणीची प्रतिष्ठा नव्हे 'सत्ये सर्वं प्रतिष्ठितं-' त्यामुळेंच सत्य भाषणांत सर्व प्रामाणिक व्यवहार प्रतिष्ठित झाला आहे, 'तस्मात् सत्यं परमं वदन्ति ' त्यामुळें सत्य हेंच परम साधन आहे, असें कित्येक सांगतात.

पण प्रजापतीचें हें वचन ऐकून आरुणीला सन्तोष झाल्याचें कांहीं चिह्न दिसलें नाहीं. म्हणून प्रजापति दुसरें साधन सांगू लागला—

तपसा देवा देवतामग्र आयन् तपसर्षयः सुवरन्वविन्दन् तपसा सपत्नान् प्रणुदामारातीस्तपसि सर्वं प्रतिष्ठितं तस्मात्तपः परमं वदन्ति ॥

अन्वयार्थ—' देवा अग्रे तपसा देवतां आयन् ' स्वर्गांत असणारे अग्नि, इन्द्र इत्यादि देव पूर्व जन्मीं केलेल्या अन्नत्यागरूप कृच्छ्र–चान्द्रायणादि तपाच्या योगानें देवताभावास

प्राप्त झाले आहेत. 'तथा ऋषयः तपसा सुवर् अन्वविन्दन्-' तसेच वसिष्ठादि महर्षी पूर्वजन्मीं केलेल्या तपानें स्वर्गलोकास क्रमानें प्राप्त झाले. 'अपि तपसा सपत्नान् अरातीः प्रणुदाम-' त्याचप्रमाणें आम्हीही आतां अभिचाररूप तपानें आपल्या शत्रूचें व० आमच्या द्रव्यलाभाला प्रतिबन्ध करणाऱ्या पुरुषांचेंही निराकरण करतों. 'सर्वं तपसि प्रतिष्ठितं-' दुर्लभही सर्व फलजात तपामध्यें प्रतिष्ठित आहे. 'तस्मात् तपः परमं वदन्ति-' तस्मात् अनशनरूप तप हेंच परम मोक्षसाधन आहे असें म्हणतात.

दमेन दान्ताः किल्बिषमवधून्वन्ति दमेन ब्रह्मचारिणः सुवरन्वगच्छन् दमो भूतानां दुराधर्षं दमे सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्दमः परमं वदन्ति ॥

अन्वयार्थ---'दान्ताः दमेन किल्बिषं अवधून्वन्ति । ब्रह्मचारिणः दमेन सुवर् अन्वगच्छन् । दमः भूतानां दुराधर्षं दमे सर्वं प्रतिष्ठितं तस्मात् दमः परमं वदन्ति-' बाह्येन्द्रियदमनयुक्त पुरुष त्या दमानें आपल्या पापाचा नाश करितात. नैष्ठिक ब्रह्मचारी दमानें स्वर्गाला गेले आहेत. दम प्राण्यांना सर्वदा असह्य आहे, त्या दमामध्यें सर्व अपेक्षित प्रतिष्ठित असतें यास्तव दम हें श्रेष्ठ मुक्तिसाधन आहे, असें कित्येक लोक म्हणतात या सर्व साधनपर्यायांतील पूर्व पूर्व साधन ऐकून आरुणीचें समाधान न झाल्यामुळें प्रजापतीनें पुढचें साधन सांगितलें आहे, असें समजावें.

शमेन शान्ताः शिवमाचरन्ति शमेन नाकं मुनयोऽन्वविन्दञ्छमो भूतानां दुराधर्षं छमे सर्वं प्रतिष्ठितं तस्माच्छमः परमं वदन्ति ॥

अन्वयार्थ—'शान्ताः शमेन शिवं आचरन्ति । मुनयः शमेन नाकं अन्वविन्दन् । शमः भूतानां दुराधर्षं । शमे सर्वं प्रतिष्ठितं । तस्मात् शमः परमं वदन्ति-' क्रोधादिरहित पुरुष शमानें शुभ पुरुषार्थाचें आचरण करितात. नारदादि मुनी शमानेंच स्वर्गास प्राप्त झाले आहेत. शम सर्व भूतांना असह्य आहे. शमामध्यें सर्व प्रतिष्ठित आहे. म्हणून शमाला परम साधन म्हणतात.

दानं यज्ञानां वरूथं दक्षिणा लोके दातारं सर्वभूतान्युपजीवन्ति दानेनारातीरपानुदन्त दानेन द्विषन्तो मित्रा भवन्ति दाने सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्दानं परमं वदन्ति ॥

अन्वयार्थ—'दानं यज्ञानां दक्षिणा-' गो हिरण्यादिदान हो यज्ञ-संबंधी दक्षिणा आहे. 'तस्मात् वरूथं लोके-' म्हणून लोकांत दान श्रेष्ठ आहे. 'सर्वभूतानि दातारं उपजीवन्ति-' व्यवहारांत दात्या पुरुषाच्या आश्रयानें ज्ञानी व अज्ञानी. असे सर्व उपजीविका करतात. 'दानेन अरातीः अपानुदन्त-' त्याचप्रमाणें धनदानानें राजे आपल्या शत्रूचें निराकरण करतात. 'द्विषन्तः दानेन मित्रा भवन्ति-' प्रबल शत्रूही धनदानानें संतुष्ट होऊन मित्र बनतात.' दाने सर्वं प्रतिष्ठितं-' दानांत सर्व प्रतिष्ठित आहे. 'तस्मात् दानं परमं वदन्ति-' म्हणून दानाला श्रेष्ठ म्हणतात.

धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा लोके धर्मिष्ठं प्रजा उपसर्पन्ति धर्मेण पापमपनुदति धर्मे सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्धर्मं परमं वदन्ति ॥

अन्वयार्थ—'धर्मः विश्वस्य जगतः प्रतिष्ठा-' पूर्वोक्त धर्म सर्व प्राण्यांचा आश्रय आहे. 'लोके धर्मिष्ठं प्रजाः उपसर्पन्ति-' लौकिकांत सर्व जन धर्माचरण करणाऱ्या पुरुषापाशीं धर्माधर्मनिर्णयार्थ जातात. 'धर्मेण पापं अपनुदति-' प्रायश्चित्तरूप धर्माच्या योगानें लोक पापाचा विनाश करतात. 'धर्मे सर्वं प्रतिष्ठितं-' धर्मामध्यें सर्व प्रतिष्ठित आहे. 'तस्मात् धर्मं परमं वदन्ति-' ह्मणून धर्म परम साधन आहे, असें म्हणतात.

प्रजननं वै प्रतिष्ठा लोके साधु प्रजायास्तन्तुं तन्वानः पितॄणामनृणो भवति तदेव तस्या अनृणं तस्मात्प्रजननं परमं वदन्ति ॥

अन्वयार्थ—'लोके प्रजननं प्रतिष्ठा-' पुत्रोत्पादन ही गृहस्थांची प्रतिष्ठा आहे. 'प्रजायाः तन्तु साधु तन्वानः पितृणां (पितॄणां) अनृणो भवति-' कारण (ऐतरेयभाष्यार्थ पृ. १७४ येथें सांगितल्याप्रमाणें) पुत्र पित्याचा प्रतिनिधि होतो. पुत्र-पौत्रादिरूप प्रजेची परंपरा शास्त्रीय मार्गानें अविच्छिन्न ठेवणारा पुरुष मृत पितरांच्या ऋणांतून मुक्त होतो. 'तदेव तस्या (तस्य) अनृणं-' पुत्रोत्पादन हेंच पुत्रवानाचें ऋण फेडून टाकण्याचें साधन आहे. 'तस्मात् प्रजननं परमं वदन्ति-' म्हणून प्रजनन हें श्रेष्ठ साधन आहे, असें म्हणतात.

अग्नयो वै त्रयी विद्या देवयानः पन्था गार्हपत्य ऋक्पृथिवी रथन्तरमन्वाहार्यपचनं यजुरन्तरिक्षं वामदेव्यमाहवनीयः साम सुवर्गो लोको बृहत्तस्मादग्नीन् परमं वदन्ति ॥

अन्वयार्थ—'अग्नयः त्रयी विद्या देवयानः पन्थाः-' गार्हपत्य, दक्षिण व आहवनीय हे तीन अग्नी ही वेदत्रयात्मक विद्या आहे व तोच देवयान मार्ग आहे. (ह्म० यागाच्या द्वारा देवत्व प्राप्त करून देणारा मार्ग आहे.) 'गार्हपत्यः अग्निः ऋक्, पृथ्वी, रथन्तरं इति प्रशस्यते-' त्या अग्नींतील पहिला गार्हपत्य अग्नि ऋग्वेदरूप, पृथ्वीरूप व रथन्तर सामात्मक आहे, असें म्हणून त्याची प्रशंसा करितात. 'अन्वाहार्यपचनं यजुः, अन्तरिक्षं, वामदेव्यं आहुः-' अन्वाहार्यपचन या नांवाचा दक्षिणाग्नि यजुर्वेद, अन्तरिक्ष लोक व वामदेव्यनांवाचें साम एतद्रूप आहे असें सांगतात. 'आहवनीयः साम, सुवर्गः लोकः बृहत्-' आहवनीय अग्नि सामवेद, स्वर्गलोक व बृहद्रथन्तर साम एतद्रूप आहे. 'तस्मात् अग्नीन् परमं वदन्ति-' म्हणून हे तीन अग्नी हेंच परम साधन आहे, असें म्हणतात.

अग्निहोत्रꣳ सायं प्रातर्गृहाणां निष्कृतिः स्विष्टꣳ सुहुतं यज्ञक्रतूनां प्रायणꣳ सुवर्गस्य लोकस्य ज्योतिस्तस्मादग्निहोत्रं परमं वदन्ति ॥

अन्वयार्थ—'सायंप्रातः अग्निहोत्रं गृहाणां निष्कृतिः-' सायंकाळीं व प्रातःकाळीं अनुष्ठिलेलें अग्निहोत्र हीच गृहांची निष्कृति आहे. म्हणजे तें गृहांना विकृत येण्याचें साधन आहे. (कारण अग्निहोत्राच्या अभावीं क्षुधित अग्नि गृहांना जाळतो.) 'अग्निहोत्रं स्विष्टं सुहुतं-' अग्निहोत्र सुन्दर यागरूप व होमरूप आहे. (देवतांना उद्देशून द्रव्यत्याग करणें हा याग व त्या द्रव्याला अग्नीमध्यें टाकणें हा होम होय.) 'यज्ञक्रतूनां प्रायणं-' तसेंच अग्निहोत्र हा यज्ञ-क्रतूंचा प्रारम्भ आहे. (अग्न्याधेय, अग्निहोत्र, दर्शपूर्णमास,

ग्रायण, चातुर्मास्य, निरूढ, पशुबन्ध व सौत्रामणी हे सात हविर्यज्ञ आहेत. कारण यांमध्यें यूपाची गरज नसते. पण क्रतु हा शब्द यूपयुक्त सोमयागांत रूढ आहे. अग्निष्टोम, अत्यग्निष्टोम, उक्थ्य, षोडशी, वाजपेय, अतिरात्र, व अप्तोर्याम ह्या सात सोमसंस्था हेच क्रतु आहेत. अग्निहोत्र या सर्व यज्ञांचें व क्रतूंचें आरम्भक आहे.) 'सुवर्गस्य लोकस्य ज्योतिः-' म्हणूनच अग्निहोत्र स्वर्गलोकाची ज्योति म्ह० त्याचें प्रकाशक आहे. 'तस्मात् अग्निहोत्रं परमं वदन्ति-' म्हणून अग्निहोत्राला श्रेष्ठ साधन म्हणतात.

**यज्ञ इति यज्ञेन हि देवा दिवं गता यज्ञेनासुरानपानुदन्त यज्ञेन द्विषन्तो मित्रा भवन्ति यज्ञे सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्यज्ञं परमं वदन्ति ॥**

**अन्वयार्थ**—'यज्ञः उत्तमं साधनं इति केचित् आहुः-' यज्ञ हें उत्तम साधन आहे, असें कित्येक म्हणतात. 'यज्ञेन हि देवाः दिवं गताः-' देव पूर्वानुष्ठित यज्ञाच्या योगानें स्वर्गलोकाला प्राप्त झालेले आहेत. 'यज्ञेन च असुरान् अपानुदन्त-' यज्ञानेंच देवांनीं असुरांचा विनाश केला. 'यज्ञेन द्विषन्तः मित्रा भवन्ति-' सर्व कामनांच्या प्राप्तीचें साधन असा जो ज्योतिष्टोम त्याच्या योगानें द्वेषाच्या शान्तीची इच्छा करणाऱ्या पुरुषाचे शत्रूही मित्र होतात. 'यज्ञे सर्वं प्रतिष्ठितं-' यज्ञामध्यें सर्व प्रतिष्ठित आहे 'तस्मात् यज्ञं परमं वदन्ति-' म्हणून यज्ञ, हें श्रेष्ठ साधन आहे, असें म्हणतात.

**मानसं वै प्राजापत्यं पवित्रं मानसेन मनसा साधु पश्यति मानसा ऋषयः प्रजा असृजन्त मानसे सर्वं प्रतिष्ठितं तस्मान्मानसं परमं वदन्ति ॥**

**अन्वयार्थ**—'मानसं प्राजापत्यं वै पवित्रं-' मनानें घडणारें उपासन हेंच प्रजापति पदाच्या प्राप्तीचें साधन व त्यामुळेंच पवित्र म्ह० चित्तशुद्धीचें कारण आहे.'मानसेन मनसा साधु पश्यति-' मानस-उपासनेनें युक्त असलेलें जें अन्तःकरण तें त्याच एकाग्र मनानें भूत, भविष्यत्, दूर असलेलें इत्यादि वस्तुजात चांगल्या तऱ्हेनें पाहतें. 'मानसाः ऋषयः प्रजाः असृजन्त-' एकाग्र मनानें युक्त असलेले विश्वामित्रादि ऋषि आपल्या नुसत्या संकल्पानेंच पुष्कळ प्रजा निर्माण करते झाले. 'मानसे सर्वं प्रतिष्ठितं-' यास्तव त्या मानस उपासनेमध्यें सर्व प्रतिष्ठित आहे. 'तस्मात् मानसं परमं वदन्ति-' त्यामुळें तें परम साधन आहे, असें म्हणतात.

**न्यास इत्याहुर्मनीषिणो ब्रह्माणं ॥**

**अन्वयार्थ**—'न्यासः इति यः मोक्षहेतुः तं मनीषिणः ब्रह्माणं आहुः-' न्यास म्हणून जो मोक्षाचा हेतु सांगितला आहे त्याला बुद्धिमान् स्मृतिकार महर्षी हिरण्यगर्भरूप म्हणतात.

आतां त्याच संन्यासाची स्तुति करण्यासाठीं त्याच्या योगानें प्राप्त होणाऱ्या हिरण्यगर्भाच्या रूपाचें वर्णन करितात—

**ब्रह्मा विश्वः कतमः स्वयंभुः प्रजापतिः संवत्सर इति ॥**

**अन्वयार्थ**—'यः ब्रह्मा सः अयं विश्वः, कतमः, स्वयंभुः, प्रजापतिः च संवत्सरः इति उक्तेयं.' जो हा हिरण्यगर्भ तो सर्व जगद्रूप,सुखस्वरूप,स्वयंभू म्ह० मातापितरांपासून

आपोआप उत्पन्न झालेला व प्रश्नांचा पालक आणि कालात्मक आहे. तात्पर्य, अशा रीतीनें त्याच्या सर्व स्वरूपाची कल्पना करावी.

संवत्सराची पुनः स्तुति करण्याकरितां हिरण्यगर्भाच्या अवयवभूत संवत्सराचें माहात्म्य सांगतात—

संवत्सरोऽसावादित्यो य एष आदित्ये पुरुषः स परमेष्ठी ब्रह्मात्मा ॥

अन्वयार्थ—' यः अयं संवत्सरः असौ आदित्यः-' जो हा संवत्सरनांवाचा काल सांगितला आहे तो आदित्यरूप आहे. ( कारण तो आदित्याच्या सतत गतीमुळें होतो. ) ' यः एषः आदित्ये पुरुषः सः एव परमेष्ठी ब्रह्म च आत्मा-' हा जो त्या आदित्यमण्डलांतील पुरुष तोच हिरण्यगर्भरूप आहे. ( कारण आदित्यमंडलाच्या द्वारा हिरण्यगर्भ प्राप्त होत असतो.) तो परमेष्ठीच ब्रह्म ह्म० जगाचें कारण आहे.तसाच तो आत्मा ह्म० सर्वांचा प्रत्यक् आत्मा ( पञ्च कोशांच्या पलीकडे असणारा कूटस्थ ) आहे.

याप्रमाणें आदित्यादिकांच्या द्वारा संवत्सरादिकांची प्रशंसा करून आदित्यमण्डलाच्या द्वारा सर्व व्यवहाराचें कारण या रूपानें त्याचीच स्तुति करितात—

याभिरादित्यस्तपति रश्मिभिस्ताभिः पर्जन्यो वर्षति पर्जन्येनौषधिवनस्पतयः प्रजायन्त ओषधिवनस्पतिभिरन्नं भवत्यन्नेन प्राणाः प्राणैर्बलं बलेन तपस्तपसा श्रद्धा श्रद्धया मेधा मेधया मनीषा मनीषया मनो मनसा शान्तिः शान्त्या चित्तं चित्तेन स्मृतिः स्मृत्या स्मारꣳ स्मारेण विज्ञानं विज्ञानेनात्मानं वेदयति तस्मादन्नं ददन्त्सर्वाण्येतानि ददात्यन्नात्प्राणा भवन्ति भूतानां प्राणैर्मनो मनसश्च विज्ञानं विज्ञानादानन्दो ब्रह्म योनिः ॥

अन्वयार्थ—' आदित्यः याभिः रश्मिभिः तपति ताभिः पर्जन्यः भूत्वा वर्षति-'हा आदित्य ज्या उष्णरूप किरणांनीं पुष्कळ सन्ताप करतो त्या तीव्र रश्मींनीं भूमीवरील जल शोषून घेऊन पर्जन्य होतो व वर्षाव करतो.' तेन पर्जन्येन ओषधिवनस्पतयः प्रजायन्ते-' त्या पर्जन्यानें व्रीह्यादि ओषधी व अश्वत्थ-पनसादि वनस्पती उत्पन्न होतात. 'ओषधिवनस्पतिभिः अन्नं भवति-' ओषधी व वनस्पती यांच्या योगानें भोग्य अन्न मिळतें., 'अन्नेन प्राणाः, प्राणैः बलं, बलेन तपः, तपसा श्रद्धा, श्रद्धया मेधा, मेधया मनीषा,मनीषया मनः, मनसा शान्तिः, शान्त्या चित्तं, चित्तेन स्मृतिं, स्मृत्या स्मारं, स्मारेण विज्ञानं, विज्ञानेन आत्मानं वेदयति-' त्या अन्नानें प्राण पुष्ट होतात. ते पुष्ट झाले असतां शरीरामध्यें बल उत्पन्न होतें. त्या बलाच्या योगानें कृच्छ्र-चांद्रायणादिरूप तप निष्पन्न होतें. तपानें ज्याचें चित्त शुद्ध झालें आहे त्याच्या ठिकाणीं तत्त्वज्ञानविषयक श्रद्धा उत्पन्न होते. त्या श्रद्धेनें एकाग्रचित्त पुरुषाच्या ठिकाणीं मेधा उत्पन्न होते. मेधेच्या योगानें बुद्धि, बुद्धीच्या योगानें निरंतर मनन, मननानें क्रोधादि दोषांना अवसरच न मिळाल्यामुळें शान्ति, शान्तीमुळें विक्षेपरहित चित्त ह्म० तत्त्वविषयप्रमाणजनित ज्ञान उत्पन्न होतें, मध्यें झोप वगैरे लागली असली तरी त्या ज्ञानानें पुनः तत्त्वविषयक स्मृति होते. त्या स्मृतीमुळें निरंतर

स्मरण होतें. त्या स्मरणानें सजातीय प्रत्यययुक्त सतत ज्ञान प्राप्त होतें. त्या ज्ञानानें पुरुष सर्वदा परमात्म्याचा अनुभव घेतो. 'तस्मात् अन्नं ददन् ( ददत् ) सर्वाणि एतानि ददाति-' ज्या अर्थी अशा परंपरेनें अन्न परमात्म्याच्या अनुभवाचें निमित्त होतें, त्या अर्थी अशा तऱ्हेनें अन्न देणारा पुरुष प्राण, बल इत्यादि सर्व देतो. (आतां अन्नदान सर्वदानरूप आहे हें स्पष्ट करण्याकरितां वरील अर्थच पुनः संक्षेपतः सांगतात— ) 'अन्नात् भूतानां प्राणाः भवन्ति, प्राणैः मनः, मनसः विज्ञानं, विज्ञानात् आनन्दः, ब्रह्म योनिः-' अन्नापासून भूतांचे प्राण होतात, प्राणापासून परंपरेनें मन, मनापासून परंपरेनें विज्ञान व विज्ञानापासून परमात्मरूप आनन्द होतो आणि अशा रीतीनें उपासक स्वतः वेदान्तप्रतिपाद्य ब्रह्म व जगत्कारण होतो.

पूर्वोक्त संन्याशाची स्तुति करण्यासाठीं त्या संन्याशानें ज्याला तत्त्वज्ञान प्राप्त झालें आहे त्या पुरुषाची प्रशंसा करतात—

**स वा एष पुरुषः पञ्चधा पञ्चात्मा येन सर्वमिदं प्रोतं पृथिवी चान्तरिक्षं च द्यौश्च दिशश्चावान्तरदिशश्च स वै सर्वमिदं जगत्स स भूतꣳस भव्यं जिज्ञासक्लृप्त ऋतजा रयिष्ठा श्रद्धा सत्यो महस्वान्तपसो वरिष्ठात् ॥**

**अन्वयार्थ**—' सः वै एषः पुरुषः पञ्चधा पञ्चात्मा भवति-' जो पुरुष संन्यासपूर्वक तत्त्वज्ञान संपादन करतो तोच हा पुरुष सर्वात्मक, पञ्च प्रकारांनीं पञ्चात्मा ( म्ह० पञ्चवीस वस्तुस्वरूप होतो. शब्द-स्पर्शादि पांच गुण, पृथिव्यादि पांच भूतें, चक्षुःश्रोत्रादि पांच ज्ञानेन्द्रियें, वाक्पाणि इत्यादि पांच कर्मेन्द्रियें व प्राणापानादि पांच वायु यांच्या स्वरूपभूत) होतो.'येन सर्वं इदं जगत् प्रोतं स एव पृथिवी च अन्तरिक्षं च द्यौः च दिशः च अवान्तरदिशः च सः वै सर्वं इदं जगत् सः एव भूतं भव्यं अस्ति-' ज्या ब्रह्मरूपानें हें सर्व जगत् व्यापिलें आहे तोच पृथिवी, अंतरिक्ष, स्वर्ग, दिशा व अवान्तर दिशा यांना व्यापून राहिला आहे. तोच पुरुष हें सर्व वर्तमान जगत्, भूतकालीन जगत् व भविष्यत्कालीन जगत् आहे. ( तत्त्ववेत्त्याचा आकार इतर साधारण जनांप्रमाणें जरी दिसला तरी तो वेदान्तविचारानें सर्वात्मरूपानें निश्चित झालेला असतो.)'यतः अयं जिज्ञासक्लृप्तः ऋतजाः रयिष्ठा श्रद्धा सत्यः महस्वान् अतएव तपसः (तमसः) वरिष्ठात् वर्तते-' प्रामाणिक ज्ञानानें सर्वात्मा झालेला असतो. तो गुरूपदेशरूप धनामध्येंच स्थित असतो. उपदेशरहित पुरुषांना प्रतीत होत नाहीं. अशा प्रकारचें विज्ञान श्रद्धेनेंच प्राप्त होणारें असल्यामुळें हा श्रद्धारूप आहे. अबाध्य जें ब्रह्म तत्स्वरूप असल्यामुळें हा सत्य आहे, स्वयंप्रकाश आहे आणि म्हणूनच संसारकारणभूत अज्ञानानें रहित असल्यामुळें तो सर्वांहून श्रेष्ठ आहे.

याप्रमाणें संन्यासपूर्वक ज्ञानयुक्त झालेल्या पुरुषाची प्रशंसा करून त्याचें फल सांगतात—

**ज्ञात्वा तमेवं मनसा हृदा च भूयो न मृत्युमुपयाहि विद्वान् ॥**

**अन्वयार्थ**—' हे आरुणे, त्वं तं हृदा मनसा एवं ज्ञात्वा विद्वान् सन् भूयः मृत्युं न उपयाहि-' हे आरुणे, तूं त्या परमात्म्याला हृदयस्थ मनानें संन्यासपूर्वक जाणून व ज्ञानानें युक्त होऊन पुनरपि मृत्युप्रत प्राप्त होऊं नकोस. ( ज्ञानी पुरुषांचा वर्तमान देह पडला असतां पुनः जन्म घ्यावा लागत नसल्यामुळें त्याला पुनर्मृत्यु नाहीं. )

येणेंप्रमाणें पुष्कळ प्रकारें प्रशंसा केलेल्या संन्यासाचा उपसंहार करितात--

तस्मान्न्यासमेषां तपसामतिरिक्तमाहुः ।

**अन्वयार्थ**—' ( यस्मात् न्यासः पुरुषार्थस्य अन्तरंगं कारणं ) तस्मात् एषां (तपसां) न्यासं अतिरिक्त आहुः-' ज्या अर्थी संन्यास हें पुरुषार्थाचें अतरंग साधन आहे त्याअर्थी तो ह्या सत्यादि सर्व तपामध्यें उत्तम साधन आहे, असें विद्वान् म्हणतात.

संन्यासानंतर प्रणवानें आत्म्याच्या ठिकाणीं समाधि लावावी, असें विधान करणारा वेद त्या समाधीला होणाऱ्या विघ्नांचा परिहार करण्यासाठीं प्रथम अन्तर्यामीची सर्वकारणरूपानें स्तुति करतो--

वसुरण्वो विभूरसि प्राणे त्वमसि संधाता ब्रह्मन् त्वमसि विश्वधृत्तेजोदास्त्वमस्यग्निरसि वर्चोदास्त्वमसि सूर्यस्य द्युम्नोदास्त्वमसि चन्द्रमस उपयामगृहीतोऽसि ब्रह्मणे त्वा महसे ॥

*अन्वयार्थ*—'*ब्रह्मन् वसुरण्वः असि-' हे ब्रह्मन्, तूं यथार्थ तत्त्वाचा उपदेष्टा आ*हेस. 'विभूः ( विभुः ) असि-' तसाच हिरण्यगर्भ, विराट् इत्यादि विविध रूपानें उत्पन्न झालेला आहेस. 'प्राणे सन्धाता त्वं असि-' वायुरूप प्राणामध्यें जीवात्म्यांची योजना करणारा आहेस. 'विश्वधृत् त्वं असि-' ब्रह्माण्डधारक आहेस. 'तेजोदाः त्व असि-' भूलोकवर्ती अग्नीला प्रकाशरूप धन देणारा आहेस. 'अग्निः असि-' तूंच साक्षात् अग्नि आहेस. 'सूर्यस्य वर्चोदाः त्वं असि-' स्वर्गस्थ सूर्याला प्रकाश देणारा आहेस. 'चन्द्रमसः द्युम्नोदाः त्वं असि-' चन्द्राला प्रकाश देणारा आहेस. '*तथा यागेषु सोमरूपः सन् उपयामेन गृहीतः* असि-' यज्ञामध्यें सोमरूप झालेला तूं उपयामनांवाच्या मृण्मय अथवा काष्ठमय पात्रानें ग्रहण केला गेलेला आहेस. ' त्वा महसे ब्रह्मणे भजामि-' अशाप्रकारच्या तुज अन्तर्या*मीला चैतन्यज्योतिःस्वरूप ब्रह्मतत्त्वाच्या साक्षात्काराकरितां मी भजतों.*

अशी स्तुति केल्यावर समाधीचें विधान करितात--

ओमित्यात्मानं युञ्जीतैतद्वै महोपनिषदं देवानां गुह्यम् ॥

**अन्वयार्थ**—' ॐ इति आत्मानं युञ्जीत-' तीन मात्रांनीं युक्त अशा प्रणवाचा उच्चार करून सर्व वेदान्तावरून *ज्याचा निर्णय झाला आहे* अशा आत्म्याला आत्मरूपानें चित्तांत धारण करावें. ( समाधि-साधनभूत ओंकाराची प्रशंसा-) ' एतत् वै महोपनिषदं देवानां गुह्य-' हें प्रणवरूपच महोपनिषद् आहे तें इन्द्रादि देवांचें गुह्य आहे. ( कारण ते शमदमादि अधिकाररहित पुरुषाला प्रणवाचा उपदेश करीत नाहींत. )

आतां या तत्त्वज्ञानाचें फल सांगतात—

य एवं वेद ब्रह्मणो महिमानमाप्नोति तस्माद्ब्रह्मणो महिमानम् इत्युपनिषत् ॥

**अन्वयार्थ**—' यः एवं वेद ब्रह्मणः महिमानं आप्नोति-' जो पुरुष वर सांगितल्याप्रमाणें ब्रह्मतत्त्वाला जाणतो तो आपल्या परिच्छेदक स्वरूपाचा त्याग करून देश-काल-वस्तु*परिच्छेदशून्य ब्रह्माच्या महत्त्वाला प्राप्त* होतो. ( *म्ह० तत्त्वज्ञानानें त्याचा जीवत्वकृत भ्रम* निवृत्त होतो आणि ब्रह्मस्वभाव आविर्भूत होतो. त्यानंतर तो जीवन्मुक्त होतो, व त्या जीवन्मुक्ताचा प्रारब्धक्षय होऊन देहपात झाला असतां ) ' तस्मात् ब्रह्मणः महिमान आप्नोति-' *त्या अविद्यानिवर्तक ज्ञानामुळें अविद्यावासनेनें* रहित झालेला तो मुख्य ब्रह्माच्या

महत्त्वास प्राप्त होतो. ( म्ह० त्याला विदेह मुक्ति मिळते. ) ' इति उपनिषद्.' अशी ही तत्त्वविद्या आहे. ( ७९ )

---

संन्यासच ब्रह्मज्ञानाचें अन्तरंग साधन असल्यामुळें जिज्ञासूला तो करणें योग्य आहे; अग्निहोत्रादि कर्मानुष्ठानच करीत राहणें उचित नव्हे, असें सांगितलें. पण तत्त्वसाक्षात्कार झाला असतां त्यानंतर पुनः कर्मानुष्ठान करावयास कोणती हरकत आहे, अशी शंका कोणी घेईल म्हणून तिचें निवारण करण्यासाठीं तत्त्वज्ञान्याचे सर्व लौकिक व्यवहारही यागरूप आहेत, असें या शेवटच्या अनुवाकांत सांगतात–पण त्यांतही या अनुवाकाच्या पूर्वभागानें योग्याचे अवयव यज्ञांगभूत द्रव्यें आहेत, असें सांगतात—

**तस्यैवं विदुषो यज्ञस्याऽऽत्मा यजमानः श्रद्धा पत्नी शरीरमिध्ममुरो वेदिर्लोमानि बर्हिर्वेदः शिखा हृदयं यूपः काम आज्यं मन्युः पशुस्तपोऽग्निर्दमः शमयिता दक्षिणा वाग्घोता प्राण उद्गाता चक्षुरध्वर्युर्मनो ब्रह्मा श्रोत्रमग्नीत् ॥**

**अन्वयार्थ**—' तस्य एवं विदुषः यः यज्ञः अस्ति तस्य यज्ञस्य देहेन्द्रियादिसाक्षी यः आत्मा सः एव यजमानसदृशः-' त्या पूर्वोक्त ब्रह्माचे महत्त्व जाणणाऱ्या संन्यासी जीवन्मुक्ताचा जो यज्ञ त्याचा देहेन्द्रियादिसाक्षी आत्मा हाच यजमानासारखा आहे. ' या तु तदन्तःकरणे श्रद्धा सा पत्नी-' त्याचप्रमाणें त्याच्या अन्तःकरणांतील जी श्रद्धा तीच पत्नी आहे. ' यद् शरीरं तत् इध्मं-' शरीर हाच इध्म ' उरः वेदिः-' उर हीच वेदि 'लोमानि बर्हिः' लोम हेच दर्भ ' वेदः शिखा-' वेद हीच शिखा, ' हृदयं यूपः-' हृदय हाच यूप, ' कामः आज्यं-' काम हेंच आज्य, ' मन्युः पशुः-' क्रोध हाच पशु, ' तपः अग्निः' तप हाच अग्नि ' शमयिता दमः दक्षिणा-' सर्वेन्द्रियांचें दमन करणारा दम ही दक्षिणा ' वाक् होता ' वाणी हाच होता, ' प्राणः उद्गाता- ' प्राण उद्गाता 'चक्षुः अध्वर्युः-' चक्षु अध्वर्यु ' मनः ब्रह्मा-' मन ब्रह्मा व ' श्रोत्रं अग्नीत्-' श्रोत्र अग्नीत् आहे.

या अनुवाकाच्या दुसऱ्या भागानें योग्याच्या व्यवहाराला ज्योतिष्टोमांगभूत क्रियारूपत्व आहे, असें सांगतात—

**यावद्ध्रियते सा दीक्षा यदश्नाति तद्धविर्यत्पिबति तदस्य सोमपानं यद्रमते तदुपसदो यत्संचरत्युपविशत्युत्तिष्ठते च स प्रवर्ग्यो यन्मुखं तदाहवनीयो या व्याहृतिराहुतिर्यदस्य विज्ञानं तज्जुहोति यत्सायंप्रातरत्ति तत्समिधं यत्प्रातर्मध्यंदिन॰ सायं च तानि सवनानि ॥**

**अन्वयार्थ**—' यावत् ध्रियते सा दीक्षा-' विद्वान् जोंवर कांहीं भोजन न करितां राहतो तीच याची दीक्षा ' यत् अश्नाति तत् हविः-' जें भोजन करतो तेंच हवि ' यत् पिबति तत् अस्य सोमपानं-' जें जलादिकांचें पान करितो तें सोमपान ' यत् रमते तत् उपसदः-' त्याचें रममाण होणें तेंच उपसद् ' यत् संचरति, उपविशति, उत्तिष्ठते च सः प्रवर्ग्यः-' त्याचा संचार, बसणें व उठणें तेंच प्रवर्ग्य, ' यत् मुखं तत् आहवनीयः ' जें मुख तोच आहवनीय अग्नि ' या व्याहृतिः सा आहुतिः-' भाषण हीच आहुति ' यत् अस्य विज्ञानं तत् जुहोति-' त्याचें जें विज्ञान तेंच हवन ' यत् सायंप्रातः अत्ति तत् समिधं-' जें सायंकाळीं व प्रातःकाळीं भोजन तीच समिधा, ' यत् प्रातः मध्यंदिनं सायं च तानि सवनानि-' जो प्रातःकाळ, मध्याह्नकाळ व सायंकाळ तीच सवनें.

आतां या अनुवाकाच्या तिसऱ्या भागानें जीवन्मुक्ताच्या विशेष कालांना नानाविध यागरूपत्व सांगतात—

ये अहोरात्रे ते दर्शपूर्णमासौ येऽर्धमासाश्च मासाश्च ते चातुर्मास्यानि य ऋतवस्ते पशुबन्धा ये संवत्सराश्च परिवत्सराश्च तेऽहर्गणाः सर्ववेदसं वा एतत्सत्रं यन्मरणं तदवभृथः ॥

अन्वयार्थ—'ये अहोरात्रे ते दर्शपूर्णमासौ-' जे अहोरात्र तेच दर्शपूर्णमास, 'ये अर्धमासाः च मासाः च ते चातुर्मास्यानि-' जे पक्ष व मास तीं चातुर्मास्यें, 'ये ऋतवः ते पशुबन्धाः-' जे ऋतु तेच पशुबन्ध, 'ये संवत्सराः च परिवत्सराः ते अहर्गणाः-'जे संवत्सर व परिवत्सर तेच अहर्गण, 'एतत् सत्रं सर्ववेदसं वै-' हें सत्र सर्वस्वदक्षिणाक आहे म्ह॰ यांत आयुष्यरूपी सर्व दक्षिणा दिली जाते. 'यत् मरणं तत् अवभृथः-' जें मरण तेंच अवभृथ स्नान होय.

या अनुवाकाच्या चवथ्या भागानें सर्व यज्ञात्मक योग्याची उपासना करणाऱ्याला क्रममुक्ति हें फल सांगतात—

एतद्वै जरामर्यमग्निहोत्रꣳ सत्रं य एवं विद्वानुदगयने प्रमीयते देवानामेव महिमानं गत्वादित्यस्य सायुज्यं गच्छत्यथ यो दक्षिणे प्रमीयते पितृणामेव महिमानं गत्वा चन्द्रमसः सायुज्यꣳ सलोकतामाप्नोत्येतौ वै सूर्याचन्द्रमसोर्महिमानौ ब्राह्मणो विद्वानभिजयति तस्माद्ब्रह्मणो महिमानमाप्नोति तस्माद्ब्रह्मणो महिमानम् ॥ ( ८० ) सह नाववत्विति शान्तिः ॥

अन्वयार्थ—'एतत् जरामर्यं अग्निहोत्रं सत्रं इति एवं विद्वान् यः उदगयने प्रमीयते सः देवानां महिमानं गत्वा आदित्यस्य सायुज्यं गच्छति-' जरामरणपर्यंत हें जें योग्याचें चरित्र आहे, तें वेदोक्त अग्निहोत्रादि संवत्सरसत्रान्त कर्माचें स्वरूपच आहे, अशी जो उपासना करतो तो उत्तरायणांत मरण पावल्यास इन्द्रादि देवांच्या ऐश्वर्यास प्राप्त होऊन त्यानंतर भावनेच्या न्यूनाधिकतेप्रमाणें आदित्याच्या सायुज्यास म्ह॰ सहवासाला अथवा तादात्म्याला प्राप्त होतो. 'अथ यः दक्षिणायने प्रमीयते सः पितृणां ( पितॄणां ) एव महिमानं गत्वा चन्द्रमसः सायुज्यं सलोकतां च आप्नोति-' पण याच्या उलट जा उपासक दक्षिणायनांत मरतो तो अग्निष्वात्तादि पितरांच्या ऐश्वर्यास प्राप्त होऊन पूर्वीप्रमाणें चन्द्रमाच्या सायुज्यास प्राप्त होतो. 'यः एवं एतौ सूर्याचन्द्रमसोः महिमानौ विद्वान् ब्राह्मणः अभिजयति-' अशा रीतीनें सूर्य व चन्द्रमा यांच्या ऐश्वर्याचा अनुभव घेणारा ब्राह्मण तेथें सगुण ब्रह्मरूप हिरण्यगर्भाची उपासना करून हिरण्यगर्भाच्या साक्षात्कारास प्राप्त होतो. 'तस्मात् ब्रह्मणः महिमानं आप्नोति-' नंतर त्या साक्षात्कारामुळें तेथील मरणानंतर तो हिरण्यगर्भाच्या लोकीं जाऊन तेथें त्याच्या ऐश्वर्यास प्राप्त होतो. 'तस्मात् ब्रह्मणः महिमानं आप्नोति-' पुढें त्या लोकीं ज्याला ब्रह्मसाक्षात्कार झाला आहे, असा तो ज्ञानामुळें ब्रह्मलोकाचा विनाश होतांच सत्यज्ञानादिरूप ब्रह्माच्या महत्त्वास प्राप्त होतो. ( ८० )

इति श्रीकृष्णयजुर्वेदीय तैत्तिरीय आरण्यकाचें दशम प्रपाठकरूप याज्ञिकी नारायणोप॰ निषद् आचार्यभक्त विष्णुशर्मकृत सान्वयार्थ समाप्त झालें. ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

ब्रह्मविद्याग्रन्थरत्नमाला वर्ष २ रें अंक ६ वा ७ वा.

रत्न आठवें.

# तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ.

( मूळ, भाष्य व अर्थ यांसह )

संपादक व प्रकाशक
आचार्यभक्तः—विष्णु वामन बापट.
पुणें, सदाशिव पेठ २४१.

निद्राजागरमध्यभागे संविद्भेदान्तरे तथा ।
मध्ये संविद्द्वयोश्च सूक्ष्मबुद्ध्याभिलक्षय ॥ १ ॥
एतत्पदं निजं रूपं यत्प्राप्य न विमुह्यति ।
एतदज्ञानमात्रेण प्रवृत्तं जगदीदृशम् ॥ २ ॥

श्रावण शु० ५ शके १८३६ आनंदनाम संवत्सर.

पुणें, ता० २७ जुलै १९१४.

हें पुस्तक दत्तात्रय गणेश खांडेकर यांनी पुणें पेठ शनिवार घर नं. ४४९ येथें आपल्या 'लॉ प्रिंटिंग' प्रेसमध्यें छापिलें व विष्णु वामन बापटशास्त्री यांनी पुणें पेठ सदाशिव घर नंबर २४१ येथें प्रसिद्ध केलें.

किंमत १ रुपाया.

# प्रस्तावना.

आज आह्मी ब्रह्मविद्याग्रंथरत्नमालेच्या वाचकांस आठवें रत्न "तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ" सप्रेम समर्पण करीत आहों. यांत मूळ उपनिषद् साध्या अक्षरांत देऊन त्या खालीं जाड अक्षरांनीं भाष्य व त्याच्या पुढें साध्या अक्षरांत भाष्यार्थ दिला आहे. पहिल्या भाष्यार्थापेक्षां यांत वाचकांना अधिक सोयीची वाटेल अशी सुधारणा केली आहे. मूळ उपनिषदाचा शब्दशः अर्थ चवथ्या रत्नांत दिलेला असल्यामुळें तो येथें दिलेला नाहीं. तथापि भाष्य कोणत्या श्रुतिवचनाचें आहे, हें स्पष्ट कळावें, ह्मणून त्या त्या भाष्याच्या आरंभीं तें तें मूळ दिलें आहे. तसेंच अर्थाच्याच ओळींत भाष्य न देतां या पुस्तकांत अर्थ व भाष्य हीं अगदीं निरनिराळीं दिलीं आहेत.

मूळ उपनिषदाचा सारांश चवथ्या रत्नांत दिला आहे. यास्तव या प्रस्तावनेंत त्याविषयीं अधिक कांहीं न लिहितां भाष्याचा तेवढा मुख्य विशेष सांगून ती संपवितों. भाष्याच्या आरंभीं उपोद्घातांत आचार्यांनीं पूर्वोत्तरकांडांचा संबंध व प्रयोजन सांगितलें आहे. पूर्वकांडावरून नित्य व काम्य कर्माचें ज्ञान झालें. आतां कर्मानुष्ठानाच्या हेतूचा परिहार करण्यासाठीं उत्तरकाण्डाचा आरंभ केला आहे. काम कर्मानुष्ठानाचा हेतु आहे. निष्काम अथवा आप्तकाम पुरुष कर्मामध्यें प्रवृत्त होत नाहीं. अविद्या निवृत्त झाली असतां स्वात्म्यामध्यें अवस्थान होणें हीच परप्राप्ति आहे. कर्में प्रारब्धफल व अनारब्धफल अशीं दोन प्रकारचीं असून तीं अनेक जन्मांमध्यें घडलेलीं असतात. तीं परस्पर विरुद्ध फळ देणारींही असतात. त्यामुळें एकाच जन्मांत त्या सर्वांचा उपभोगानें क्षय होऊन काम्य व निषिद्ध कर्में न केल्यामुळें स्वात्म्यामध्यें अवस्थान होणें हा मोक्ष यत्नापासून प्राप्त होऊं शकत नाहीं. नित्यप्रत्यवायपरिहार एवढेंच नित्य शुभ कर्माचें फळ मानणें अयोग्य आहे. नित्य कर्माच्या योगानें फक्त अशुभ कर्माचाच क्षय होईल. शुभ कर्माचा क्षय होणार नाहीं. कारण शुभ कर्माचा नित्य कर्मांशीं विरोध नाहीं. कारण तींही शुभ कर्मेंच आहेत; शुभ व अशुभ यांचा विरोध असतो; आणि विरुद्ध कर्मेंच परस्परांना बाधक होतात, असा नियम आहे.

त्याचप्रमाणें कर्मांना कारण होणाऱ्या कामाची निवृत्ति ज्ञानावाचून होत नाहीं. आत्म्याला न जाणणाऱ्या पुरुषाला अनात्मविषयाविषयीं कामना होते. आत्मा नित्य प्राप्त असल्यामुळें त्याच्याविषयीं कामना होणें अनुपपन्न आहे.

नित्य कर्माचें अकरण-अननुष्ठान हा अभाव आहे. त्याच्यापासून भावरूप प्रत्यवायाची उत्पत्ति होऊं शकत नाहीं. यास्तव पूर्व संचितपापामुळें नित्य कर्मेही न करणें, हें पुढील प्रत्यवायाचें ज्ञापक आहे. तसेंच निरतिशय प्रीतिरूप स्वर्ग हाच मोक्ष असून तो कर्मारब्धच आहे, असें कित्येकांचें ह्मणणें आहे. पण मोक्ष नित्य असल्यामुळें त्याचा आरंभ संभवत नाहीं, इत्यादि पुष्कळ विचार करून आचार्यांनीं ब्रह्मविद्येकरितां उपनिषदांचा आरंभ आहे, असें उपोद्घातांत ठरविलें आहे.

त्यानंतर शीक्षाध्यायाच्या बाराही अनुवाकांचें सरळ व सोपपत्तिक व्याख्यान केलें आहे. शेवटीं उपसंहार करताना पुनः नुसत्या कर्मांमुळेंच परम श्रेय होतें, कीं विद्यायुक्त कर्मांमुळें तें होतें, कीं विद्या व कर्म या दोन्हींमुळें होतें, कीं कर्मयुक्त विद्येनें होतें, कीं केवल विद्येनें होतें, असे पांच प्रश्न उपस्थित करून त्यांतील पहिल्या चार प्रश्नांचें निराकरण केलें आहे.

नंतर ब्रह्मवल्ल्यध्यायाच्या व्याख्यानास आरंभ करून 'ब्रह्मविदाप्नोति परं' या वाक्याचा सोपपत्तिक अर्थ सांगितला आहे. ब्रह्मज्ञ ब्रह्माला प्राप्त होतो, ह्मणजे काय याचा सविस्तर विचार केला आहे. नंतर त्याच सूत्रभूत वाक्याचें विवरण करण्यासाठीं प्रवृत्त झालेल्या 'सत्यं ज्ञानं०' इत्यादि ऋचेचें व्याख्यान करून सत्यादि पदें ब्रह्माचीं नुसतीं विशेषणें नसून लक्षणें आहेत असें सांगितलें आहे. नंतर लक्षणांतील सत्यादि पदांचा उपयोग सांगितला आहे. पुढें सत्यादि पदांच्या अर्थाविषयींच पुष्कळ विचार करून त्या लक्षणानें लक्षित झालेलें ब्रह्म हृदयाकाशांतील बुद्धिगुहेंत आहे, असें जो जाणतो त्याला सर्व कामांची एकाच वेळीं प्राप्ति होते, हें त्या विज्ञानाचें फळ सांगितलें आहे.

'सत्यं ज्ञानं–' या मंत्राच्या व्याख्यानानंतर पुढील ग्रंथाच्या अवतरणार्थ मागील ग्रंथाचा अनुवाद करून पुनरपि ब्रह्म सत्य ज्ञान व अनन्त कसें

तें सविस्तर वर्णिलें आहे. नंतर 'तस्माद्वा०' या सृष्टिवाक्याचें तात्पर्य सांगून त्याच्या व्याख्यानास आरंभ केला आहे. त्यांत सर्वच शरीरें अन्नापासून होत असतांना अन्नापासून पुरुष होतो, असें ह्मणून मनुष्यशरीराचेंच ग्रहण करण्याचें कारण काय तें सांगितलें आहे. नंतर अन्नमयादि कोशांचें सविस्तर व सोपपत्तिक व्याख्यान करून शेवटीं आनन्दमय हा मुख्य आत्मा नसून कार्यात्मा आहे, असें अनेक उपपत्तींनीं दाखविलें आहे.

ब्रह्म आहे किंवा नाहीं, असा पुष्कळांना संशय येतो. यास्तव तें आहे, असेंच प्रत्येकानें समजावें, ह्मणून 'तें नाहीं,' असें ह्मणणारा असत् होतो; व 'आहे' असें ह्मणणाराला ब्रह्मज्ञ 'सन्त' समजतात,' असें सांगितलें आहे. त्यानंतर अनुप्रश्न व त्यांचें सोपपत्तिक उत्तर, कार्यांतील प्रवेश, आनंदाच्या मीमांसेचें कारण, ती मीमांसा, या सर्वांचें व्याख्यान केल्यावर दुसरा ब्रह्मवल्ल्यध्यायही संपविला आहे.

भाष्यकारांनीं तिसऱ्या भृगुवल्ल्यध्यायाचेंही व्याख्यान आपल्या नेहमींच्या विवेचक व सोपपत्तिक पद्धतीनें करून प्रस्तुत उपनिषद्भाष्य संपविलें आहे. आह्मी येथें त्यांतील विषयांचें दिग्दर्शन केलें आहे. त्यांचें साक्षात् ज्ञान मूळ भाष्यावरूनच अगदीं स्पष्टपणें होण्यासारखें असल्यामुळें व तें सरळ अर्थासह या पुढेंच दिलेलें असल्यामुळें येथें अधिक विस्तार करीत नाहीं. या पुढील अंक 'श्रीवल्लभदर्शनसार' (समतभेद) भाद्रपद शु० पंचमीला प्रसिद्ध होईल, असें सुचवून ही प्रस्तावना संपवितों.

पुणें, आषाढ वद्य द्वादशी
शके १८३६

विष्णु वामन बापट,
संपादक ब. वि. ग्रं. रत्नमाला.

---

## विषयानुक्रमणिका.

ब्रह्मविद्याग्रन्थरत्नमाला, वर्ष दुसरें, अंक ६ वा.

## रत्न ८ वें.

# तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ.

श्रीगणेशाय नमः। श्रीसरस्वत्यै नमः। श्रीसद्गुरवे नमः। वेदान्तसंप्रदायप्रवर्तक ऋषी व आचार्य यांस प्रणाम करून स्वबोधशुद्ध्यर्थ व जिज्ञासुजनोपकारार्थ मी हा तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ लिहितों.

यजुर्वेदाच्या तैत्तिरियशाखेच्या उपनिषदाचें व्याख्यान करण्याची इच्छा करणारे भगवान् भाष्यकार त्या उपनिषदाचें प्रतिपाद्य जें ब्रह्म तें नमस्काराच्या मिषानें संक्षेपतः दाखवितात—

**यस्माज्जातं जगत्सर्वं यस्मिन्नेव प्रलीयते ।**
**येनेदं धार्यते चैव तस्मै ज्ञानात्मने नमः ॥ १ ॥**

**अन्वयः**—यस्मात् सर्वं जगत् जातं यस्मिन् एव प्रलीयते येन च इदं सर्वं धार्यते तस्मै ज्ञानात्मने नमः ॥

**अर्थ**— ज्याच्यापासून हें सर्व जगत् उत्पन्न झालें, ज्यामध्येंच तें पूर्णपणें लीन होतें, व ज्याच्याकडून हें धारण केलें जातें त्या ज्ञानात्म्याला नमस्कार असो. ( ' यस्मात् ' या पंचमीवरून जगाच्या प्रकृतीचा चांगलासा बोध होत नाहीं. कारण ती विभक्ति कार्याचें निमित्तही सुचविते. यास्तव ' यस्मिन्० ' इत्यादि दुसऱ्या चरणानें जगाची प्रकृति दाखविली आहे. कारण कार्याचा विलय प्रकृतींतच होतो, असा नियम आहे. ' येन० ' इत्यादि तिसऱ्या चरणानें जगाचें साधारण कारण सांगितलें आहे. या श्लोकाच्या तिन्ही चरणांनीं ब्रह्माचें तटस्थ लक्षण सांगितलें आहे आणि ' ज्ञानात्मने ' या पदानें त्याचें स्वरूप-लक्षण सांगितलें आहे. तटस्थ व स्वरूप लक्षणांचें लक्षण रत्न ६ पृष्ठ ११२ यांत पहा. ) १.

गुरुभक्ति हें विद्याप्राप्तीचें अंतरंग साधन आहे, असें सुचविण्यासाठीं गुरूंना प्रणाम करतात—

**यैरिमे गुरुभिः पूर्वं पदवाक्यप्रमाणतः ।**
**व्याख्याताः सर्ववेदान्तास्तान्नित्यं प्रणतोऽस्म्यहम् ॥ २ ॥**

**अन्वयः**—पूर्वं यैः गुरुभिः इमे सर्ववेदान्ताः पदवाक्यप्रमाणतः व्याख्याताः अहं तान् नित्यं प्रणतः अस्मि ॥

**अर्थ**—पूर्वी ज्या गुरूंनीं हे सर्व वेदान्त ( उपनिषदें ) पदें वाक्यें व अनुमानादि प्रमाणें यांच्या विवेचनपूर्वक स्पष्ट रीतीनें सांगितले ( त्यांचें व्याख्यान केलें ) त्यांच्यापुढें मी नित्य प्रणत आहे. ( त्यांच्या विषयीं मी नित्य आदर बाळगतों. मी त्यांना नित्यनमस्कार करतों. कारण त्यांनीं कृपा करून वेदान्तांचें व्याख्यान करून मला ते शिकविले ह्मणून मी आतां आत्मानुभव घेत आहें. त्यांनीं ते जर शिकविले नसते तर मी अपरोक्ष ज्ञानाचा अधिकारी कधीं झालों नसतों. यास्तव त्यांचे उपकार आठवणें सर्वथा उचित आहे. ) २.

आतां पुढील श्लोकांत भाष्यकार आपल्या इष्ट कर्तव्याची प्रतिज्ञा करितात—

**तैत्तिरीयकसारस्य मयाऽऽचार्यप्रसादतः ।**
**विस्पष्टार्थरुचीनां हि व्याख्येयं संप्रणीयते ॥ ३ ॥**

**अन्वयः**—मया तैत्तिरीयकसारस्य इयं व्याख्या विस्पष्टार्थरुचीनां अर्थे आचार्यप्रसादतः संप्रणीयते ॥

**अर्थ**—मी तैत्तिरीयकसाराची ही व्याख्या विशेष प्रकारें स्पष्टार्थ जाणण्याची इच्छा करणारांकरितां आचार्यांच्या प्रसादानें करतों. ( मज-कडून ही व्याख्या केली जाते, असा मूळ श्लोकांत कर्मणि प्रयोग आहे. ज्यांना शास्त्रव्युत्पत्ति झालेली असते, त्यांना सूत्रकारांनीं निरूपिलेल्या उप-निषत्तात्पर्यावरूनच त्यांचा बोध होतो. पण साधारण मतिमंदांना त्यावरून

बोधकाल असणें, म्हणजे त्यानें विरुद्ध अर्थाचा बोध करणें शक्य नाहीं. कारण एकाच वस्तूचे ठिकाणीं कृत व कर्तव्य यांचें असंबंधित्व [ म्ह. केलेलें व करावयाचें कर्म यांचा कांहीं संबंध नसणें] व तद्विपरीतत्व [म्ह. त्याच्या विपरीत कृत व कर्तव्य यांचा संबंध असणें ] यांचा बोध करणें शक्य नाहीं. एकाच अग्नीच्या ठिकाणीं शीतत्वही आहे व उष्णत्वही आहे, असा बोध करतां येणें जसें अशक्य, त्याप्रमाणें.(आत्मा मागें केलेल्या व पुढें करावयाच्या कर्मांशीं संबंध ठेवणारा, त्यांच्या योगानें लिप्त होणारा, पुण्यवान् व पापी होणारा नाहीं, व तो त्यांच्याशीं संबंधादि ठेवणारा आहे, असा विरुद्ध अर्थ शास्त्रालाही सांगतां येणार नाहीं.)

न चेष्टयोगचिकीर्षा आत्मनोऽनिष्टवियोगचिकीर्षा च शास्त्रकृता, सर्वप्राणिनां तद्दर्शनात् । शास्त्रकृतं चेत्तदुभयं गोपालादीनां न दृश्येत अशास्त्रज्ञत्वात्तेषाम् । यद्धि स्वतोऽप्राप्तं, तच्छास्त्रेण बोधयितव्यम् । तच्चेत्कृतकर्तव्यताविरोध्यात्मज्ञानं शास्त्रेण कृतं, कथं तद्विरुद्धां कर्तव्यतां पुनरुत्पादयेच्छीततामिवाग्नौ तम इव च भानौ ॥ न बोधयत्येवेति चेत् । न, 'स म आत्मेति विद्यात्प्रज्ञानं ब्रह्म' इति चोपसंहारात् ॥ 'तदात्मानमेवावेत्' 'तत्त्वमसि' इत्येवमादिवाक्यानां तत्परत्वात् । उत्पन्नस्य च ब्रह्मात्मविज्ञानस्याबाध्यमानत्वान्नानुत्पन्नं भ्रांतं वेति शक्यं वक्तुम् ॥

भाष्यार्थ—( येणेंप्रमाणें अगोदर विद्वान् पुरुष नियोगाचा विषय न होणारा व अकर्ता, अशा आत्म्याला साक्षात् जाणणारा असल्यामुळें आणि त्याला प्रयोजनाची —फलाची इच्छा नसल्यामुळें कर्म नाहीं, असें सांगितलें. आतां विद्वानाला इष्टप्राप्ति व अनिष्टनिवृत्ति या फलांची इच्छा स्वतः नसली तरीही 'स्वर्गकामो यजेत,' म्हणजे ज्याला स्वर्गाची इच्छा असेल त्यानें यज्ञ करावा, या शास्त्राकडूनच ती इच्छा पुरुषाच्या मनांत उत्पन्न केली जाते, असें कोणी मीमांसक म्हणतील, यास्तव आचार्य सांगतात– ) आपला इष्टपदार्थांशीं योग–संबंध व्हावा, अशी इच्छा व अनिष्ट पदार्थांशीं वियोग व्हावा अशी इच्छा, शास्त्रकृत नव्हे. [ म्ह. आपला अनुकूल वस्तूंशींच संयोग व्हावा व प्रतिकूल वस्तूंशीं झालेल्या संयोगाचा वियोग व्हावा ही इच्छा शास्त्राच्या विधानामुळें, शास्त्राच्या उपदेशामुळें होत नाहीं. ] कारण सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं ती स्वाभाविकपणेंच दिसते. ती दोन्ही प्रकारची इच्छा शास्त्रकृतच जर असती, तर गुराखी इ-

त्यादि अशास्त्रज्ञांच्या ठिकाणीं तो दिसली नसती. कारण ते शास्त्रज्ञ नसतात. (भाष्यांत 'चिकीर्षा' म्हणजे करण्याची इच्छा, असा जरी शब्द असला, तरी त्याचा अर्थ नुस्ती फलेच्छा असाच समजावा. कारण फलाच्या ठिकाणीं 'करण्याची इच्छा' होणें अयोग्य आहे. फळ आपोआप होतें; तें कोणच्या करण्याच्या इच्छेनें होत नाहीं.)

(कृत व कर्तव्य यांच्याशीं आत्म्याचा संबंध नाहीं, असें सांगणें व त्याच्याशीं आत्मसंबंध आहे, असें म्हणणें हें परस्परविरुद्ध आहे, यास्तव शास्त्र त्याचा बोध करीत नाहीं, असें जर वाटत असेल, तर कृत व कर्तव्य यांच्याशीं आत्मसंबंध नाहीं, असा बोध तें करीतच नाहीं, तें आत्मा कृत व कर्तव्य कर्माशीं संबंध ठेवणारा आहे, असाच बोध करतें, असें समजा, म्हणून म्हणाल तर सांगतों–) जें स्वतः–स्वाभाविकपणेंच अप्राप्त असतें, त्याचा शास्त्रानें बोध करणें उचित होय. (जें लौकिक प्रत्यक्षादि दुसऱ्या प्रमाणांनीं प्राप्त–ज्ञात–झालेलें नसतें, त्याचाच बोध शास्त्र करतें. जें अन्यप्रमाणांनीं प्राप्त असतें त्याचें विधान तें करीत नाहीं, असा नियम आहे. आत्म्याचा कृत अथवा कर्तव्य कर्माशीं संबंध नाहीं, हें ज्ञान दुसऱ्या कोणत्याही प्रमाणानें प्राप्त होत नाहीं. यास्तव शास्त्रासच त्याचा बोध करणें उचित आहे. आत्म्याचा कर्माशीं संबंध आहे, असेंच ज्ञान स्वाभाविकपणें सर्वांना असतें. यास्तव वस्तुतः शास्त्राला त्याचाच बोध करण्याची आवश्यकता नाहीं.) कृत व कर्तव्यता यांच्या विरुद्ध असलेलें तें आत्मज्ञान जर शास्त्राकडून केलें गेलेलें असलें, तर मग पुनः त्याच्या विरुद्ध असलेल्या कर्तव्यतेला, तेंच शास्त्र अग्नीच्या ठिकाणीं जशी शीतता व सूर्यामध्यें अंधकार त्याप्रमाणें, कसें उत्पन्न करील? (मीं हें केलें आहे व मला हें करावयाचें आहे, या ज्ञानाच्या विरोधी असलेल्या आत्मज्ञानाचा उपदेश केल्यानंतर तेंच शास्त्र त्या ज्ञानाच्या विरुद्ध असलेल्या कर्तव्यताज्ञानाचा उपदेश कसा करील?)

(अहो पण कर्माशीं संबंध न ठेवणाऱ्या आत्म्याचें ज्ञान करून घ्यावें, असा विधि कोठेंही नाहीं. म्हणून वेदान्तही तशा प्रकारच्या आत्म्याचा बोध करीत नाहीं, अशी शंका घेतात–) शास्त्र तसा बोध करीत नाहींच, असें म्हणाल तर–(समाधान–) तें बरोबर नाहीं. 'तो माझा आत्मा आहे, असें जाणावें व प्रज्ञान–जीवचैतन्य ब्रह्म आहे,' असा उपसंहार केला

आहे. ( आत्मज्ञानाविषयीं विधि नाहींच, हें म्हणणें साहस होय. कारण *पुरुषाला कर्तव्याभिमुख करणें, हें विधीचें प्रयोजन आहे.* ' आत्मा वा अरे द्रष्टव्यः ' इत्यादि वेदान्तवाक्यें अर्थवादरूप असलीं तरी त्यांच्यामध्यें विधीचें स्वरूप आहे. ' द्रष्टव्यः' हा शब्द विध्यर्थीच आहे. शिवाय स्वरूपाचा बोध करणारें केवळ आत्मपर वाक्यही आहे. यास्तव आत्मबोधक वेदान्तवाक्यच नाहीं, असें म्हणणें अयोग्य होय.)

( त्याचप्रमाणें ज्ञानाच्या उत्पत्तीचा अनुवाद करणारी श्रुति असल्यामुळेंही ज्ञान होत नाहीं, अशी आशंका घेणें अनुचित होय, असें सांगतात- ) तें जीवरूपानें अवस्थित असलेलें ब्रह्म आपल्यालाच जाणतें झालें, [त्याचप्रमाणें] ' तत्त्वमसि-' 'तत्-' तें सद्रूप ब्रह्मच 'त्वं-' तूं श्वेतकेतु 'असि-' आहेस. इत्यादि वाक्यांना आत्मपरता आहे. [ हा. तीं वाक्यें आत्म्याचें प्रतिपादन करणारीं आहेत. वरील भाष्यांतील आदिशब्दानें ' अयमात्मा ब्रह्म ' इत्यादि दुसरींही महावाक्यें घ्यावीं. पण हीं वाक्यें ' आत्मा कर्ता आहे ' असा बोध करणाऱ्या सर्व कर्मकांडाच्या विरुद्ध आहेत. यास्तव तसल्या वाक्यांनीं आत्मा अकर्ता आहे, इत्यादि ज्ञान जरी होत असलें, तरी तें भ्रांत ज्ञान आहे, असें कोणी म्हणेल म्हणून आचार्य सांगतात-- ] आणि उत्पन्न झालेल्या त्या ब्रह्मात्मज्ञानाचा बाध होत नसल्यामुळें, तें मुळीं उत्पन्नच झालें नाहीं, अथवा तें भ्रांत ज्ञान आहे, असें म्हणतां येणें शक्य नाहीं. ( कर्मकांडावरून होणारें ' आत्मा कर्ता आहे, ' हें ज्ञान वास्तविक नव्हे. कर्मकांडानें मनुष्यमात्राला स्वभाविकपणेंच ज्ञात होणाऱ्या आत्म्याच्या कर्तृत्वाचा अनुवाद करून केवळ उत्कर्षाचा उपाय सांगितला आहे. त्यामुळें त्याच्या योगानें केवळ आत्मबोधक वेदान्तवाक्यजन्य ज्ञानाचा बाध होत नाहीं. शिवाय आत्मबोधक वाक्य ऐकलें असतां ' अकर्ता आत्मा मी आहें ' असें ज्ञान होतें, ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे. तसेंच, ' मी अकर्ता आत्मा नव्हें, ' असें विपरीत ज्ञानही होत नसल्यामुळें ' ज्ञान होतच नाहीं व तें भ्रान्त आहे,' असें म्हणणें सर्वथा अनुचित आहे.)

त्यागेऽपि प्रयोजनाभावस्य तुल्यत्वमिति चेत् " नाकृतेनेह कश्चन " इति स्मृतेः । य आहुर्विदित्वा ब्रह्म व्युत्थानमेव कुर्यादिति तेषामप्येष समानो दोषः प्रयोजनाभाव इति चेत् । न । अक्रियामात्रत्वात् व्युत्थानस्य । अविद्यानिमित्तो हि प्रयोजनस्य भावो न वस्तुधर्मः । सर्वप्राणिनामदर्शनात्॥

भाष्यार्थ—(विद्वानाला कर्माच्या योगानें कांहीं फळ मिळवावयाचें नसल्यामुळें त्याची कर्ममध्यें प्रवृत्ति होत नाहीं, असें आह्मीं वर सांगितलें आहे. पण त्यावर वादी शंका घेतो— ) कर्माच्या त्यागामध्येंही प्रयोजनाचा अभाव तुल्यच आहे [ ह्मणजे विद्वानाला कर्मानुष्ठानामुळें जसें कांहीं फळ मिळावयाचें नाहीं, तसेंच कर्मत्यागामुळेंही कांहीं फळ मिळणें शक्य नाहीं. यास्तव फळाच्या अभावीं त्याची प्रवृत्ति कर्माप्रमाणेंच कर्मत्यागामध्येंही होणार नाहीं, ] ह्मणून ह्मणाल, कारण ( त्या विद्वानाला कर्मानुष्ठान केल्यामुळें जसें कांहीं फळ मिळत नाहीं त्याचप्रमाणें) तें 'अकृतेन-' न केल्यानेंही 'इह-' या लोकीं 'कश्चन-' कांहीं अर्थ 'न-' नाहीं, असें भगवद्गीतेंत सांगितलें आहे, ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. [ आतां या शंकेचेंच आधिक विवरण करितात—] ब्रह्माला जाणून व्युत्थानच करावें, संन्यास करावा, असें जे ह्मणतात, त्यांच्या म्हणण्यावरही हा प्रयोजनाभावरूप दोष तसाच येतो, म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. [कर्मत्याग म्हणजे संन्यास, हा जर व्यापाररूप असता तर कोणताही व्यापार क्लेशात्मक असतो, असा न्याय असल्यामुळें व कोणीही कोणताही क्लेश फळावाचून सहन करण्यास तयार होत नाहीं, असा नियम असल्यामुळें पुरुष संन्यासही फळाच्या अपेक्षेनेंच करितो, असें म्हणतां आलें असतें, पण वस्तुस्थिति तशी नाहीं. तर संन्यास म्हणजे नुसता क्रियांचा अभाव, औदासीन्य; यापेक्षां संन्यासाचें निराळें स्वरूप नाहीं. अर्थात् सर्व कर्मांचा अभाव किंवा औदासीन्य, हें स्वास्थ्यरूप आहे. त्यामुळें स्वतः तेंच प्रयोजन आहे. यास्तव संन्यास आणखी एखाद्या फळाच्या अपेक्षेनें होतो, असें ह्मणण्याचें कांहीं कारण नाहीं, असें आचार्य सांगतात—] कारण व्युत्थान अक्रियामात्र आहे. ( त्याग हा व्यापार नव्हे. कारण कोणताही व्यापार सहेतुक असतो. त्यागाला कांहीं नियत हेतु नाहीं, असें सांगण्यासाठीं भाष्यकार म्हणतात—) कारण फळाची तृष्णा अविद्यानिमित्तक आहे. ह्मणजे अविद्या—आत्मस्वरूपाचें अज्ञान हें फळाच्या तृष्णेचें निमित्त आहे. त्यामुळें ती वस्तुधर्म नव्हे. ( कारण तृष्णा हा जर वस्तुधर्म असता, तर विद्वानालाही तृष्णा होणें साहजिक होतें. पण तो वस्तुधर्म—आत्मस्वभाव नव्हे. तर अविद्येमुळें आत्म्याचे ठिकाणीं उद्भवणारा औपाधिक स्वभाव आहे. तो जर वस्तुधर्म असता तर विद्वान्, अविद्वान्, निजलेले, मूर्च्छित होऊन पडलेले, इत्यादि सर्वांना तृष्णा होत असल्याचा अनुभव आला असता. कारण त्या त्या सर्व दशेंत वस्तु—आत्मा

असतो, त्यामुळें त्याच्या स्वभावभूत तृष्णेचाही अनुभव येणें साहजिक होय. पण तसा तो येत नाहीं. तस्मात् तृष्णा हा वस्तुस्वभाव नव्हे.) कारण सर्व प्राण्यांना सर्वदा तृष्णा असते, असें दिसत नाहीं.

प्रयोजनतृष्णया च प्रेर्यमाणस्य वाङ्मनःकायैः प्रवृत्तिदर्शनात् । ' सोऽकामयत जाया मे स्यात् ' इत्यादिना पुत्रवित्तादि पांक्तलक्षणं काम्यमेवेति " उभे ह्येते साध्यसाधनलक्षणे एषणे एव " इति वाजसनेयिब्राह्मणेऽवधारणात् ॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें तृष्णा अविद्याजन्य आहे, असें सांगून आतां ती तृष्णाच प्राण्याच्या सर्व प्रवृत्तींचें, सर्व व्यापारांचें निमित्त आहे, असें सांगतात– ) फलाच्या तृष्णेनें प्रेरित होणाऱ्या पुरुषाची वाणी, धन व शरीर यांच्या योगानें प्रवृत्ति होते, असें आढळतें. [ ह्मणजे तृष्णेच्या योगानेंच प्राण्याची सर्व प्रवृत्ति होत असते असें दिसतें आणि नुसतें दिसतें इतकेंच नव्हे तर तसें सांगणारी श्रुतिही आहे.] 'तो आत्मा मला भार्या असावी, अशी इच्छा करता झाला, ' या वाक्यापासून आरंभ करून ' या दोन्ही साध्यसाधनरूप एषणाच आहेत'या वाक्यानें पुत्र-वित्तादि पांक्तलक्षण कर्म काम्यच आहे,असा वाजसनेयिब्राह्मणांत निश्चय केला आहे. [ पंक्ति हा छंद पाच अक्षरांचा असतो. येथेंही भार्या, पुत्र, दैववित्त, मानुषवित्त व कर्म या पांचांचा योग आहे. ह्मणून हें कर्म पांक्तलक्षण, पंक्ति-छंदाच्या लक्षणानें युक्त आहे. ]

अविद्याकामदोषनिमित्ताया वाङ्मनःकायप्रवृत्तेः पांक्तलक्षणाया विदुषोऽविद्यादिदोषाभावादनुपपत्तेः । क्रियाभावमात्रं व्युत्थानं, न तु यागादिवदनुष्ठेयरूपं भावात्मकम् । तच्च विद्यावत्पुरुषधर्म इति न प्रयोजनमन्वेष्टव्यम् । न हि तमसि प्रविष्टस्योदित आलोके यद्गर्तपंककंटकाद्यपतनं तत्किंप्रयोजनमिति प्रश्नार्हम् ॥

*भाष्यार्थ—( याप्रमाणें क्रियेचें निमित्त सांगून, तें नसल्यामुळेंच आत्मज्ञानाचा कर्मत्याग अनायासानेंच सिद्ध होतो, असें आचार्य सांगतात–)* विद्वानाला अविद्या–काम–कर्म या दोषांचा अभाव असल्यामुळें ( आत्मज्ञाचे ठिकाणीं त्यांचा अभाव असल्यामुळें ) अविद्या व तज्जन्य फलतृष्णा हे दोषच जिचें निमित्त आहे, अशा पांक्तलक्षण वाचिक, मानसिक व शारीर प्रवृत्ती-

चीच अनुपपत्ति होते. [ म्ह. तीन्ही प्रकारची प्रवृत्ति होणें अशक्य होतें.] त्यामुळें नुस्ता क्रियेचा-प्रवृत्तीचा अभाव हेंच व्युत्थान आहे. तें यज्ञादिकांप्रमाणें अनुष्ठानरूप, भावरूप नव्हे. ( तर अनुष्ठानाच्या अभावरूप आहे. तृष्णेच्या अभावीं विद्वानाचें क्रियाभावरूप व्युत्थान अनायासानेंच सिद्ध होतें. अर्थात् अशा रीतीनें औदासीन्यरूप कर्माभाव हा आत्मज्ञाचा स्वभाव असल्यामुळें तो यत्नावांचूनच सिद्ध आहे, असें एकदा ठरलें म्हणजे मग त्याच्या प्रयोजनाची अपेक्षाच रहात नाहीं, असें भाष्यकार सांगतात–) तें व्युत्थान हा विद्यावान् पुरुषाचा धर्म-स्वभाव आहे, यास्तव त्याचें प्रयोजन शोधण्याची कांहीं आवश्यकताच नाहीं. ( अज्ञानाची निवृत्ति झाली असतां अज्ञानाचें कार्य आपोआप निवृत्त होतें, याविषयीं दृष्टांत सांगतात–) कारण अंधकारांत प्रविष्ट झालेल्या पुरुषाचें–प्रकाशाचा उदय झाला असतां खळगे, चिखल, कांटे इत्यादिकामध्यें–न पडणें याचें प्रयोजन काय, असा प्रश्न करतां येत नाहीं. [ म्हणजे अंधकारांतून जात असतांना जसा एखादा पुरुष अडखळतो, खड्यांत पडतो, चिखल, कांटे इत्यादिकांत पडतो, तसा तो प्रकाशाचा उदय झाला असतां पडत नाहीं, पण त्याच्या त्या न पडण्याचें फळ काय, असा प्रश्न करणें फारसें शहाणपणाचें नव्हे. ]

व्युत्थानं तर्ह्यर्थप्राप्तत्वान्न चोदनार्हमिति । गार्हस्थ्ये चेत्परं ब्रह्मविज्ञानं जातं तत्रैवास्त्वकुर्वत आसनं न ततोऽन्यत्र गमनमिति चेत् । न । कामप्रयुक्तत्वाद्गार्हस्थ्यस्य । 'एतावान्वै कामः' इति 'उभे ह्येते एषणे एव' इत्यवधारणात् । कामनिमित्तपुत्रवित्तादिसंबंधनियमाभावमात्रं, न हि ततोऽन्यत्र गमनं व्युत्थानमुच्यते । अतो न गार्हस्थ्य एवाकुर्वत आसनमुत्पन्नविद्यस्य । एतेन गुरुशुश्रूषातपसोरप्यप्रतिपत्तिर्विदुषः सिद्धा ॥

भाष्यार्थ—( आतां याविषयीं वादी–अहो व्युत्थान पुरुषाच्या व्यापाराधीन नाहीं, *संन्यास करणें, म्हणजे सर्व प्रवृत्तींचा त्याग करणेंच आहे*, त्याहून दुसरें कांहीं कर्तव्य नाहीं, म्हणून जर म्हणाल तर विधीला अवकाशच रहात नाहीं. त्यामुळें विद्वानाचें नियमानें व्युत्थानच होईल, असाही भरंवसा देतां येत नाहीं–अशी शंका घेतो–) तर मग व्युत्थान अर्थप्राप्तच असल्यामुळें [ त्याच्याकरितां दुसऱ्या विधानादिकांची आवश्यकताच नसल्यामुळें ] तें चोदनावाक्याचा [ अमुक कर, अशा प्रवर्तक वाक्याचा ] विषय होण्यास

योग्य नाहीं. वास्तव गृहस्थाश्रमांतच परब्रह्मविज्ञान जर झालें, तर त्या आश्रमांतच कांहीं एक कर्म न करणाऱ्या त्याचें आसन, अवस्थान, स्थिति होवो, त्या आश्रमास सोडून दुसऱ्या आश्रमांत [ संन्यासाश्रमांत ] त्याचें गमन होणें योग्य नव्हे म्हणून जर म्हणशील तर तें बरोबर नाहीं. कारण गार्हस्थ्य —गृहस्थाश्रम कामयुक्त आहे. [तृष्णेमुळें, पुत्रादिकांच्या कामनेमुळें गृहस्थाश्रम प्रवृत्त होतो.] कारण ' काम काय तो एवढाच, ' 'ह्या दोन्ही एषणाच आहेत ' असा निश्चय केलेला आहे. ( तूं गृहस्थाश्रम कशाला समजतोस ? ' मी गृहस्थ आहें, ' अशा अभिमानपुरःसर 'हा माझा पुत्र, हें माझें धन ' इत्यादि अभिमान असणें, हा गृहस्थाश्रम ? की शिखा, यज्ञोपवीत, शुभ्र वस्त्रें इत्यादि गृहस्थांची चिह्नें, हा गृहस्थाश्रम ? पहिला पक्ष तुला मान्य असेल तर आत्मज्ञ हा गृहस्थ नव्हे, असें तुम्हाही कबूल करावें लागेल. कारण विद्येमुळें आत्मज्ञाच्या ठिकाणचा अविद्याकार्यरूप अभिमान निवृत्त झालेला असतो आणि दुसरा पक्ष तुला मान्य असेल तर विद्वानाच्या ठिकाणीं गृहस्थांचीं पूर्वोक्त चिह्नं जरी असलीं तरी त्याविषयींचा अभिमान नसल्यामुळें तीं [ चिह्नें ] अकिंचित्कर–व्यर्थ आहेत. संन्याशाच्या ठिकाणीं जसा अभिमान नसतो, तसाच त्याच्याही ठिकाणीं तो नसल्यामुळें बाहेरून गृहस्थाच्या चिह्नांनीं मंडित झालेलाही तो परमार्थतः संन्याशीच आहे. पण यावर—असें जर आहे तर संन्याशाच्या लिंगांविषयींही विद्वानाला अभिमान नसल्यामुळें त्याच्या संन्यासाश्रमाचीही असिद्धि होते. म्हणजे त्याचा संन्यासाश्रमही सिद्ध होत नाहीं, —म्हणून म्हणाल तर सांगतों–) कामनाप्रयुक्त पुत्रवित्तादिसंबंधाचा नियमानें अभाव, हें एवढेंच व्युत्थान आहे. त्यांच्यापासून दुसऱ्या कोठें जाणें, याला व्युत्थान म्हणत नाहींत. ( मला पुत्र व्हावा, अशा कामनेमुळें पुत्रादिकांशीं संबंध होतो. त्याचा नियमानें अभाव होणें, हेंच काय तें व्युत्थान आहे. दुसऱ्या कोठें जाणें, हें व्युत्थान नव्हे. हा माझा पुत्र आहे, हें माझें धन आहे, इत्यादि प्रकारचा सर्व अभिमान टाकणें, हाच संबंधाचा नियमानें अभाव आहे, आणि अभिमानत्यागाच्या द्वारा सर्वांचा संबंध सोडणें, हेंच परमहंस परिव्राजाचें मुख्य लक्षण आहे. कोणत्याही प्रकारचें विशेष लिंग–चिह्न धारण करणें हें त्याचें [ संन्याशाचें ] लिंग नव्हे. कारण ' कोणतेंही चिह्न हें धर्माचें निमित्त नव्हे, ' असें सांगणारी स्मृति आहे. यास्तव गृहस्थाचें चिह्न असलें तरी अभिमानशून्य गृहस्थाचें व्युत्थान–परिव्राज्य, संन्यास सिद्ध आहे, असा भाव.)

यास्तव ज्याला आत्मसाक्षात्कार झाला आहे, त्या पुरुषाचें अभिमानात्मक गृहस्थाश्रमामध्येंच कर्म न करितांना–कर्म केल्यावांचून–अवस्थान होत नाहीं. ( तर मग त्याला गुरुशुश्रूषा इत्यादिकांविषयींही अभिमान नसतो, असें होईल, असें कोणी ह्मणेल तर ती इष्टापत्तिच आहे. म्हणजे तसें होणें आह्मांला इष्टच आहे, असें सांगतात– ) या सांगण्यावरून विद्वान् गुरुशुश्रूषा व तप यांचाही स्वीकार करीत नाहीं, त्याला त्यांचीही प्राप्ति नाहीं, असें ठरलें.

अत्र केचित् गृहस्था भिक्षाटनादिभयात्परिभवाच्च त्रस्यमानाः सूक्ष्मदृष्टितां दर्शयन्त उत्तरमाहुः । भिक्षोरपि भिक्षाटनादिनियमदर्शनाद्देहधारणमात्रार्थिनो गृहस्थस्यापि साध्यसाधनैषणोभयविनिर्मुक्तस्य देहमात्रधारणार्थमशनाच्छादनमात्रमुपजीवतो गृह एवास्त्वासनमिति ॥

भाष्यार्थ—(ज्याप्रमाणें तुज सिद्धान्त्याच्या मतीं–पुत्रादिसंबंधरहित भिक्षूचें ही देहधारण अवश्य आहे, पण तें व्हावें अशी इच्छा करणाऱ्या त्याला परिग्रहाचा–दान घेण्याचा कलंक लागूं नये म्हणून भिक्षाटनादिकांचाच नियम मानलेला आहे, त्याचप्रमाणें अभिमानशून्य असलेल्याही गृहस्थाचें अवस्थान गृहांतच होऊं दे, त्याला भिक्षुक होण्याचेंच कांहीं कारण नाहीं. कारण अभिमान सोडून गृहांत राहणें व अभिमान सोडून भिक्षु होणें, ही दोन्हीं सारखींच आहेत. त्यांत विशेष कांहीं नाहीं, अशी शंका घेतात– ) याविषयीं कांहीं गृहस्थ भिक्षाटनादिकांच्या भीतीनें व पामर जन तिरस्कार करतील म्हणून भयभीत होत्साते आपलें सूक्ष्मदृष्टित्व दाखवीत असें उत्तर सांगतात–केवळ देहधारणाचीच इच्छा करणाऱ्या भिक्षूला म्हणजे संन्याशालाही भिक्षाटनादिकांविषयीं नियम आहे, असें आढळत असल्याकारणानें साध्य–पुत्र, लोक इत्यादि व साधन–कर्म, उपासना इत्यादि या दोन्हीं विषयींच्या इच्छेपासून मुक्त झालेल्या, व केवळ देहधारण व्हावें, एवढ्याचसाठीं नुसतें भोजन व आच्छादन यांच्यावरच निर्वाह करणाऱ्या गृहस्थाचेंही गृहांत आसन असूं दे. ( ज्यांना कधीं कोणाच्या दारापाशीं जाऊन कांहीं मागण्याची संवय नसते, त्यांना संन्यास घेतल्यास भिक्षा मागावी लागेल,ही मोठी भीति वाटते. अथवा आपण एखाद्या पामराच्या घरीं जाऊन ' नारायण ' असें म्हटल्यास " अरे जा जा, मोठा आला आहे नारायण म्हणून भिक्षा मागावयास ! आमच्या येथें कांहीं मिळणार नाहीं, जा. " असें बोलून तो आपला तिरस्कार करील, या भीतीनेंही ते व्याकुळ होतात आणि त्यामुळें आपलें सूक्ष्म-

दर्शित्व—सूक्ष्मबुद्धिमत्ता दाखवीत ते असें म्हणतात. पण वस्तुतः भयानें एखाद्या विधीचा विपरीत अर्थ सांगणें, हें सूक्ष्मदर्शित्व नसून स्थूलबुद्धित्वच आहे. केवळ देहधारणार्थ भिक्षूला जसा भिक्षा मागण्याविषयीं नियम सांगितलेला आहे, तसाच साध्य व साधनरूप एषणांपासून निवृत्त झालेल्या गृहस्थालाही केवळ देहनिर्वाहापुरतें अन्न—वस्त्र घेऊन गृहांतच रहातां येणें शक्य आहे, असें संन्यासाश्रमाला भिणारे ते म्हणतात. )

न । स्वगृहविशेषपरिग्रहनियमस्य कामप्रयुक्तत्वादित्युक्तोत्तरमेतत् । स्वगृहविशेषपरिग्रहाभावे च शरीरधारणमात्रप्रयुक्ताशनाच्छादनार्थिनः स्वपरिग्रहविशेषाभावेऽर्थाद्भिक्षुकत्वमेव ॥

भाष्यार्थ—(पण सर्व एषणांचा त्याग करून गृहांत राहणाऱ्या त्याला स्त्री आहे की नाहीं ? जर असेल तर—) तें बरोबर नाहीं. कारण स्त्री, या विशेष परिग्रहाविषयीं नियम करणें, कामनाप्रयुक्तच आहे, असें याचें उत्तर दिलेंच आहे. ( आत्मज्ञानानंतरही स्त्री, हा एवढाच एक परिग्रह मजपाशीं असावा, अशी इच्छा करणें याचेंही निमित्त कामनाच आहे, कामनेवांचून अशी इच्छा किंवा नियमही करितां येणें शक्य नाहीं. वर ' कामप्रयुक्तत्वाद्राऽहस्थ्यस्य ' ( पृष्ठ २५ ) या वाक्यानेंच आम्हीं याचें उत्तर दिलें आहे. वरें, स्त्रीपरिग्रह नाहीं म्हणून म्हणाल तर त्याला द्रव्यादि दुसऱ्या परिग्रहांचा अधिकार नाहीं, असें होतें. कारण ज्याला स्त्री असते, त्यालाच द्रव्यपरिग्रहाचा अधिकार असतो. त्यामुळें स्त्रीच्या अभावीं गृहांत राहणाऱ्याही त्याला अर्थात्च द्रव्याचा परिग्रह करतां येत नाहीं. फार काय, पण त्याला स्वतःच्या द्रव्याचाही परिग्रह करितां येत नाहीं. त्यामुळें निर्वाहाचें साधनच नाहींसें होतें आणि दुसऱ्या कोणत्याही प्रकारें जीवनाची सिद्धि होत नसल्याकारणानें भिक्षाटनाचा नियम आपोआप ठरतो, असें भाष्यकार सांगतात—) आणि स्त्री, या विशेष परिग्रहाच्या अभावीं केवळ शरीरधारणाला अवश्य तितकेंच भोजन व आच्छादन, यांची इच्छा करणाऱ्या पुरुषाला स्वतःचा वित्तरूपी विशेषपरिग्रहही नाहींसा झाला असतां अर्थात् भिक्षुत्वच प्राप्त होतें. ( 'पुत्रादिकांपासून धन घेऊन जीवन करण्यास काय हरकत आहे,' म्हणून म्हणाल तर सांगतों. पुत्रादिकांचें धनही त्यांना परकीयच होय. कारण त्या धनावर विरक्ताचें स्वत्व नसतें व पुत्रादिक ' हें माझें ' असें म्हणत असतात. त्यामुळें स्वतः गृहस्थानें स्वकष्टानें संपादन केलेल्याही धनावर 'हें माझें' असा त्याचा

अभिमान नसल्यामुळें व पुत्र तसा अभिमान ठेवीत असल्यामुळें,पुत्रादिकांचें घ-नहीं परकीय धनासारखेंच होय. यास्तव आत्मज्ञाला भिक्षुत्वाचाच नियम आहे. )

शरीरधारणार्थायां भिक्षाटनादिप्रवृत्तौ यथा नियमो भिक्षोः शौचादौ च, तथा गृहिणोऽपि विदुषोऽकामिनोऽस्तु नित्यकर्मसु नियमेन प्रवृत्तिर्यावज्जी-वादिश्रुतिनियुक्तत्वात् प्रत्यवायपरिहारायेति । एतन्नियोगाविषयत्वेन विदुषः प्रयुक्तमशक्यनियोज्यत्वाच्चेति ॥

भाष्यार्थ—( दुसरे कित्येक म्हणतात कीं, भिक्षूलाही भिक्षाटनादिकों-विषयीं-' त्यानें पूर्वी संकेत करून न ठेविलेल्या सात घरीं भिक्षा मागावी, ' शौचविषयीं-' भिक्षूनें ब्रह्मचाऱ्याच्या चतुर्गुण ( चौपट ) शौच करावें ' इत्यादि नियम प्रत्यवायपरिहारार्थ जसे आहेत, त्याप्रमाणें गृहस्थाचीही ' याव-ज्जीव अग्निहोत्र करावें ' इत्यादि अर्थाच्या श्रुतीच्या बळानें प्रत्यवायपरिहारार्थ नित्य कर्मामध्यें नियमानें प्रवृत्ति होऊं शकेल । भाष्यकार आतां अगोदर याच त्यांच्या म्हणण्याचा अनुवाद करितात—) ज्याप्रमाणें भिक्षूला शरीरधारणार्थ अवश्य असलेल्या भिक्षाटनादिप्रवृत्तीविषयीं व शौचादिकांविषयीं नियम आहे, त्याप्रमाणें विद्वान् व निष्काम गृहस्थाचीही—' यावज्जीवादि० ' पूर्वोक्त श्रुतीनें विधान केलेलें असल्यामुळें प्रत्यवायपरिहारार्थ नित्यकर्मामध्यें नियमानें प्रवृत्ति असो, (असें ते म्हणतात.) पण 'विद्वान् नियोगाचा विषय होत नाहीं' व 'तो ( स्वतः सर्वनियोक्ता जो ईश्वर तद्रूप होत असल्यामुळें ) नियोज्य होणें शक्य नाहीं,' यास्तव त्याची प्रवृत्तिही नित्यकर्मांत होत नाहीं,असें म्हणून या मताचें निरसन ( पृष्ठ १६ ) केलें आहे.

( वर जीं दोन मतें सांगितलीं आहेत, त्यांतील विशेष असा—पहिल्या मतांत विद्वान् गृहस्थ कांहीं कर्म न करितां गृहस्थाश्रमात राहतो, असें म्हटलें व या दुसऱ्या मतांत त्यानें अग्निहोत्रादि अनुष्ठानही करावें, असें म्हटलें आहे. तसेंच पहिल्या मतीं शरीरधारण हें ज्याचें प्रयोजन आहे अशा भिक्षाटनादि-कांविषयींच्या नियमाचा दृष्टान्त,परिग्रहाची व्यावृत्ति करण्याकरितां, दिला आहे व या दुसऱ्या मतीं सात घरीं भिक्षा मागणें, इत्यादि अदृष्टफलक नियमाचा दृष्टान्त दिला आहे. )

यावज्जीवादिनित्यचोदनानर्थक्यमिति चेत् । न, अविद्वद्विषयत्वेनार्थव-त्त्वात् । यत्तु भिक्षोः शरीरधारणमात्रप्रवृत्तस्य प्रवृत्तेर्नियतत्वं तत्प्रवृत्तेर्न प्रयो-

जकम् । आचमनप्रवृत्तस्य पिपासापगमवन्नान्यप्रयोजनार्थत्वमवगम्यते । न चाग्निहोत्रादीनां तद्वदर्थप्राप्तप्रवृत्तिनियतत्वोपपत्तिः ॥

भाष्यार्थ—*तर मग 'यावज्जीव अग्निहोत्र करावें' इत्यादि नित्यकर्मांविषयींच्या* विधींना आनर्थक्य आहे, असें म्हणाल तर[म्हणजे ते विधि निरुपयोगी आहेत, असें ठरतें, आणि या श्रुतीला अप्रमाण म्हटलें की भिक्षाटनादिकांविषयींचे नियम-विधीही अप्रमाण होणार ! पण आतां भाष्यकार या शंकेचें समाधान सांगतात–] त्यांना अप्रमाण्य नाहीं. कारण ते विधिनियम अविद्वानाचे *ठिकाणीं* प्रमाणभूत होतात ( अर्थात् आत्मसाक्षात्काररहित पुरुष हा त्यांचा विषय आहे. अविद्वान् हा नियोगांचा नियोज्य आहे. यास्तव त्याच्या ठिकाणीं *त्या* नियमांचें प्रामाण्य ठरतें. ) आतां केवळ शरीरधारण व्हावें, या उद्देशानें भिक्षाटनादिकांमध्यें प्रवृत्त झालेल्या भिक्षूच्या प्रवृत्तीचें जें नियतत्व ( तूं म्हणतोस ) तें त्या प्रवृत्तीचें प्रयोजक नव्हे [ म्हणजे भिक्षुला ती प्रवृत्ति नियत केलेली आहे, म्हणून त्यानें भिक्षावृत्ति केली पाहिजे, असें नाहीं ] तर आचमन करावयास प्रवृत्त झालेल्या पुरुषाची तहान जशी भागते पण ती भागणें, हें जसें त्या आचमनाकडे होणाऱ्या पुरुषाच्या प्रवृत्तीचें निमित्त नव्हे, ( कारण पुरुष *शास्त्रानें विधान केल्यामुळें आचमन करावयास प्रवृत्त होतो व तें शास्त्रवि*हित आचमन केलें असतां त्याच्या अनुषंगानें तहान भागते. त्यामुळें तहान भागणें हें आचमनाचें प्रयोजक–तें करावयास लावणारें–नव्हे, ) त्याचप्रमाणें शरीररक्षणार्थ भिक्षादिकांमध्यें प्रवृत्त झालेल्या यतीचा त्यानें सात घरेंच भिक्षा मागावी, इत्यादि जो नियम तो भिक्षाप्रवृत्तीचा प्रयोजक आहे, असें वाटत नाहीं. ( याचें तात्पर्य असें–ब्रह्मवेत्ता नियोगाचा–वेदविधीचा विषय –नियोज्य होत नाहीं. त्यामुळें त्याच्याविषयीं नियम करणारा विधि अनुपपन्न आहे, असें जें आमचें म्हणणें आहे, त्याविषयीं येथें वाद्यानें शंका घेतली आहे. पण ती अयुक्त होय. कारण नियोगाच्या सिद्धीकरितांच नियो*ज्याची अपेक्षा असते व नियोग प्रवृत्तीच्या सिद्धीकरतां हवा असतो. पण* ती प्रवृत्तिच जर दुसऱ्या कांहीं निमित्तानें सिद्ध झाली तर नियोगाचें काय काम ? म्हणूनच दर्श व पूर्णमास या इष्टींच्या नियोगानेंच त्या इष्टींत होम करावयाचें भात कुटण्याकडे नियमानें प्रवृत्ति होत असल्यामुळें त्याविषयीं निराळा नियोग मानलेला नाहीं. नियोगच जर नाहीं तर नियोज्य पुरुषाची अपेक्षा नाहीं. नियोग म्हणजे वेद व स्मृति यांनीं केलेली ' प्रायहीं संध्या

करावी, दर्शपूर्णमासयाग करावे, असत्य भाषण करूं नये ' इत्यादि प्रकारचीं विधानें व नियोज्य म्हणजे ते विधी ज्या पुरुषास उद्देशून केलेले असतात तो पुरुष ब्रह्मवेत्ता नियोज्य होत नसल्यामुळेंही त्याला उद्देशून होणारा विधि उपपन्न होत नाही. पण गृहस्थांच्या अग्निहोत्रादि कर्मांची प्रवृत्ति अन्य निमित्तानें प्राप्त नाही. म्हणून पुरुषाची त्याचे ठिकाणी प्रवृत्ति नियोगावांचून होत नाही आणि त्या प्रवृत्तीकरितां नियोग झाला कीं नियोज्याचीही अपेक्षा आलीच, असें वैषम्य आतां सांगतात–) आणि त्याप्रमाणें अग्निहोत्रादिकांना अर्थप्राप्तप्रवृत्तिनियतत्वाची उपपत्ति नाही. [ म्हणजे तीं अग्निहोत्रादि कर्में अन्य निमित्तानें प्राप्त होतात. तीं भोजनाप्रमाणें स्वाभाविकप्रवृत्तीनेंच नियत झालीं आहेत, असें म्हणण्यास कांहीं विशेष युक्ति नाहीं. तस्मात् भिक्षूचें भिक्षाटन व ज्ञानी मनुष्याचें कर्मानुष्ठान यांत मोठें अंतर आहे. ]

अर्थप्राप्तप्रवृत्तिनियमोऽपि प्रयोजनाभावेऽनुपपन्न एवेति चेत् । न, तन्नियमस्य पूर्वप्रवृत्तिसिद्धत्वात्तदतिक्रमे यत्नगौरवात् ॥ अर्थप्राप्तस्य व्युत्थानस्य पुनर्वचनाद्विदुषः कर्तव्यत्वोपपत्तिः ॥

भाष्यार्थ––अहो पण अर्थप्राप्तप्रवृत्तिनियमही प्रयोजनाच्या अभावीं अनुपपन्न आहे, [ म्ह. स्वाभाविक प्रवृत्तीचा नियमही फलावांचून सिद्ध होत नाहीं. कांहीं फल मिळणें जर शक्य असलें, तरच प्राण्याची स्वाभाविक प्रवृत्तिही एखाद्या कर्माकडे होते. पण तें नसल्यास प्रवृत्ति संभवत नाहीं, ] असें जर म्हणशील तर तें बरोबर नाहीं. कारण तो नियम पूर्व प्रवृत्तीनें सिद्ध आहे. त्यामुळें त्याचा अतिक्रम करावयाचा झाल्यास फार मोठा यत्न करावा लागतो [ म्हणजे तो स्वाभाविक कर्माविषयींचा नियमही पूर्व वासनांमुळेंच प्राप्त असतो. त्यामुळें त्या नियमाविषयीं विधान करावें लागत नाहीं आणि विधानाच्या अभावीं त्याच्या फलाचीही अपेक्षा नसते. कारण कोणतेंही विधान फलाच्या उद्देशानेंच होतें. ज्या प्रवृत्तीचें कांहीं फल नाहीं, तिचें विधानही नाहीं. भिक्षाटन नियमानें शास्त्रीय नियोगानुसार केलें तरी पोट भरून जीवन होतें व अनियमानें केलें तरी तें होतेंच, हें खरें; पण आत्मसाक्षात्काररूप विद्या उत्पन्न होण्यापूर्वी तिच्या सिद्धीकरितां नियत भिक्षाटनादिकांचें अनुष्ठान केलेलें असल्यामुळें त्याची वासना दृढ झालेली असते. त्यामुळें विद्योत्पत्तीच्या नंतरही तो विद्वान् त्या प्रबल वासनेमुळें त्या नियमांतच प्रवृत्त होतो. अनियमांत कधींही प्रवृत्त होत नाहीं. कारण अनियत प्रवृत्तीची वासना नियत

प्रवृत्तीच्या वासनेनें पराभूत झालेली असते. त्यामुळें मोठ्या यत्नानेंच तिचा पुनः उद्भव होणें शक्य असतें. पण नियत प्रवृत्तीचीच संवय लागल्यामुळें विद्वान् विशेष यत्नानें अनियत प्रवृत्तीच्या वासनेला उत्पन्न करण्याची इच्छाच करीत नाहीं. त्यामुळें स्वाभाविकपणेंच त्याची नियत प्रवृत्ति होते. अर्थात् विधिनिषेधरहित झालेला परमहंस ' यथेष्ट आचरण करूं लागेल, ' ही भीति व्यर्थ आहे. त्याचप्रमाणें प्रत्यवायाचा परिहार करण्यासाठीं त्याची नियमानेंच प्रवृत्ति होईल, या म्हणण्याचेंही वरील उत्तरानें निरसन झालें. कारण नियोज्यच नियोगानुष्ठानाच्या अभावीं प्रत्यवायी होतो. विद्वान् नियोज्य होत नाहीं, त्यामुळें तो प्रत्यवायीही होत नाहीं. ]

( सारांश, याप्रमाणें व्युत्थान–संन्यास विधीच्या अभावीं स्वतः प्राप्त असला तरी तो करण्याविषयीं शास्त्रानेंही सांगितलें आहे, असें जाणून विद्वान् 'व्युत्थाय भिक्षाचर्यं चरन्ति ' म्हणजे संन्यास करून भिक्षाचरण करितात, असें भाष्यकार सांगतात–) विद्वानाला स्वभावतःच प्राप्त झालेल्या व्युत्थानाची विधिवचनावरून पुनः कर्तव्यता उपपन्न होते. [ म्हणजे विद्वानाला संन्यास आपोआप प्राप्त होतो. विधिवाक्याचीच त्याला कांहीं आवश्यकता नसते. परंतु स्वभावप्राप्त, अशाही त्याविषयीं विधिवचन आहे, असें पाहून तर विद्वान् संन्यास अवश्य करितात. त्यांच्याकडून तो होतो. विदेच्या बळानेंच प्राप्त होणारा संन्यास विद्वानानें शास्त्रीय वचनानुसार करणें, हें युक्तच आहे. यांत अयुक्त असें कांहीं नाहीं. विद्वान् स्वभावप्राप्त संन्यास यथाशास्त्र करतो. 'पण विधि विद्वानाचा प्रवर्तक होत नसल्यामुळें निष्फळ आहे, ' असेंही म्हणतां येत नाहीं. कारण मैत्र्याचार, सर्व भूतांस अभयदान इत्यादि विहित मुख्य धर्म प्राप्त होणें, हें त्याचें प्रयोजन असल्यामुळें विधि व्यर्थ नाहीं. 'विद्वानाला मैत्र्याचारादिकांचीही आवश्यकता नाहीं' म्हणून म्हणाल, तर तें बरोबर नाहीं. कारण मुक्तीकरितां जरी त्याला त्याची गरज नसली तरी विद्वान परमहंसाला लोकसंग्रहाकरितां त्यांची आवश्यकता आहे. ज्ञानाच्या पूर्वी मैत्री, करुणा, मुदिता इत्यादिकांचा त्यानें दृढ अभ्यास केलेला असतो. त्यामुळें त्याच्या वासनेनेंच तो लोकसंग्रह करतो. वास्तव त्याला त्याच्या प्रयोजनाचीही–फळाचीही कांहीं अपेक्षा नसते. म्हणजे ज्ञानी संन्यासी योग्य शिष्याला ब्रह्मविद्येचा उपदेश करतो, पण त्याचें आपल्याला कांहीं तरी फळ मिळावें, म्हणून कांहीं तो करीत नाहीं. तर ब्रह्मविद्योपदेश करणें, हाही त्याचा स्वभावच

असल्यामुळें तो अनायासानें व निरपेक्ष बुद्धीनें होतो. त्याच न्यायानें त्याच्या हातून पूर्वोक्त धर्म होतात व त्यांच्या फळाचीही अपेक्षा त्याला नसते. अथवा प्रारब्धकर्माच्या बळानें ' हा माझा देह, हीं इंद्रियें ' इत्यादि भास होऊन ' यावज्जीव कर्म करावें ' इत्यादि अर्थाच्या श्रुतिवचनाचा विचार न केल्यामुळें मला कर्में अवश्य केलीं पाहिजेत, अशी भ्रांति झाली असतां तिचें निवर्तन करण्यासाठीं विद्वानालाही व्युत्थानविधीची आवश्यकता आहे. तात्पर्य संन्यासविधि विद्वानाच्या प्रारब्ध दोषामुळें होणाऱ्या कर्मकर्तव्यताभ्रमाचें निरसन करण्याच्या उपयोगी आहे आणि त्यामुळें तो व्यर्थ नाहीं, अशी त्या विधीची उपपत्ति लावावी. )

अविदुषापि मुमुक्षुणा पारिव्राज्यं कर्तव्यमेव। तथा च 'शान्तो दान्तः०' इत्यादिवचनं प्रमाणम्। शमदमादीनां चात्मदर्शनसाधनानामन्याश्रमेष्वनुपपत्तेः। 'अत्याश्रमिभ्यः परमं पवित्रं प्रोवाच सम्यगृषिसंघजुष्टम्' इति च श्वेताश्वतरे विज्ञायते। ' न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुः ' इति च कैवल्यश्रुतिः। " ज्ञात्वा नैष्कर्म्यमाचरेत् " इति च स्मृतेः। " ब्रह्माश्रमपदे वसेत् " इति च। ब्रह्मचर्यादिविद्यासाधनानां च साकल्येनात्याश्रमिषूपपत्तेर्गार्हस्थ्येऽसंभवात्॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें विद्वानाच्या व्युत्थानाची सिद्धि करून विद्या कर्मनिष्ठ नाहीं, असें सिद्ध केलें आणि त्यामुळेंच त्या विद्येचा कर्माशीं कांहीं संबंध नाहीं, असेंही अर्थात् सिद्ध झालें. जी गोष्ट प्रत्यक्ष शब्दानीं सिद्ध न झाली तरी त्याच्या अर्थावरून ठरते, तिला अर्थसिद्ध, अर्थात् सिद्ध, असें म्हणतात. असो; आतां एखादा विद्वान् नाहीं, पण विविदिषु आहे, म्हणजे त्याला आत्मसाक्षात्कार झालेला नाहीं, पण तो करून घेण्याची तीव्र इच्छा आहे, तर त्यालाही व्युत्थान–संन्यास अवश्य आहे, असें ठरविणारे भाष्यकार विद्येला कर्मनिष्ठत्व किंवा कर्मसंबंधित्व असमंजसच आहे, असें सांगतात- ) अविद्वान् मुमुक्षूनेंही पारिव्राज्य करावेंच. (ज्याला आत्मज्ञान अजून झालेलें नाहीं, पण तें व्हावें, व आपण मुक्त व्हावें अशी इच्छा मात्र आहे त्या अविद्वानालाही संन्यास अवश्य आहे, याविषयीं श्रुतीचें प्रमाण देतात–)त्याविषयीं ' शान्त, दान्त०' इत्यादि वचन प्रमाण आहे. ( उपरत, तितिक्षावान् व एकाग्रचित्त होऊन स्वहृदयांतच आत्म्याला अवलोकन करावें, असा या श्रुतीचा शेष–पुढील भाग आहे. यांतील उपरतशब्दानें संन्यासाचें विधान

केलें आहे. गृहस्थादि इतर आश्रमांत शमादि साधनांचें पुष्कळसें अनुष्ठान संभवत नाही. त्यामुळें शमादिकांच्या विधानावरूनही संन्यास अर्थात् प्राप्त होतो, असें याविषयीं श्रौत अर्थापत्तिप्रमाणही आहे, असें सांगतात–) आणि आत्मदर्शनाचीं साधनें, अशा शम-दमादिकांची अन्य आश्रमांत अनुपपत्ति आहे. ( संन्यासावांचून दुसऱ्या कोणत्याही आश्रमांत शम–अंतःकरणनिरोध दम–बाह्य इंद्रियांचा निरोध, उपरति–कर्मत्याग इत्यादिकांचा संभवच नाही. हें वचन आत्मज्ञानविषयीं आहे, असेंही म्हणतां येत नाहीं. कारण आत्मज्ञाला साधनांचें विधान करणें व्यर्थ आहे. भाष्यकारांनीही तें वचन विविदिषूला उद्देशून प्रवृत्त झालें आहे, असें सांगण्यासाठींच वरील वाक्यांत ' आत्मदर्शनसाधनानां ' असें म्हटलें आहे. असो; ) 'मंत्रसमूहाकडून अथवा ज्ञानी पुरुषांच्या समूहाकडून सेवन केलें गेलेलें तें परम पवित्र तत्त्व परमहंसांना त्यांनी अत्याश्रमी रीतीनें सांगितलें' असें श्वेताश्वतरोपनिषदांत त्याचें विधान प्रतीत होतें. ( ब्रह्मचर्यापासून कुटीचक, बहूदक व हंस येथपर्यंत जेवढे म्हणून आश्रमधर्मांनी युक्त आहेत त्या सर्वांच्या आश्रमाचें अतिक्रमण करून असणाऱ्या परमहंसास अत्याश्रमी म्हणतात. तसल्या अत्याश्रमी पुरुषास मंत्रसमूहांनी अथवा ज्ञानी पुरुषांच्या संघांनी सेविलेलें तत्त्व सांगता झाला, असा याचा अर्थ. ऋषि या शब्दाचे दोन अर्थ आहेत. एक मंत्र व दुसरा ज्ञानी. यास्तव ' ऋषिसंघजुष्टं ' या पदाची वर दोन व्याख्यानें केलीं आहेत. एक–मंत्रसमूहानें सेवित व दुसरें–ज्ञानिसंघानें सेवित. ) कर्माच्या योगानें, पुत्रपौत्रादि प्रजेच्या योगानें अथवा धनानें अमृतत्वास प्राप्त झाले नाहीत. तर कांहीं विद्वान् कर्मादिकांच्या त्यागानेंच अमृतत्वास–मोक्षास प्राप्त झाले, अशी कैवल्यश्रुति आहे. ( त्याग म्हणजे संन्यास मोक्षाचें साक्षात् साधन होत नाहीं. यास्तव ते विद्वान् ब्राह्मण संन्यासानें मोक्षाचें साधन जें ज्ञान त्यास प्राप्त झाले असें म्हणून ज्ञानाचें साधन, अशा रूपानें या वाक्यांत त्यागाचें विधान केलें आहे. ) आणि सामान्यतः ब्रह्माला जाणून त्याचाच दृढनिश्चय होण्यासाठीं कर्मत्यागरूप संन्यास करावा, अशी स्मृति आहे. ब्रह्माश्रम म्हणजे ब्रह्मज्ञानाचें साधन होणारा आश्रम–संन्यास, त्या स्थानांत त्यास करावा, अशा अर्थाचीही स्मृति आहे. ( शिवाय श्रीमद्भगवद्गीतेच्या सहाव्या अध्यायांत ' एकाकी यतचित्तात्मा ' येथपासून ' ब्रह्मचारिव्रते स्थितः, मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः । ' येथपर्यंत जीं ब्रह्मचर्यादि साधनें सांगितलेलीं आहेत, त्याच्या

विधीवरूनही अर्थात् संन्यासविधीची सिद्धि होते, असें भाष्यकार सांगतात–) तसेंच ब्रह्मचर्यादि विद्यासाधनाचें संपूर्णपणें अनुष्ठान आश्रमी संन्याशाचे ठिकाणींच संभवतें. गृहस्थाश्रमांत त्याचा संभव नाहीं.

न चासंपन्नं साधनं कस्यचिदर्थस्य साधनायालम्। यद्विज्ञानोपयोगीनि च गार्हस्थ्याश्रमकर्माणि तेषां परमफलमुपसंहृतं देवताप्ययलक्षणं संसारविषयमेव ॥ यदि कर्मिण एव परमात्मविज्ञानमभविष्यत् संसारविषयस्यैव फलस्योपसंहारो नोपापत्स्यत् ॥

भाष्यार्थ—( यावर कोणी म्हणेल कीं, गृहस्थाचे ठिकाणींही ऋतुकाळीं मात्र भार्यागमन करणें, हें गौण ब्रह्मचर्य, एखादे वेळीं ध्यानादिकांचें अनुष्ठान करीत असतांना एकाकित्व, इत्यादि धर्म संभवतात, ते गृहस्थाचे ठिकाणी मुळींच संभवत नाहींत, असें नाहीं. परंतु तें बरोबर नाहीं. कारण तसलें गौण ब्रह्मचर्य व एकाकित्वादि हें पूर्ण साधन होऊं शकत नाहीं. त्यामुळें त्याच्या योगानें ज्ञानाची सिद्धिही होत नाहीं. शिवाय ध्यानादिकांचे वेळीं पत्नीचा संबंध प्राप्तच नसल्यामुळें त्या वेळच्या एकाकित्वाचें विधान करणेंही व्यर्थ आहे. म्हणजे ध्यानाच्या वेळीं ध्यान करणारा पुरुष एकटाच एकांतांत बसून तें करील हें सघट आहे. त्यावेळीं तो आपल्या पत्नीला आपल्या बरोबर घेईल हें म्हणणें संभवत नाहीं. तेव्हां तसल्या एकाकित्वाचें विधान करणें व्यर्थच नव्हे का? तस्मात् गीतेंतील ब्रह्मचर्यादि धर्म गौण नसून मुख्यच आहेत, असें भाष्यकार सांगतात– ) आणि असंपन्न–अपुष्कळ–अपूर्ण साधन कोणत्याही फलाच्या सिद्धीस पुरेसें होत नाहीं ( वास्तव आत्मज्ञान कर्मनिष्ठ अथवा कर्मसंबंधी नाहीं. आतां बृहतीसहस्रलक्षण कर्माच्या विधानाला आरंभ करून त्याच्या पुढें लागलेंच आत्मज्ञान आरंभिलें आहे, म्हणून तें ( आत्मज्ञान ) कर्मसंबंधी आहे, असें जें वर ( पृष्ठ ७ ) वाद्यानें म्हटलें आहे, त्याचें उत्तर सांगतात–) आणि ज्या विज्ञानाच्या उपयोगी गृहस्थाश्रमाचीं कर्में आहेत त्यांचें देवतांमध्यें लय पावणें, एतद्रूप संसारविषयकच पृथक् फल सांगून उपसंहार केला आहे. ( अर्थात् पूर्वीच्या कर्मसंबंधीं ज्ञानाचें फल संसारांतच अंतर्भूत होणारें आहे. देवतारूप होणें ही त्या फलाची सीमा आहे, पण तें मोक्षाख्य श्रेष्ठ फलाहून अगदीं निराळें आहे आणि बृहतीसहस्रलक्षण कर्माच्या शेवटीं त्याच फलाचा उपसंहार केला आहे. यास्तव त्या कर्माचें ज्ञान हें आत्मज्ञान नव्हे व आत्मज्ञान त्याच्याशीं कांहीं संबंधही ठेवीत नाहीं. )

( वर सांगितलेलें परमात्मज्ञानच आहे व तें परमात्मज्ञान कर्मसंबंधीच आहे, असें कोणी पुनः म्हणेल, असें वाटल्यामुळें शंकराचार्य म्हणतात; त्या पूर्वोक्त ज्ञानाचा ' संसारफळ देणारें ' या रूपानें उपसंहार केला आहे व परमात्मज्ञान तर मुक्तिफलक आहे, ह्मणजे तें मुक्तिफळ देणारें आहे, यास्तव पूर्वोक्त ज्ञान परमात्मज्ञान नव्हे. ) जर कर्मज्ञानाळाच–कर्मठाळाच परमात्म्याचें ज्ञान झालें असतें तर संसारविषयक फळाचाच उपसंहार उपपन्न झाला नसता ( कर्मनिष्ठ ह्मणून सांगितलेलें जें ज्ञान तेंच परमात्मज्ञान, असें मानल्यास श्रुतीनेंच त्या कर्मसंबंधी ज्ञानाचें संसारविषयक फळ सांगून जो प्रकरणाचा उपसंहार केला आहे तो उपपन्न होत नाहीं, असा याचा भावार्थ. )

। अंगफलं तदिति चेन्न । तद्विरोध्यात्मवस्तुविषयत्वादात्मविद्यायाः । निराकृतसर्वनामरूपकर्मपरमार्थात्मवस्तुविषयं ज्ञानममृतत्वसाधनम् । गुणफलसंबंधे हि निराकृतसर्वविशेषात्मवस्तुविषयत्वं ज्ञानस्य न प्राप्नोति । तथानिष्टं, ' यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत् ' इत्यधिकृत्य क्रियाकारकफलादिसर्वव्यवहारनिराकरणाद्विदुषः । तद्विपरीतस्याविदुषो ' यत्र हि द्वैतमिव ' इत्युक्त्वा क्रियाकारकफलरूपस्यैव संसारस्य दर्शितत्वाच्च वाजसनेयिब्राह्मणे । तथेहापि देवताप्ययं संसारविषयं यत्फलमशनायादिमद्वस्त्वात्मकं तत्फलमुपसंहृत्य केवलं सर्वात्मकवस्तुविषयं ज्ञानममृतत्वाय वक्ष्यामीति प्रवर्तते ॥

भाष्यार्थ––( तें जें संसारविषयक फळ सांगितलें आहे तें अंगी परमात्मज्ञानाचें नव्हे, तर त्याच्या अंगभूत पृथ्वी, अग्नि इत्यादि देवताज्ञानाचें तें ( संसाररूप ) फळ आहे. परमात्मज्ञान अंगी ह्मणजे मुख्य–शेषी, इतर ज्ञानें हीं अंगें अमुख्य–शेष इत्यादि असून परमात्मज्ञान त्या सर्व ज्ञानरूप अंगांचा अंगी आहे. यास्तव वर ज्याचा उपसंहार केला आहे तें संसारफळ अंगभूत ज्ञानाचें आहे. अंगी परमात्मज्ञानाचें नव्हे आणि त्यामुळें त्याच्या मुक्तिरूप फळाशीं पूर्वे संसारफळाचा विरोध येत नाहीं, अशी शंका घेतात–) तें अंगफळ आहे, असें जर म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण आत्मविद्येला त्या फळाच्या विरोधी असलेल्या आत्मवस्तूचें विषयत्व आहे. [ म्हणजे ह्या आत्मविद्येचा विषय आत्मा आहे व तो त्या संसारविषयक फळाच्या विरुद्ध आहे. परमात्मज्ञानाचा विषय अंगसंबंध, फळसंबंध इत्यादि सर्व संबंधशून्य निर्विशेष आत्मवस्तु आहे. त्यामुळें त्या ज्ञानाचा अंगादिकांशीं संबंध संभवत नाहीं. त्यामुळें पूर्वोक्त फळही त्याच्या अंगाचें आहे, असें म्हणतां येत नाहीं,

अशा अभिप्रायानें भाष्यकारांनीं हें वरील समाधान सांगितलें आहे. आतां त्याचेंच अधिक स्पष्टीकरण करितात– ) नाम, रूप व कर्म या सर्व विशेषांनीं रहित असलेली जी परमार्थ–श्रेष्ठ अर्थरूप आत्मवस्तु, तो ज्याचा विषय आहे, असें ज्ञान अमृतत्वाचें साधन आहे. (अमृतत्व म्ह. मोक्ष. अर्थात् निर्विशेष आत्म्याचें ज्ञान मोक्षाचें साधन आहे. ) कारण आत्मसाक्षात्काराचा गौण फळाशीं संबंध आहे, असें म्हटल्यास त्याला निर्विशेष आत्मवस्तुविषयत्व प्राप्त होत नाहीं. म्हणजे त्या ज्ञानाचा–साक्षात्काराचा विषय सर्व विशेषशून्य आत्मवस्तु आहे, असें ठरत नाहीं. पण तें अनिष्ट आहे. ( कारण ' आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत् ' इत्यादि प्रकरणाचें तात्पर्य कशांत आहे, याचा विचार पूर्वोक्त ( पृष्ठ ५ ) उपक्रमादि लिंगांवरून केला असतां आत्मा निर्विशेष आहे, असें निश्चित होतें. म्हणून सर्व विशेषशून्य आत्मा विज्ञानाचा विषय आहे, असें सिद्ध न होणें, हें अनिष्ट आहे. ) वाजसनेयिब्राह्मणांत ' परमात्मवेत्ता सर्वसंबंधशून्य आहे,' असें सांगून ' आत्म्याला न जाणणाऱ्या अविद्वानाला संसार हेंच फळ मिळतें, ' असेंही म्हटलें आहे. वास्तव येथें पूर्वी सांगितलेल्या ज्ञानाला परमात्मज्ञानत्व नाहीं, तर ' आत्मा वा इदमेक एव० ' इत्यादि पुढच्या प्रकरणांत सांगावयाच्या निर्विशेषवस्तुविषयक ज्ञानाचाच परमात्मज्ञानत्व व मुक्तिफलत्व आहे, असें भाष्यकार सांगतात–) ' ज्या वेळीं या अधिकारी पुरुषाला सर्व आत्माच आहे, असें साक्षात् ज्ञान होतें त्यावेळीं तो कोणत्या साधनानें कोणत्या विषयाला पाहणार ? ' इत्यादि अर्थाच्या वाक्यानें आरंभ करून विद्वानाच्या क्रिया, कारक, फल इत्यादि सर्व व्यवहाराचें निराकरण केलें आहे. (कर्ता, कर्म, साधन इत्यादि कारकें आहेत.) आणि वाजसनेयिब्राह्मणांत–बृहदारण्यकांत ' ज्यावेळीं पुरुषाला द्वैतसें दिसतें तेव्हां० ' इत्यादि सांगून पूर्वोक्त विद्वानाच्या विपरीत असलेल्या अविद्वानाला क्रिया-कारक-फलरूप संसारच मिळतो, असें दाखविलें आहे. त्याचप्रमाणें येथें म्हणजे या ऐतरेय उपनिषदांतही जें अशनायादिकांनीं युक्त असलेल्या वस्तुरूप, संसारविषय–देवताप्ययलक्षण फल त्याचा उपसंहार करून मोक्षाकरितां मी आतां केवळ सर्वात्मक वस्तूसंबंधीं ज्ञान सांगेन, अशा अभिप्रायानें श्रुति प्रवृत्त होत आहे. ( या वाक्यांत फल हा शब्द दोनदा योजिला आहे. वास्तव त्यांतील एक शब्द फल निष्पाद्य आहे, असें सुचविण्यासाठीं आहे. अर्थात् तें फल निष्पाद्य–संपादन करतां येण्यासारखें असल्यामुळेंही संसारविषय म्हणजे संसारान्तर्गत होय. )

। ऋणप्रतिबन्धश्चाविदुष एव मनुष्यपितृदेवलोकप्राप्तिं प्रति, न विदुषः ॥ 'सोऽयं मनुष्यलोकः पुत्रेणैव०' इत्यादिलोकत्रयसाधननियमश्रुतेः ॥ विदुषश्च ऋणप्रतिबंधाभावो दर्शित आत्मलोकार्थिनः 'किं प्रजया करिष्यामः' इत्यादिना । तथा 'एतद्ध स्म वै तद्विद्वांस आहुर्ऋषयः कावषेयाः' इत्यादि । 'एतद्ध स्म वै तत्पूर्वे विद्वांसोऽग्निहोत्रं न जुहवांचक्रुः' इति च कौषीतकिनाम् ॥

भाष्यार्थ--(येणेंप्रमाणें आत्मज्ञानाचा कर्माशीं कांहीं संबंध नाहीं, असें सांगून 'यावज्जीव अग्निहोत्र करावें,' अशी श्रुति असल्यामुळें कर्माचा त्याग संभवत नाहीं, असें जें वाद्याचें म्हणणें होतें, त्याचें निराकरण भाष्यकारांनीं 'यावज्जीव कर्मविधान करणारी श्रुति अविद्वानाविषयीं आहे' या उत्तरानें केलें ( पृष्ठ २९ ). आतां तीन ऋणाविषयीं त्यानें जो आक्षेप घेतलेला होता त्याची व्यवस्था कशी लावावी तें सांगतात--) आणि अविद्वानाच्याच मनुष्य लोक, पितृलोक व देवलोक यांच्या प्राप्तीस तीन ऋणें प्रतिबंध करितात. विद्वानाच्या नाहीं. (अपाकृत न केलेलें, न फेडलेलें ऋण अविद्वानाच्याच मनुष्यलोक, पितृलोक व देवलोक या तीन लोकांस प्रतिबंध करतें. कारण त्या त्या लोकाची इच्छा करणाऱ्या अविद्वानाचेंच ऋणापकरण हें कर्तव्य आहे. मुक्तीची इच्छा करणाऱ्या उत्तम साधकाचें तें कर्तव्य नव्हे. त्यामुळें ऋषि ऋण, पितृ-ऋण व देव-ऋण, हीं तीन ऋणें मुमुक्षूच्या मुक्तीलाही प्रतिबंध करीत नाहींत. )

( अहो, पण 'अनपाकृत्य मोक्षं तु सेवमानो व्रजत्यधः ।' म्हणजे ऋणांचें अपाकरण--फेड न करितां मोक्षाचें सेवन करणारा अधोगतीस जातो, अशा अर्थाची स्मृति आहे. यास्तव पूर्वोक्त त्रिविध ऋण मुक्तीलाही प्रतिबंध करतें, असें म्हणणें भाग आहे. कारण या स्मृतिवचनांत ऋण मनुष्यादि लोकांनाच प्रतिबंध करतें व मुक्तीला प्रतिबंध करीत नाहीं, असा विशेष सांगितलेला नाहीं, अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात--) कारण 'तो हा मनुष्य लोक पुत्राच्या योगानेंच ( जिंकता येतो )' इत्यादि प्रकारें तीन लोकांच्या साधनाविषयींचा नियम सांगणारी श्रुति आहे. ('सोऽयं मनुष्यलोकः पुत्रेणैव जय्यो नान्येन कर्मणा कर्मणा पितृलोको विद्यया देवलोकः' अशी श्रुति असून तिचा अर्थ--तो हा मनुष्यलोक पुत्राच्या योगानेंच जिंकता येण्यासारखा आहे. दुसऱ्या कर्माच्या योगानें जिंकता येण्यासारखा नाहीं.

कर्माच्या योगानें पितृलोक व विद्येनें—उपासनेनें देवलोक जिंकता येतो—असा आहे. त्या श्रुतिवचनावरून पुत्र, कर्म व उपासना यांना क्रमानें मनुष्यलोक, पितृलोक व देवलोक यांचें हेतुत्व—कारणत्व आहे, असें ज्ञान होतें. त्यामुळें पुत्रादिकांच्या योगानेंच फेडतां येण्यासारखीं असलेलीं पुत्रादिकांच्या अभावरूप ऋणें त्या पुत्रादिकांनीं साध्य होणाऱ्या लोकप्राप्तीस प्रतिबंधक होणें साहजिक आहे—त्या ऋणांनीं लोकप्राप्तीस प्रतिबंध करावा, हें योग्यच आहे. कारण ऋणाचें अपाकरण न केल्यास पुत्रादिसाधनाचा अभाव होणार, आणि साधनाच्या अभावीं साध्य लोकांचा अभाव होणार, हें अर्थसिद्धच आहे. पण तीं पुत्रादिकांच्या अभावरूप ऋणें मुक्तीला प्रतिबंध करूं शकत नाहींत. कारण मुक्ति त्या ऋणांच्या अपाकरणानें साध्य होणारी नाहीं. ' अनपाकृत्य मोक्षं तु०' इत्यादि जें स्मृतिवचन आहे तें रागी—विषयासक्त पुरुषाच्या संन्यासाची निंदा करण्याकरितां केवळ अर्थवादरूप आहे. )

( पुत्रादि-अभावरूप ऋण मुक्तीला प्रतिबंध करूं शकत नाहीं, याविषयीं केवळ हा न्यायच प्रमाण आहे, असें नाहीं, तर श्रुतिही प्रमाण आहे, असें आतां सांगतात—) आणि आत्मा, याच एका लोकाची इच्छा करणाऱ्या विद्वानाला या ऋणप्रतिबंधाचा अभाव आहे, हें ' संततीनें आम्हीं काय करणार ( संततीचा आम्हाला काय उपयोग )' इत्यादि अर्थाच्या वाक्यानें दाखविलें आहे. त्याचप्रमाणें ' आत्मवेत्ते कावषेय ऋषी आम्ही अध्ययन कशाला करूं ? होम कशाला करूं ? इत्यादि म्हणाले.' त्याचप्रमाणें त्या ह्या आत्मतत्त्वाला जाणणारे पूर्वींचे विद्वान् अग्निहोत्रहवन करीत नसत, असें कौषितकी शाखेच्या उपनिषदांत म्हटलें आहे. ( येथें दिलेल्या तीन श्रुतिवचनांनीं क्रमानें प्रजा, अध्ययन व कर्म यांचें अनुष्ठान न केलें तरी तीं विद्वानाला प्रतिबंधक होत नाहीं असें दाखविलें आहे. )

अविदुषस्तर्हि ऋणानपाकरणे पारिव्राज्यानुपपत्तिरिति चेत् । न । प्राग्गार्हस्थ्यप्रतिपत्तेर्ऋणित्वासंभवात् । अधिकारानारूढोऽप्यृणी चेत्स्यात् सर्वस्य ऋणित्वमित्यनिष्टं प्रसज्येत । प्रतिपन्नगार्हस्थ्यस्यापि ' गृहाद्वनी भूत्वा प्रव्रजेद्यदि वेतरथा ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेद्गृहाद्वा वनाद्वा ' इत्यात्मदर्शनोपायसाधनत्वेनेष्यत एव पारिव्राज्यम् ॥

भाष्यार्थ—( वादी शंका घेतो— ) तर मग ऋणाचें अपाकरण केलें नसल्यास अविद्वानाच्या संन्यासाची अनुपपत्ति होते, म्हणून म्हणाल तर

(ज्याला आत्मज्ञान झालेलें नाहीं पण मोक्षाची इच्छा आहे, अशा पुरुषाच्याही मुक्तीला वरील ऋण प्रतिबंध करण्यास समर्थ नसतें. कारण तें अविद्वानाच्याही केवळ तीन लोकांनाच प्रतिबंध करूं शकतें, मुक्तीला प्रतिबंध करूं शकत नाहीं, यास्तव अविद्वान् मुमुक्षुलाही संन्यास घेतां येतो. त्यामुळें त्याविषयी शंकाच संभवत नाहीं. पण वरील श्रुतिवाक्यांत 'आम्ही कर्मादिक कशाला करूं ? असें 'विद्वान्' म्हणाले' असें म्हटलें आहे, यास्तव केवळ त्या विद्वान्-शब्दावर कटाक्ष ठेवून 'तर मग अविद्वानाला कर्मत्याग करतां येत नाहीं,' अशी शंका येथें घेतली आहे. अथवा दुसराच परिहार सांगण्याकरितां ही शंका आहे, असें जाणावें. आचार्य आतां या शंकेचें निराकरण करितात— ) तसें नाहीं, गृहस्थाश्रमाचा अंगीकार करण्याच्या पूर्वी पुरुषाला ऋणित्वाचाच संभव नाहीं. म्ह. गृहस्थाश्रमी झाल्यावाचून तो पित्रादिकाचा ऋणीच होत नाहीं. यास्तव अविद्वानाला संन्यासाची अनुपपत्ति नाहीं. ( गृहस्थालाच पुत्रादिकांस निर्माण करून पित्रादिकांच्या ऋणांतून मुक्त होतां येणें शक्य आहे. यास्तव गृहस्थालाच ऋणें प्रतिबंध करितात. अगृहस्थाच्या संन्यासाला तीं प्रतिबंध करूं शकत नाहींत. तस्मात् गृहस्थाश्रम स्वीकारण्यापूर्वी ब्रह्मचर्याश्रमांत मुमुक्षूचें पारिव्राज्य संभवतें, असा परिहार भाष्यकारांनीं या वाक्यांत केला आहे. आतां उपनयनानंतर तत्काळ ऋषींचें ऋण फेडण्याचा अधिकार प्राप्त होतो, व त्यामुळें 'गृहस्थाश्रमाचा स्वीकार करण्यापूर्वी ऋणित्वाचा संभवच नाहीं,' हें म्हणणें युक्त नव्हे, हें खरें; तथापि विविदिषासंन्यासाचा अधिकार ज्यानें वेदाध्ययन केलेलें असतें, त्यालाच असतो. यास्तव त्या वेदाध्ययन केलेल्या पुरुषाला उद्देशून भाष्यकारांनीं हें म्हटलें आहे, असें समजावें. पण त्यावर कोणी असें म्हणेल, अहो 'जायमानो वै ब्राह्मणस्त्रिभिर्ऋणवा जायते ब्रह्मचर्येणर्षिभ्यो यज्ञेन देवेभ्यः प्रजया पितृभ्यः' म्हणजे उत्पन्न होणारा ब्राह्मण (उत्पत्ति होतांच) तीन ऋणांनीं ऋणी होतो. ब्रह्मचर्यानें ऋषींचा, यज्ञानें देवांचा व प्रजेनें पितरांचा. या श्रुतिवचनावरून केवळ उत्पन्न होणारा ऋणवान् होतो, असें प्रतीत होतें. कारण या वचनांतील 'जायमानः' या पहिल्या पदानें जन्माचा बोध होतो. उपनयन, स्त्रीपरिग्रह इत्यादिकांचा बोध होत नाहीं. यास्तव ब्राह्मणकुलांत जन्म घेणें हेंच ऋणी होण्याचें निमित्त आहे. )

( या आशंकेचें समाधान थोडक्यांत असें आहे. या श्रुतिवचनांत जें ऋणित्व सांगितलें आहे त्याचें साक्षात् प्रयोजन कांहीं नाहीं. तर ब्रह्मचर्या-

दिकांच्या कर्तव्यतेचें ज्ञापन करणें म्हणजे ब्रह्मचर्यादि आश्रमांचा क्रमानें स्वीकार करावा, हें सुचविणें एवढेंच त्याचें प्रयोजन आहे व जो अधिकारारूढ झालेला नाहीं. तो तें करूं शकतही नाहीं. केवळ जन्माला आलेला ब्राह्मण--अर्भक ब्रह्मचर्य, दारपरिग्रह इत्यादि करण्यास असमर्थ असतो, हें प्रसिद्ध आहे, यास्तव नुस्त्या 'जायमानः' या शब्दावरच सर्व भार टाकणें प्रशस्त नव्हे. तर त्याच्या योग्य अर्थाचा विचार करणेंच सयुक्तिक आहे. दुसरें, वरील श्रुतिवचनांत 'जायमानः ब्राह्मणः' असें म्हटलें आहे. पण त्यावरून केवळ ब्राह्मणाचाच स्वीकार केल्यास क्षत्रियादिकांना ऋणाचा अभाव आहे, असें होईल व तें तर अनिष्ट आहे. यास्तव उपलक्षणेनें ब्राह्मणपदानें द्विजांचें ग्रहण करावें लागतें आणि तें केलें म्हणजे अधिकारी पुरुषाचेंही उपलक्षणेनें ग्रहण करणें उचित होतें. तस्मात् 'जायमानः' हें पद अधिकार सुचवितें. अर्थात् 'जायमानः' म्हणजे अधिकारी होणारा असा अर्थ समजावा. सारांश, अधिकार प्राप्त होण्यापूर्वी ऋणांचा संबंध नाहीं, असें भाष्यकार सांगतात-) अधिकारारूढ न झालेलाही जर ऋणी होऊं लागला तर सर्वांलाच ऋणित्व आहे, असें अनिष्ट प्राप्त होईल. ( ब्रह्मचाऱ्यालाही जर ऋणित्व आहे, म्हणून म्हटलें, तर ब्रह्मचर्याश्रमांत असतांनाच मेलेल्या नैष्ठिक ब्रह्मचाऱ्याच्या उत्तम लोकाला प्रतिबंध होणें, हा अनिष्ट प्रसंग ओढवेल. कारण पुराणांत 'तदेव गुरुवासिनां' या वचनानें नैष्ठिक ब्रह्मचाऱ्याला उत्तम लोकांची प्राप्ति होते, असें सांगितलें आहे. यास्तव ब्रह्मचर्याश्रमांतच मेलेल्या पुरुषाच्या उत्तम लोकाला प्रतिबंध होणें, हें अनिष्ट आहे. आतां भाष्यकार 'केवळ गृहस्थाश्रम स्वीकारण्यापूर्वीच संन्यासाची सिद्धि होते, एवढेंच नव्हे तर विधिबलानें गृहस्थालाही संन्यास करितां येतो,' असें सांगतात-) ज्यानें गृहस्थाश्रमाचा स्वीकार केला आहे त्यालाही 'गृहस्थाश्रमांतून वानप्रस्थ होऊन संन्यास करावा. किंवा या क्रमास सोडून संन्यास घ्यावा. म्हणजे ब्रह्मचर्यापासूनच संन्यस्त व्हावें किंवा गृहस्थाश्रमांतून अथवा वानप्रस्थाश्रमांतून संन्यासाश्रम स्वीकारावा.' असें श्रुतीचें विधान असल्यामुळें आत्मदर्शनाच्या उपायाचें साधन, या दृष्टीनें परिव्राज्य इष्टच आहे. ( आत्मदर्शनाचें--आत्मसाक्षात्काराचे श्रवणादिक उपाय आहेत. त्याचें साधन, या रूपानें गृहस्थालाही संन्यास इष्ट आहे. 'तर मग तीन ऋणांचें प्रतिपादन करणाऱ्या श्रुतीशीं संन्यासविधीचा विरोध आहे, असें वाटलें पाहिजे,' म्हणून

म्हणाल तर तेंही योग्य नव्हे. कारण ऋणश्रुति केवळ अर्थवादरूप आहे व कोणताही अर्थवाद–स्तुतिवाद स्वार्थी तात्पर्यवान् नसतो म्हणजे कोणत्याही अर्थवादाचें तात्पर्य त्या अर्थवादांतील शब्दांवरून व्यक्त होणाऱ्या अर्थात नसतें, तर तो ज्या विधेयाची स्तुति करण्याकरितां अथवा ज्या निषेध्याची निंदा करण्याकरितां प्रवृत्त झालेला असतो त्यांत त्याचें तात्पर्य असतें.)

यावज्जीवादिश्रुतीनां विद्वदमुमुक्षुविषये कृतार्थता । छांदोग्ये च केषांचिद् द्वादशरात्रमग्निहोत्रं हुत्वा तत ऊर्ध्वं परित्यागः श्रूयते ॥

भाष्यार्थ—( असें जरी म्हटलें तरी 'यावज्जीव अग्निहोत्रादि कर्में करावीं' असें सांगणाऱ्या श्रुतीशीं संन्यासश्रुतीचा विरोध येतो, अशी आशंका घेऊन भाष्यकार सांगतात-) यावज्जीवादि श्रुतींना अविद्वान् व अमुमुक्षु यांच्या विषयीं कृतार्थता आहे. [ म्हणजे त्या श्रुती आत्मज्ञ व मुमुक्षु नसलेल्या पुरुषांना यावज्जीव कर्में करावयास लावून कृतार्थ [ उपयोगी] होतात. संन्यासाचें विधान करणारी श्रुति केवळ विरक्त मुमुक्षूला विषय करते. यास्तव यावज्जीवादि सामान्य श्रुतींचा मुमुक्षु नसलेल्या पुरुषांचे ठिकाणीं संकोच करावा. कारण सामान्य विधानाचा–उत्सर्गाचा अपवादानें बाध होणें, साहजिकच आहे. अग्निहोत्राचें विधान करणाऱ्या यावज्जीवादि-श्रुतींचा या परीक्ष वचमानेंच संकोच होतो, असें नाहीं. तर 'द्वादशरात्रानंतर अग्निहोत्राचा त्याग करावा,' असें विधान करणाऱ्या दुसऱ्या श्रुतीनेंही त्यांचा पूर्वींच संकोच केला आहे. यास्तव ही संन्यासश्रुति यावज्जीवादि श्रुतीशीं विरोध करण्यास समर्थ नाहीं,–असें भाष्यकार सांगतात—] छान्दोग्यांत काहीं शाखांच्या लोकांनीं द्वादशरात्र अग्निहोत्र हवन करून त्यानंतर त्याचा परित्याग केला, असें सांगितलें आहे. ( 'त्रयोदशरात्रमहुतवासा०' इत्यादि वचन काहीं शाखांत आढळतें. )

यच्चानधिकृतानां पारिव्राज्यमिति, तन्न । तेषां पृथगेव 'उत्सन्नाग्निरनग्निको वा' इत्यादिश्रवणात् । सर्वस्मृतिषु चाविशेषेणाश्रमविकल्पः प्रसिद्धः समुच्चयश्च ॥

भाष्यार्थ—( आतां–संन्यासश्रुतीही अनधिकाऱ्याकरितां आहे; अनधिकाऱ्याचे ठिकाणीं तिचा संकोच केलेला आहे,–ह्या वादाच्या म्हणण्याचा अनुवाद करितात–) कर्माचे अधिकारी नसलेल्या पुरुषांकरितां पारिव्राज्य आहे, असें जें तुम्हीं वर ( पृष्ठ ११ ) म्हटलें आहे, तें बरोबर नाहीं.

कारण त्यांच्याविषयीं ' उत्सन्नाग्निः अनग्निको वा ' म्हणजे ज्याचा अग्नि नष्ट झाला आहे अथवा जो अग्निरहित आहे, इत्यादि निराळेंच श्रवण आहे. ( उत्सन्नाग्नि म्हणजे ज्या अग्निहोऽयाचा अग्नि प्रमादामुळें नष्ट झाला आहे, व अनग्नि म्हणजे ज्यानें अग्नीचा परिग्रहच केलेला नाहीं. असल्या अनधिकाऱ्यांना उद्देशून संन्यासाचें विधान करणारें निराळेंच श्रुतिवचन आहे. त्यामुळें या श्रुतीचा विषय अनधिकारी नव्हे; तर अधिकारीच आहे, असें या परिहाराचें तात्पर्य आहे. आतां भाष्यकार, स्मृतिही संन्यासश्रुतींचेंच परिपोषण करीत असल्यामुळें संन्यासश्रुति बलाढ्य आहे, असें सांगतात–) आणि सर्व स्मृतींमध्यें आश्रमांचा विकल्प व समुच्चय सामान्यतः प्रसिद्ध आहे. ( अविशेषेण म्हणजे सामान्यतः, कोणत्याही प्रकारचा विशेष न ठेवतां. म्हणूनच ' ब्रह्मचर्यवान्प्रव्रजति ' म्हणजे ब्रह्मचारी संन्यास घेतो. ' बुद्ध्वा कर्माणि यमिच्छेत्तमावसेत् । ' म्हणजे कर्मांचें ज्ञान करून घेऊन ज्या आश्रमाची इच्छा असेल त्यांत रहावें. ' ब्रह्मचारी गृहस्थो वा वानप्रस्थोऽथ भिक्षुकः । य इच्छेत्परमं स्थानमुत्तमां वृत्तिमाश्रयेत ॥ ' म्हणजे ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ किंवा भिक्षुक ( संन्यासी, भिकारी नव्हे ) यांतील ज्याला परमस्थानाची इच्छा असेल त्यानें उत्तम वृत्तीचा आश्रय करावा. इत्यादि स्मृतिवचनांमध्यें आश्रमाचा विकल्प प्रसिद्ध आहे. विकल्प म्हणजे क्रम न ठेवतां इच्छेस येईल तो पुढचा आश्रम स्वीकारणें. या विकल्पाप्रमाणेंच ' अधीत्य विधिवद्वेदान्पुत्रानुत्पाद्य धर्मतः । इष्ट्वा च शक्तितो यज्ञैर्मनो मोक्षे निवेशयेत् ॥ ' म्हणजे यथाविधि वेदाध्ययन करून व धर्मतः पुत्रोत्पादन करून आणि यथाशक्ति यज्ञांच्या योगानें यजन करून मग मोक्षामध्यें मन लावावें, इत्यादि स्मृतिवचनांत समुच्चय सिद्ध आहे. समुच्चय म्हणजे आश्रमांचा क्रमानें स्वीकार करीत जाणें. )

यत्तु विदुषोऽर्थप्राप्तं व्युत्थानमित्यशास्त्रार्थत्वे, गृहे वने वा तिष्ठतो न विशेष इति, तदसत् । व्युत्थानस्यैवार्थप्राप्तत्वादन्यत्रावस्थानं स्यात् । अन्यत्रावस्थानस्य कामकर्मप्रयुक्तत्वं ह्यवोचाम, तदभावमात्रं व्युत्थानमिति च॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें विविदिषासंन्यासाची सिद्धि करून पूर्वी सिद्ध केलेल्या विद्वत्संन्यासाविषयीं आणखी एका शंकेचा अनुवाद करितात–) परंतु विद्वानाचें–आत्मज्ञाचें व्युत्थान–संन्यास अर्थप्राप्त [ अर्थात् सिद्ध, सहज होणारा, विषयांचूनच–स्वाभाविकपणेंच होणारा ] आहे. यास्तव व्युत्थानाला

किंवा बृहदारण्यकांत ' उत्पत्तीच्या पूर्वी हें अव्याकृत होतें ' असें म्हटलें आहे. म्हणजे सृष्टीच्या पूर्वी हें सर्व जगत्कार्य बीजभूत अव्याकृतरूप होतें, असें सांगितलें आहे व येथें तें आत्ममात्र होतें, असें म्हटलें आहे. त्यामुळें या दोन श्रुतिवाक्यांत विरोध आहे, म्हणजे तीं परस्परविरुद्ध अर्थ सांगत आहेत, असा भास होतो. वास्तव त्याचा परिहार करण्यासाठीं गुणोपसंहार न्यायानें येथें बृहदारण्यकांतील अव्याकृतपदाचा व बृहदारण्यकांत येथील आत्मशब्दाचा उपसंहार करावा लागतो आणि तो केला असतां ' हें पूर्वी अव्याकृत होतें व तें अव्यक्त असलेलें जगत् केवळ आत्मरूप होतें, ' असें वाक्य सिद्ध होतें. त्यांतील अव्याकृतशब्दानें तमोरूप माया सांगितली जाते. कारण ' तम आसीत् ' ' मायां तु प्रकृतिं विद्यात् ' इत्यादि श्रुतिवाक्यांत त्या जगद्बीजावस्थेस ' तम, माया ' इत्यादि नांवेंही दिलेलीं आढळतात; आणि अव्याकृतशब्दानें मायेचा निर्देश केलेला असल्यामुळें पूर्वी जगद्रूप कार्याचें अव्यक्तनामरूपात्मक मायामयत्व म्हणजे अव्यक्त नाम व रूप हेंच जिचें स्वरूप आहे अशा मायेमध्यें मिळून जाणें, तद्रूप होणें, हें सिद्ध होतें.

ती माया आत्म्याशीं तादात्म्य पावलेली असते, असेंही सांगितलेलें असल्यामुळें सांख्यमताप्रमाणें ती स्वतंत्र आहे, असें ठरत नाहीं. त्यामुळें तिचें कल्पितत्व सिद्ध होतें. कारण त्यावांचून म्हणजे ती कल्पित असल्याशिवाय आत्मा व माया यांचें तादात्म्य आहे, असें म्हणतां येत नाहीं. कार्य व कारण, गुण व गुणी इत्यादि उपादान-उपादेयभावानें राहणाऱ्या पदार्थांचें परस्पर तादात्म्य दिसतें. पण आत्मा व माया यांच्यामध्यें त्यांतील एकही प्रकार संभवत नाहीं. कारण आत्मा असंग, उदासीन, निस्तृप्त, निर्गुण इत्यादि असल्यामुळें तो कोणाचें कारण, गुणी इत्यादि होऊं शकत नाहीं, आणि असा प्रकार असल्यामुळें या श्रुतिवचनावरून आत्म्याचें अखंडत्व, आत्मभिन्न मायेचें व मायाकार्याचें—जगाचें—मिथ्यात्व, परिणाम पावणाऱ्या अविद्येचें अधिष्ठान झाल्यामुळें आत्म्याचें विवर्त-उपादानत्व व अविद्येचें परिणामित्व इत्यादि गोष्टी सूचित होतात.

कार्य मिथ्या आहे असें सांगण्याकरितांच तें अव्याकृतरूप आहे, असें म्हटलें आहे. त्या अव्याकृताला आत्मतादात्म्य व मायात्व असल्यामुळें मिथ्यात्व आहे. पण आतां स्थितिसमयीं तें तसें नाहीं. तर यावेळीं नाम व रूप

अगदी व्यक्त आहे आणि हा विशेष दाखविण्याकरितांच योजलेलें 'अग्रे' हें पद सार्थ आहे, व्यर्थ नाहीं, या अभिप्रायानेंच भाष्यांत 'प्रागुत्पत्तेरनभिव्यक्तनामरूपभेदात्ममूत० ' इत्यादि ह्मटलें आहे. सारांश, अग्रे शब्दानें स्थितिकालच्या व्यक्त नाम-रूप बीजात्मकतेची व्यावृत्ति केली आहे.

शंका—अहो, मग असें जर आहे तर साक्षात् स्थितिकाळींही जगाला मायामयत्व असल्यामुळें मिथ्यात्व आहे, असें ह्मणण्यास कोणता प्रत्यवाय आहे?

समाधान—या स्थितिसमयीं जगाला मिथ्या म्हटल्यास प्रत्यक्षादि प्रमाणांनीं सिद्ध होणाऱ्या त्याच्या सत्यत्वाशीं विरोध येतो. त्यामुळें एकाएकीं [म्हणजे विचार करविल्यावांचून] तसा बोध करतां येत नाहीं, असें वर म्हटलें आहे. शिवाय नाम-रूप व्यक्त होणें, या सृष्टीच्या पूर्वी या जगाचा अभाव होता व तें आतांच विद्यमान आहे, असें वाटत आहे. त्यामुळें त्याला कादाचित्कत्व आहे, ह्मणजे तें नित्य नसून केव्हां केव्हां व्यक्त होणारें आहे. त्यामुळेंच तें रज्जूवर केव्हां केव्हां भासणाऱ्या सर्पाप्रमाणें मिथ्या आहे, असें सांगण्यासाठींही, पूर्वी अव्याकृत होतें, असें म्हणणें योग्य होय.

किंवा जगाचें कांहीं सद्रूप अधिष्ठान संभवतें, असें सुचविण्यासाठीं 'इदं अग्रे आसीत्' असें म्हटलें आहे. कारण त्याचीच जर संभावना नसेल तर त्याला अखंड म्हणणें अयुक्त होईल. म्हणजे या कथनानें—सशाच्या शिंगासारख्या अत्यंत असत् वस्तूची सद्रूपानें उत्पत्ति होण्याचा असंभव असल्यामुळें कोणत्याही कार्याची सद्रूप पूर्वावस्था संभवनीय आहे,—असें सुचविलें. पण ती कार्याची सद्रूप पूर्वावस्था अचेतन आहे, असें समजल्यास त्याची कार्याच्या आकारानें आपोआप प्रवृत्ति होणें शक्य नाहीं. ह्मणून त्या प्रवृत्तीकरितां दुसऱ्या चेतनाधिष्ठानाचा अंगीकार केल्यास गौरव दोष येतो. पण घटाच्या संयोगाचें अधिष्ठानही घट व उपादानही घट, असा अनुभव येत असल्यामुळें एकाच आत्म्याला जगत्कार्याचें उपादान-कारणत्व व जगद्भ्रमाचें अधिष्ठानत्व संभवतें. यास्तव तें सद्रूप कारण चेतन आत्माच आहे, हें या वाक्यानें सांगितलें आहे.

येणेंप्रमाणें अधिष्ठानाभिन्न उपादानकारण आत्मा आहे, अशी संभावना झाली असतां त्याला अखंड एकरसत्व आहे, असें सांगण्यासाठीं 'एकः एव न अन्यत् किंचन' हीं पदें आहेत. यापक्षीं 'इदं अग्रे आत्मैव आसीत्' या श्रुत्यंशानें कार्याच्या पूर्वरूपाचा अनुवाद करून हें जगत् ज्या रूपानें होतें,

आत्म्याच अखंड एकरसत्वाचें विधान 'सः एकः एव नान्यत्किंचन' या वाक्यानें केलें आहे. त्यामुळें या श्रुतींतील कोणत्याही पदाला आनर्थक्य नाहीं. तर त्यांतील प्रत्येक पद सार्थ आहे.

म्हणूनच छान्दोग्यांतही 'सदेव सोम्य०' या वाक्यानें सद्रूप कारणाचाच संभव कसा आहे तें दाखवून असत्कारणवादाचें म्हणजे शून्यापासून हें सर्व झालें आहे, या माध्यमिक बौद्धांच्या शून्यवादाचें निरसन केलें आहे. नाहीं तर, म्हणजे सद्रूप कारणाचीच जर तेथें संभावना विवक्षित नसती तर पुढच्याच वाक्यांत 'एकमेवाद्वितीयं' असें म्हणून त्याचें अद्वितीयत्व सांगण्याचा जो प्रयत्न केला आहे तो व्यर्थ झाला असता; कारण 'सत्' जर मुळीं सिद्धच नाहीं तर त्याला अद्वितीयत्व तरी कोठचें असणार! छान्दोग्यांतील या वचनाच्या व्याख्यानांतही कारणाचें अद्वितीयत्व सांगितलेलें असल्यामुळें त्याहून पृथक् असलेल्या दुसऱ्या सर्वांना मिथ्यात्व आहे, हें सहजच सिद्ध होतें आणि कार्य मिथ्या ठरल्यावर त्यावरून ज्ञात होणारें कारणही मिथ्या आहे असा निश्चय होऊन कार्यकारणभावशून्य केवळ आत्म्याच्या साक्षात्कारानें पुढें सांगितलेली मुक्तिही सिद्ध होते. तात्पर्य, या श्रुतींतील पदावरून असे अनेक सात्त्विक सिद्धान्त ठरत असल्यामुळें तें श्रुतीवाक्य निर्दोष आहे. )

## स ईक्षत लोकान्नु सृजा इति ॥

अर्थ—'सः-' तो आत्मा 'लोकान् नु सृजै-' मी लोकांना उत्पन्न करतों 'इति-' असें 'ईक्षत-' ईक्षण—आलोचन करता झाला.

स सर्वज्ञस्वाभाव्यात् आत्मा एक एव सन्नीक्षत लोकान्नु सृजा इति। ननु प्रागुत्पत्तेरकार्यकरणत्वात्कथमीक्षितवान्। नायं दोषः। सर्वज्ञस्वाभाव्यात्। तथा च मंत्रवर्णः-" अपाणिपादो जवनो ग्रहीता " इत्यादिः। केनाभिप्रायेणेत्याह—लोकानंभःप्रभृतीन्प्राणिकर्मफलोपभोगस्थानभूतान्नु सृजे सृजेऽहमिति ॥

भाष्यार्थ—( येणेंप्रमाणें संक्षेपतः सांगितलेल्या आत्म्याच्या अखंडैकरसत्वाची सिद्धि करण्यासाठीं वर प्रपंचाच्या मिथ्यात्वाचा उल्लेख केला. आतां त्यालाच अध्यारोप व अपवाद यांच्या योगानें दृढ करण्यासाठीं यापुढील सर्व अध्याय आहे. त्यांतील 'स जातो भूतान्यभिव्यैख्यत्' येथपर्यंतचा भाग अध्यारोपाकरितां व त्यापुढील अध्यायसमाप्तिपर्यंतचा भाग अपवादाकरितां आहे.

त्यांतही वाचारंभणन्यायानें ह्मणजे कोणताही विकार आपल्या कारणाहून शब्द-मात्र पृथक् असतो, वस्तुतः नाहीं; या न्यायानें आत्म्याहून निराळें असलेलें सर्व विकाररूप असल्यामुळें मिथ्या आहे, असें सांगण्यासाठीं हें पुढील सृष्टिवाक्य आहे सृष्टिवाक्य ह्मणजे उत्पत्तीविषयीं वाक्य. त्यांत आरंभींच स्पष्टपणें आत्म्याचें संभवनीय ह्मणून वाटणारें चेतनत्व दृढ करण्यासाठीं 'स ईक्षत लोकान्नु सृजा इति' या वाक्यानें ईक्षण सांगतात-) तो आत्मा एक असूनही सर्वज्ञस्वभावतेमुळें 'लोकान् नु सृजै' म्ह. मी लोकांना उत्पन्न करतों, असें ईक्षण करता झाला. ( 'पण त्या एक व अखंड आत्म्याचें ईक्षण कसें संभवतें? कारण त्याच्या पाशीं त्यावेळीं विचाराचें साधन काहीं नव्हतें,' अशी कोणी शंका घेईल ह्मणून त्याला साधनाची अपेक्षा नाहीं, या अभिप्रायानें 'तो एक असूनही सर्वज्ञ स्वभावतेमुळें ईक्षण करता झाला,' असें भाष्यांत म्हटलें आहे. आतां भाष्यकार हाच अभिप्राय शंकासमाधानाच्या योगानें स्पष्ट करितात-) शंका-अहो पण उत्पत्तीच्या पूर्वी देह, इंद्रियें इत्यादि कांहीं नसल्यामुळें त्यानें ईक्षण कसें केलें ? समाधान-त्यांत कांहीं दोष नाहीं. त्याला सर्वज्ञस्वभावता असल्यामुळें त्यानें देहेंद्रियावाचूनही ईक्षण केलें. त्याविषयीं 'अपाणिपादो०' इत्यादि मंत्रवर्ण आहे. 'त्याला हात व पाय नाहींत, पण तो ग्रहण करणारा व वेगानें धावणारा आहे' असा त्याचा अर्थ आहे. कोणत्या अभिप्रायानें त्यानें ईक्षण केलें, तें श्रुति सांगते-मी अंभः, मरीची, मर व आप या प्राणि कर्म फलोपभोगस्थानभूत [ म्ह. प्राण्यांच्या कर्मांच्या फलाचा उपभोग घेण्याचीं स्थानेंच अशा ] लोकास उत्पन्न करतों, असें ईक्षण केलें. ( अपाणिपादो० या मंत्राच्या पुढील तीन चरणाचा अर्थ असा आहे. त्याला नेत्र नसतांनाही तो पाहतो. कानावांचूनच असलेला तो ऐकतो. तो सर्व वेद्याला जाणतो, पण त्याला जाणणारा दुसरा कोणी नाहीं. त्याला सर्वश्रेष्ठ महापुरुष ह्मणतात. भाष्यांतील 'इत्यादिः' येथील आदिशब्दानें 'न तस्य कार्यं करणं च विद्यते' इत्यादि मंत्राचें ग्रहण करावें. त्याचा अर्थ असा-त्याला शरीर व इंद्रिय नाहींत. त्याच्यासारखा किंवा त्याहून अधिक, असाही दुसरा कोणी दिसत नाहीं. त्याची सर्वोत्तम शक्ति नानाप्रकारचीच आहे, असें सांगितलें आहे. त्याची ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति स्वाभाविक आहे. )

( पण यावर 'स्वाभाविक नित्य चैतन्याच्या योगानें केव्हां केव्हां होणारें ईक्षण कसें संभवतें ?' अशी शंका येते व त्याचीं उत्तरोत्तर अधिक चांगलीं

अशीं तीन उत्तरें आहेत. १ सृष्टीच्या आरंभीं प्राण्यांच्या कर्मामुळें सृज्य -उत्पन्न करावयाच्या पदार्थांच्या आकाराची एक अविद्यावृत्ति उत्पन्न होते. तिच्यामध्यें आत्मचैतन्य उत्पन्न होतें. तेंच ईक्षण आहे. तें एहिकें कार्य असल्यामुळें आपला व दुसऱ्याचाही निर्वाह करूं शकतें. पण त्या ईक्षणालाही दुसऱ्या ईक्षणाची अपेक्षा आहे, असें म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण अनवस्थादोषाचा परिहार करण्यासाठीं कोणालाही झालें तरी असेंच सांगणें उचित आहे, असें कित्येक म्हणतात. २ दुसरे काही वेदान्ती-सृष्टीच्या वेळीं प्राण्यांच्या कर्मामुळें अभिव्यक्तीच्या उन्मुख झालेले पण अव्यक्तनामरूपांनीं अवच्छिन्न असलेलें सत्स्वरूप चैतन्यच ईक्षण आहे, असें समजतात. अर्थात् ईक्षण म्हणजे चैतन्यच. पण तें शांत व शुद्ध चैतन्य नव्हे. तर सृष्टिसमयीं प्राण्यांच्या कर्मामुळें सृष्टि व्यक्त करावयास उन्मुख झालेलें व अव्यक्तनामरूप या उपाधीनें युक्त असलेलें चैतन्य होय. त्याची उन्मुखता कदाचित् होते, नेहमीच होत नाहीं. यास्तव ईक्षणही कदाचित् म्हणजे सृष्टीच्या वेळींच संभवतें. ३ पण बाकीचे सर्व वेदांती असें म्हणतात-ईक्षण, कामना, इत्यादि सांगणारीं वाक्यें जगाचें कारण जड नाहीं, एवढेंच सुचविण्यासाठीं आहेत. त्यामुळें त्यांचें तात्पर्य-चैतन्यानें 'विचार केला' 'कामना, इच्छा केली;' इत्यादि वाच्य अर्थामध्यें नाहीं. यास्तव त्यानें अंतःकरणावाचून आलोचन कसें केलें, तें खरोखरच केलें किंवा नाहीं, इत्यादि प्रश्नविषयीं फारसा आग्रह धरूं नये. )

## स इमाँल्लोकानसृजत ।

अर्थ—' सः-' तो आत्मा ' इमान् लोकान्-' या लोकांस ' असृजत-' उत्पन्न करता झाला.

एवमीक्षित्वा आलोच्य स आत्मेमाँल्लोकानसृजत सृष्टवान् । यथेह बुद्धिमांस्तक्षादिरेवंप्रकारान्प्रासादादीन्सृज इति ईक्षित्वेक्षानन्तरं प्रासादादीन्सृजति तद्वत् ॥

भाष्यार्थ-( आतां ' स इमाँल्लोकानसृजत ' या श्रुत्यंशाचें व्याख्यान करितात-) याप्रमाणें पूर्वी आलोचन करून तो आत्मा या लोकांस उत्पन्न करता झाला ( येथें ईक्षणपूर्वक सृष्टि केली, असें सांगण्याचें कारण स्रष्टा चेतन आहे, हें सिद्ध व्हावें, हेंच आहे, असा अभिप्राय मनांत धरून लौकिक कार्यकर्त्या सुताराच्या सचेतनत्वाचा दृष्टान्त देतात-) ज्याप्रमाणें या

लोकीं बुद्धिमान् सुतार इत्यादि 'मी अशा प्रकारच्या मंदिरादिकांस उत्पन्न करतों ' असा विचार करून त्या विचारानंतर मंदिरादिक कार्य निर्माण करतो त्याप्रमाणें ( तो मायाशक्तियुक्त परमात्मा—चेतन ईक्षण—आलोचन, विचार करून लोकांस निर्माण करतो. अर्थात् सृष्टीचें कारण जड नाहीं, चेतन आहे.)

ननु सोपादानस्तक्षादिः प्रासादादीन्सृजतीति युक्तं निरुपादानस्त्वात्मा कथं लोकान्सृजति ॥ नैष दोषः । सलिलफेनस्थानीये आत्मभूते नामरूपे अव्याकृते आत्मैकशब्दवाच्ये व्याकृतफेनस्थानीयस्य जगतः उपादानभूते संभवतः । तस्मात् आत्मभूतनामरूपोपादानभूतः सन्सर्वज्ञो जगन्निर्मिमीत इत्यविरुद्धम् ॥

भाष्यार्थ—( अहो पण ईक्षण करणारा चेतन—सुतार, कुंभार इत्यादि कर्ता काष्ठ, मृत्तिका इत्यादि उपादान कारणानें युक्त असतो. त्यामुळें तो राजमंदिरादि कार्यें निर्माण करतो, हें ठीक आहे. पण या उपनिषदांत तर 'हें जगत् पूर्वी एक आत्माच होता' असें सांगितलें आहे. त्यामुळें तो अद्वितीय होता, असा निश्चय होतो. त्या अद्वितीय आत्म्यापाशीं दुसऱ्या उपादान कारणादिकांचें अस्तित्व संभवत नाहीं, यास्तव सहकारी कारणशून्य असलेल्या त्या आत्म्याला जगाचा स्रष्टा म्हणणें सर्वथा अनुपपन्न आहे, अशी शंका घेतात—) अहो पण उपादानयुक्त सुतार इत्यादि प्रासादादिकांस उत्पन्न करतो हें म्हणणें युक्त आहे. पण उपादानशून्य आत्मा लोकांस निर्माण कसा करतो ? ( ' मी अनेक होतों, जन्म घेतों, असा संकल्प करून तो स्वतःलाच सर्व जगत् करतो, ' अशा अर्थाच्या श्रुतीनें आत्माच जगाचें उपादान कारण आहे, असें सांगितलें आहे. यास्तव त्याला दुसऱ्या लौकिक उपादानाची अपेक्षा नाहीं, म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण आकाशादि पदार्थ व्यावहारिक आहेत. त्यामुळें घटादि इतर व्यावहारिक पदार्थांप्रमाणेंच त्यांनाही परिणामत्व असणें सयुक्तिक होय. यास्तव आकाशादिकांचें परिणामी उपादान कोणतें तें सांगितलें पाहिजे. आत्मा निरवयव असल्यामुळें तो परिणामी—परिणाम पावणारा नाहीं. त्यामुळें तो आकाशादिकांचें उपादानही होऊं शकत नाहीं. )

( आकाशादि व्यावहारिक पदार्थ परिणामी आहेत. ही गोष्ट आम्हां अद्वैतवाद्यांनाही मान्य आहे. निरवयव आत्मा परिणामी पदार्थांचें उपादान कारण होऊं शकत नाहीं, हेंही आमच्या मताच्या विरुद्ध नाहीं. म्हणूनच

आम्ही अव्यक्त नाम-रूपावस्थेंत असलेलें बीजभूत अव्याकृत आकाशादि-कांचें परिणामी उपादान आहे, असें मानतों, असें आचार्य सांगतात–) त्यांत कांहीं दोष नाहीं. पाण्यांतील अव्यक्त फेंसाच्या स्थानीं असलेलीं आत्म-भूत, अव्यक्त व केवळ आत्मशब्दवाच्य अशीं नावें व रूपें व्यक्त फेंसाच्या स्थानीं असलेल्या जगाचीं उपादान कारणें संभवतात. तस्मात् आत्मरूप झालेलीं नामें व रूपें, ह्याच उपादानानें युक्त होत्साता तो सर्वज्ञ आत्मा जगाला निर्माण करितो, अशी कल्पना केल्यानें कांहीं विरोध येत नाहीं. ( पाणी व त्यापासून होणारा फेंस, यांचा वर दृष्टान्त दिला आहे. म्हणून यांच्याशीं दार्ष्टान्तिक आत्मा व जगत् यांचें साम्य दाखविण्यासाठीं पाण्यांत अव्यक्त असलेल्या फेंसाप्रमाणें आत्म्यामध्यें अव्यक्त असलेलें नाम रूपात्मक जगत् व्यक्त जगाचें उपादानकारण आहे. अव्यक्त फेंस जसा जलरूप होऊन राहतो, त्याप्रमाणेंच अव्याकृत–अव्यक्त नाम-रूपें आत्मभूत झालेलीं असतात. अव्यक्त फेंसाला जसें केवळ पाणी म्हणतात, त्याप्रमाणें अव्यक्त नाम रूपें केवळ ' आत्मा ' याच एका शब्दानें वाच्य होतात. यास्तव तीं अव्यक्त नाम-रूपें व्यक्त फेंसाच्या स्थानीं असलेल्या जगाचें उपादान कारण होऊं शकतात. तस्मात् आपल्या स्वरूपाला घेऊन मिळालेलीं नाम-रूपें याच उपादानानें युक्त झालेला सर्वज्ञ–चेतन आत्मा जगाला निर्माण करतो, अशी कल्पना केली असतां कोणत्याही प्रकारची शंका येत नाहीं. भाष्यांतील ' आत्मभूते ' या पदानें आत्म्यावर अव्यक्त नामरूप या नांवाच्या अव्याकृताचा अध्यास झालेला आहे, असें सुचविलें आहे. त्यामुळें आत्मा परिणाम पावणाऱ्या अविद्येचें अधिष्ठान आहे, असें सिद्ध झालें. अर्थात् तो आत्मा जगत्-विवर्ताचें उपादान आहे; नामरूप आत्ममात्र असल्यामुळें मिथ्या आहे व नामरूप मिथ्या असल्याकारणानेंच आत्म्याच्या अद्वितीयत्वालाही कांहीं बाध येत नाहीं. तात्पर्य, अव्याकृत आत्म्याच्या आधारानें राहतें व तें तदधीन आहे. )

[1] अथवा यथा विज्ञानवान्मायावी निरुपादान आत्मानमेव आत्मान्तर-त्वेनाकाशेन गच्छन्तमिव निर्मिमीते, तथा सर्वज्ञो देवः सर्वशक्तिर्महामाय आत्मानमेवात्मान्तरत्वेन जगद्रूपेण निर्मिमीत इति युक्ततरम् । एवं च सति कार्यकारणोभयासद्वादादिपक्षाश्च न प्रसज्यन्ते सुनिराकृताश्च भवन्ति ॥

भाष्यार्थ—( आतां घटादि पदार्थांनाही विवर्तताच आहे. म्हणजे घटादि पदार्थही विवर्त–अन्यथा भास, भ्रम आहेत. कोणताही परिणाम विवर्ताहून निराळा नाहीच. कारण विवर्त व परिणाम हे पर्याय शब्द आहेत, असें उत्तर मीमांसेतील ‘ तदनन्यत्वमारम्भणशब्दादिभ्यः ’ ( अ. २ पा. १ सूत्र १४ ) व ‘ आत्मकृतेः परिणामात् ’ ( अ. १ पा. ४ सू. २६ ) या दोन सूत्रांवरून ठरतें. कारण यांतील पहिल्या सूत्रांतील न्यायानें विवर्तरूपानें सिद्ध झालेल्या विकारालाच दुसऱ्या सूत्रांत परिणाम म्हटलें आहे. यांस्तव सत्-आत्म्यालाच उपादानत्व आहे. माया केवळ त्याला साहाय्य करते. अशा अभिप्रायानें ‘आत्मनि चैवं विचित्राश्च हि’ या सूत्राचा आश्रय करून भाष्यकार वरील शंकेचा दुसऱ्या रीतीनें परिहार करितात–) किंवा ज्याप्रमाणें ‘ आपण अमुक करावें ’ अशा संकल्पज्ञानानें युक्त असलेला लौकिक मायावी [ गारुडी ] त्याच्यापाशीं कांहींएक उपादानकारण नसतांनाही [ सहकारी साधनरहित असूनही ] आपल्यालाच आपल्याहून निराळ्याच रूपानें आकाशांतून जात असल्याप्रमाणें निर्माण करतो, त्याप्रमाणें सर्वज्ञ, सर्वशक्ति, महामायावान् देव आपल्यालाच निराळ्या रूपानें–अनात्मरूपानें जगद्रूपानें निर्माण करतो, असें म्हणणें अधिक सयुक्तिक आहे. असें मानलें असतां कार्य असत् आहे, कारण असत् आहे, कार्य व कारण हीं दोन्ही असत् आहेत इत्यादि वाद्यांचे पक्ष प्राप्त होत नाहींत व ते कोणीं उद्भावित केले, तरी चांगल्या प्रकारें निराकृत होतात, त्यांचें निराकरण होतें. ( ‘ विज्ञानवान् ’ मी आतां आकाशांतून जात असल्याप्रमाणें दिसणाऱ्या आपल्या दुसऱ्या देहास निर्माण करतों, असा संकल्प करण्याची योग्यता ज्याच्यामध्यें आहे, असा म्हणजे सुचेतन. वस्तु एक असतांना ती दुसरीच भासणें, हा विवर्त आहे. पण रज्जूवर सर्प, किंवा शिंपीवर रूपें भासणें व एका जादुगारानें आपलेंच दुसरें शरीर उत्पन्न करून दाखविणें, मातीचा रुपया करणें, यांत फरक आहे. पहिल्या प्रकारच्या विवर्तांत ईक्षण, स्रष्टृत्व इत्यादिकांचें भान होत नाहीं. पण दुसऱ्या प्रकारच्या विवर्तांत त्यांचें भान होतें. यास्तव जगत् हा विवर्त, यांतील दुसऱ्या प्रकारचा आहे, असें सुचवून सृष्टि रज्जुसर्पाप्रमाणें संकल्प व स्रष्टा यांवांचूनच झाली आहे, यास्तव तिला त्या दोघांचीही गरज नाहीं, या शंकेचें निरसन ‘विज्ञानवान्’ या विशेषणानें केलें आहे.

'निरुपादानः' आपल्या स्वरूपाहून व्यतिरिक्त अशा दुसऱ्या कोणत्याहि उपादानावांचून असलेल्या देवाला 'महामायः' ह्मणजे महामायावी, हें विशेषण देऊन तो महामायावी असल्यामुळें सर्वशक्ति, असें सुचविलें आहे. ह्मणजे सर्वशक्तित्व हा त्याचा स्वाभाविक धर्म नव्हे, औपाधिक आहे. 'युक्तरु.' 'इन्द्र (आत्मा) मायांच्या योगानें अनेकाकार होतो, मायेच्या योगानेंच आत्मतत्त्व अनात्माकार होतें, मी बहु होतों, मी उत्पन्न होतों, विकार वाङ्मात्र आहे, अग्नीतील लाल, शुभ्र व काळें, या रूपाविषयीं विचार करून त्यांतील प्रत्येक रूप, हा क्रमानें तेज, जल व पृथ्वी या तत्त्वांचा गुण आहे, असें कळलें असतां अग्नीचें अग्नित्व जातें' इत्यादि अनेक विचारपूर्ण श्रुतींना संमत असल्यामुळें आत्मा संकल्पपूर्वक जग निर्मितो, हा दुसरा पक्ष पहिल्या प्रकारच्या विवर्त पक्षाहून अधिक सयुक्तिक आहे.

'एवं च सति.' सत् आत्माच कार्य कारणरूपानें स्थित आहे, असा अंगीकार केला असता १ कांहीं कारणावांचून कार्य उत्पन्न होतें, हा यदृच्छावादाचा पक्ष २ उत्पत्तीच्या पूर्वी अविद्यमान असलेलेंच कार्य कर्ता, करण इत्यादि कारकांच्या व्यापारानंतर नवेंच उत्पन्न होतें, हा नैयायिकांचा पक्ष, ३ कार्य व कारण हीं दोन्ही असत् [शून्य, अविद्यमान] आहेत, हा शून्यवादी माध्यमिक बौद्धांचा पक्ष, आणि 'वादादिपक्षाः' येथील 'आदि' शब्दानें ४ उत्पत्तीच्या पूर्वींही कारणरूपानें विद्यमान असलेलेंच कार्य उत्पन्न होतें, हा सांख्यादिकांचा परिणाम पक्ष सांगितला आहे. 'वादादिपक्षाः' येथील पक्षशब्दानें त्या त्या पक्षावरील दोषही लक्षित होतात ते असे—१ असत्कारणपक्षीं म्हणजे करणावांचूनच कार्य यदृच्छेनें होतें, असें म्हणणाऱ्या लोकांच्या पक्षावर 'तर मग ज्यांना दहीं, चवरंग, इत्यादि कार्यांची अपेक्षा असते त्यांना दूध, काष्ठ, इत्यादि त्यांच्या कारणांस संपादन करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं, कारण तीं कार्ये आपोआपच यदृच्छेनें होऊं शकतील,' हा दोष येतो. २ कार्य उत्पत्तीच्या पूर्वींही असत् असतें, या नैयायिकांच्या असत्कार्यपक्षावर 'तर मग असत् असलेल्या सशाच्या शिंगाचीही उत्पत्ति होणें शक्य आहे, असें म्हणावें लागेल,' हा दोष येतो. ३ कार्य व कारण हीं दोन्ही असत आहेत, यापक्षीं वर दोन्ही पक्षीं सांगितलेले दोष येतात. पण यांतील कोणताही दोष आम्ही अंगीकारलेल्या या श्रुतिसंमत विवर्तवादावर येत नाहीं. ४ सांख्यांच्या परिणामवादावर म्हणजे कार्य उत्पत्तीच्या पूर्वींही

असतें, ह्या सत्कार्यवादावर 'कार्य कारणांत विद्यमान असतें, असें म्हटल्यास, तर मग कुंभारादि कारकांच्या व्यापाराची कांहीं आवश्यकता नाहीं, तो व्यर्थ आहे, असें होतें. बरें, तें पूर्वी कारणांत नव्हतें, असें म्हटल्यास कारणाच्याच निराळी अवस्था प्राप्त होणें, या परिणामाची अनुपपत्ति होते व उत्पत्तीच्या नंतर तें नसतें असें म्हटल्यास व्यवहार सिद्ध न होणें व कार्य जें प्रत्यक्ष दिसतें त्याची अनुपपत्ति होणें,' हे दोष येतात.

*किंवा आम्ही विवर्तवादाचाच अंगीकार केलेला असल्यामुळें परिणामादि* पक्षांचा स्वीकार केल्यास परपक्षाचा अंगीकार करणें, हा दोष आम्हांवर येईल ही शंका संभवत नाहीं. असें ' एवं च सति० ' इत्यादि शेवटच्या वाक्यानें भाष्यकार सांगत आहेत. कारण आम्हीं विवर्तवादाचाच अंगीकार करून इतर पक्षांवरील दोष सुचविलेले आहेत, ' सुनिराकृताश्च- ' अद्वितीय आत्मवस्तूला त्याच्या विपरीत प्रपंचाकार प्राप्त होतो, असें सांगणाऱ्या 'बहु स्यां' या श्रुतीनें विवर्तवादाचाच अंगीकार केलेला असल्यामुळें इतर सर्व पक्ष श्रुतिबाह्य आहेत, असें ठरतें व त्यामुळेंच त्यांचें निराकरणही होतें. )

**अम्भो मरीचीर्मरमापोऽदोऽम्भः परेण दिवं द्यौः प्रतिष्ठान्तरिक्षं मरीचयः पृथिवी मरो या अधस्तात्ता आपः ॥**

अर्थ—अंभ, मरीची, मर, व आप, ' दिवं परेण- ' जो द्युलोकाच्या पलीकडे आहे व ' द्यौः प्रतिष्ठा- ' स्वर्गलोक ही ज्याची प्रतिष्ठा आहे ' अदः अम्भः- ' तो अंभ-नांवाचा लोक आहे. ' अन्तरिक्षं मरीचयः- ' अन्तरिक्ष लोक—भुवर्लोक हाच मरीचीलोक आहे. ' पृथिवी मरः- ' पृथिवी हाच मर लोक आहे. ' या अधस्तात् ता आपः- ' पृथ्वीच्या खालील भोगभूमी, हेच आप लोक आहेत.

कान्लोकानसृजतेत्याह—अम्भो मरीचीर्मरमाप इति । आकाशादिक्रमेण अण्डमुत्पाद्यांभःप्रभृतीँल्लोकानसृजत ।तत्रांभःप्रभृतीन्स्वयमेव व्याचष्टे श्रुतिः । अदस्तदंभःशब्दवाच्यो लोकः, परेण दिवं द्युलोकात्परेण परस्तात्सोऽम्भःशब्दवाच्यः, अंभोभरणात् । द्यौः प्रतिष्ठाश्रयस्तस्याभसो लोकस्य । द्युलोकादधस्तादन्तरिक्षं यत्तन्मरीचयः । एकोऽप्यनेकस्थानभेदत्वाद्बहुवचनभाक्त्वीचय इति । मरिचिभिर्वा रश्मिभिः संबंधात् । पृथिवी मरो, म्रियन्तेऽ-

स्मिन् भूतानीति । या अधस्तात् पृथिव्यास्ता आप उच्यन्ते आप्नोतेर्लोकाः ॥ यद्यपि पंचभूतात्मकत्वं लोकानां तथाप्यम्ब्बाहुल्यादन्नामभिरेवांभो मरीचीर्मरमाप इत्युच्यन्ते ॥

भाष्यार्थ--तो कोणत्या लोकांना उत्पन्न करता झाला, अशी आकांक्षा झाली असतां ' अम्भो मरीचीर्मरमापः ' इत्यादि श्रुति उत्तर सांगते--( लोक भौतिक-भूतांचे परिणाम असल्यामुळें व ब्रह्मांडामध्यें अंतर्भाव पावलेले असल्याकारणानें सूक्ष्म भूतांची सृष्टि, त्यांचें पंचीकरण, व ब्रह्मांडसृष्टि इतकें झाल्यानंतर येथें सांगितलेल्या अंभःप्रभृति लोकांची उत्पत्ति झाली, असें गुणोपसंहारन्यायाचा आश्रय करून भाष्यकार सांगतात--) आकाशादि क्रमानें ब्रह्मांड उत्पन्न करून अम्भःप्रभृति लोकांस तो उत्पन्न करता झाला. त्यांतील अंभःप्रभृति लोकांचें व्याख्यान स्वतःच श्रुति करते. ( या लोकच्या मनुष्यांना अम्भःप्रभृति लोक कोणते, तें माहीत नसल्यामुळें श्रुति सांगत आहे. द्युलोकाच्या म्हणजे स्वर्गलोकाच्या पलीकडे जे ' महर् ' इत्यादि लोक आहेत व त्या अम्भलोकांचा आश्रय जो द्युलोक आहे, त्या सर्वांचा या श्रुतींत 'अंभः' या शब्दानें निर्देश केला आहे. कारण वृष्टीच्या द्वारा आम्हांला प्राप्त होणारें जल तेथें बीजरूपानें असतें, असें भाष्यकार सांगतात-) हा तो अम्भःशब्दवाच्य लोक ' परेण दिवं- ' द्युलोकाच्या पलीकडे आहे. त्यांत जल मेघरूपानें भरत असल्यामुळें तो जलवाचक अंभःशब्दाचा वाच्य होतो. त्या अंभोलोकाची प्रतिष्ठा--आधार द्युलोक आहे. द्युलोक म्हणजे स्वर्लोक--स्वर्ग. ' यत् द्युलोकात् अधस्तात् अन्तरिक्षं- ' जें द्युलोकाच्या खालीं अंतरिक्ष आहे 'तन्मरीचयः-' तो मरीचिलोक होय. तो जरी एक असला तरी त्यांत अनेक स्थानभेद असल्यामुळें ' मरीचयः ' अशा बहुवचनाला पात्र होतो. ( मरीचिशब्दानें अंतरिक्षलोक लक्षित होतो. कारण त्याच्याशीं सूर्यकिरणांचा संबंध असतो. पण तो लोक तर एक आहे. मग त्याला उद्देशून 'मरीचयः' असें बहुवचन कसें घातलें आहे? म्हणून कोणी विचारतील तर भाष्यांत त्याचें उत्तर दोन प्रकारांनीं दिलेलें आहे. एक निरनिराळ्या अनेक प्रदेशांस उद्देशून बहुवचन घातलें आहे व दुसरें, अंतरिक्ष या एका लोकाचे लक्षक मरीची अनेक आहेत. वास्तव, ' मरीचयः ' हें बहुवचन त्या लक्षक किरणांचें आहे लक्ष्य लोकाचें नव्हे. ' गङ्गायां घोषः ' म्हणजे गंगेच्या तीरावर घोष आहे, या लक्षणेच्या उदाहरणांत गंगा लक्षक असून घोष [ ग-

पळीवाडा] लक्ष्य आहे. पण लक्षक 'गङ्गा' हें पद स्त्रीलिंगी असल्यामुळे त्याचें 'गङ्गायां' असें स्त्रीलिंगच योजलें आहे. 'घोष' या पुल्लिंगी लक्ष्याच्या अनुरोधानें पुल्लिंग योजलेलें नाहीं. तसेंच येथेंही तें बहुत्व मरीची या लक्षकाचें आहे, असें समजावें, असें भाष्यकार सांगतात–)किंवा त्या अंतरिक्ष लोकाचा संबंध किरणांशीं आहे. ( व किरण बहु असल्यामुळें ' मरीचयः ' असें बहुवचन योजलें आहे. भाष्यकारांनीं या भाष्यानें मरीचिशब्दानें अंतरिक्षलोकाचेंच ग्रहण करण्याचें दुसरें निमित्त सांगितलें आहे, असें त्यांतील नुसत्या वाशब्दाकडे लक्ष देऊन ह्मणूं नये. कारण येथें सांगितलेल्या निमित्तावांचून दुसरें निमित्त पूर्वीं सांगितलेलें नाहीं. यास्तव या भाष्यांतील ' वा ' हा शब्द विकल्पार्थी आहे, असें भ्रमानें समजूं नये. ) पृथिवी हा ' मर- ' लोक होय. कारण त्यांत लोक मरतात. (ह्मणूनच त्याला मर्त्य असेंही ह्मणतात. ) ज्या आप–जल पृथिवीच्या खालीं आहेत त्यांना आपलोक ह्मणतात. कारण अधोलोकीं निवास करणाऱ्या प्राण्यांकडून ते लोक प्राप्त केले जातात. [ ह्मणजे ' आप ' या नावांत 'आप् ह्मणजे प्राप्त करणें' या धातूच्या अर्थाचा संबंध आहे ]

( अहो पण–या सांगितलेल्या लोकांशीं पांच भूतांचा एकसारखाच संबंध आहे, यास्तव जलावांचून पृथिव्यादि दुसऱ्या कोणत्या तरी भूताच्या नांवानेंही वरील लोकाचा निर्देश करितां आला असता. अंतरिक्षाचा नुसत्या किरणांशींच संबंध आहे, असें कांहीं नाहीं. तर मेघादि दुसऱ्या पदार्थांशींही त्याचा संबंध आहे. यास्तव त्यांच्या नांवांनींही त्या लोकाचा निर्देश करतां येणें शक्य आहे. त्याचप्रमाणें पृथ्वी व तिच्या खालचे लोक यांचा क्रमानें मरण ,व प्राप्ति या क्रियावांचून गमनादि दुसऱ्या क्रियांशींही संबंध आहे. यास्तव त्या क्रियावरूनही ते लक्षित होऊं शकतील,–या शंकेचा आचार्य अनुवाद करितात–) जरी लोकांना पंचभूतात्मकत्व आहे, ( भूतात्मकत्व ह्मणजे भूतसंबंधित्व; भाष्यांतील हा शब्द उदाहरणार्थ आहे. त्यामुळें त्यांतील कांहीं लोकांशीं मेघादि दुसऱ्याही कांहीं पदार्थांचा संबंध आहे, असें समजावें. येथें सांगितलेल्या अंभ, मरीचि, मरण व प्राप्ति यांचें क्रमानें ऊर्ध्वलोक, अंतरिक्षलोक, पृथिवी व अधोलोक यांमध्यें आधिक्य असल्यामुळें त्यावरूनच ते लोक लक्षित होणें योग्य आहे. कारण त्या त्या वस्तूंच्या आधिक्यामुळें त्यांच्या त्यांच्या अधिष्ठानांना त्यांचीं त्यांचीं नांवें प्राप्त होत असतात. जसें–गुजराथी लोकांच्या आधिक्यामुळें गुजराथ, महाराष्ट्रीयांच्या आधिक्यामुळें महाराष्ट्र,

इत्यादि, असें समाधान करितात–) तथापि त्या चारी लोकामध्यें जलाचें बाहुल्य–अधिकता असल्यामुळें जलाच्या अम्भ, मरीची, मर व आप या नांवांनींच त्यांचा उल्लेख केलेला आहे. (भाष्यांतील ' अब्बाहुल्यात् ' हें पद उपलक्षणार्थ आहे. त्यामुळें, अंतरिक्षात किरणाचें बाहुल्य असल्यामुळें त्याचा किरणाच्या नांवानें, पृथ्वींत मरणाचें बाहुल्य असल्यामुळें त्या लोकाचा ' मर ' या नांवानें व पाताळात प्राप्तीचें प्राचुर्य असल्यामुळें त्याचा ' आप ' या नावानें उल्लेख केला आहे, असें समजावें. कारण तसें न समजतां भाष्यात जसा उल्लेख केला आहे तसेंच केवळ जलाचें बाहुल्य घेतल्यास त्याच्या योगानें वरील शंकेचें समाधान होत नाहीं. कारण द्युप्रभृति वरचे लोक जरी कदाचित् जलबहुल असले, तरी अंतरिक्ष, पृथ्वी व पाताळ हे अधोलोक जलप्रचुर नाहींत. शेवटचा ' आप ' हा शब्दही प्राप्ति या क्रियेच्या अर्थी आहे. यास्तव ' अब्बाहुल्यात् ' हें भाष्यकाराचें पद उपलक्षणार्थ आहे, असेंच समजावें.

ऊर्ध्वलोकांतून वृष्टिद्वारा आलेलें जलच आम्हांला साक्षात् दिसतें. दुसरें भूत साक्षात् दिसत नाहीं. यास्तव आमच्या दृष्टीनें वरील लोकांचें जलबाहुल्य आहे, असें म्हणतां येतें त्याचप्रमाणें ऊर्ध्वलोकीं गमन करणाऱ्या प्राण्याहून अधोलोकीं गमन करणारे प्राणी अतिशय अधिक असतात, असें पुराणात सांगितलें आहे. यास्तव ' बहुभिः आप्यन्ते अधोलोकाः ' म्हणजे अधोलोक पुष्कळ जीवांकडून प्राप्त केले जातात, अशा व्युत्पत्तीनें आप्ति म्हणजे प्राप्ति या क्रियेमुळें अधोलोकाना ' आप ' हें नाव प्राप्त झालें आहे. अधोलोकांस प्राप्त करून घेणाऱ्या जीवांचें तेथें प्राचुर्य आहे. पृथिवींतील प्राणी शीघ्र मरत असतात व अशा प्राण्यांचेंच तेथें बाहुल्य असतें. म्हणून पृथ्वीला ' मर ' म्हटलें आहे. अंतरिक्षांत किरणांचें बाहुल्य तर प्रसिद्धच आहे.)

**स ईक्षतेमे नु लोका लोकपालान्नु सृजा इति**
**सोऽद्भ्य एव पुरुषं समुद्धृत्यामूर्छयत् ॥**

अर्थ—' सः- ' तो ईश्वर 'ऐक्षत-' पुनरपि असा विचार करता झाला ' इमे नु लोकाः- ' हे लोक तर निष्पन्न झाले. (आतां त्यांच्या रक्षणार्थ–) ' लोकपालान् नु सृजे इति-' लोकपालांना उत्पन्न करतों, असें ( त्यानें आलोचन

केलें. ) 'सः-' तो 'अद्भ्यः एव-' जळापासूनच—जलप्रधान पंचभूतांपासूनच 'पुरुषं-' पुरुषाकार विराट्-शरीराला 'समुद्धृत्य-' वर काढून 'अमूर्छयत्-' साकार—सावयव—कठिण करता झाला.

सर्वप्राणिकर्मफलोपादानाधिष्ठानभूतांश्चतुरो लोकान्सृष्ट्वा स ईश्वरः पुनरेवेक्षत । इमे नु अम्भःप्रभृतयो मया सृष्टा लोकाः परिपालयितृवर्जिता विनश्येयुः । तस्मादेषां रक्षणार्थं लोकपालाँल्लोकानां पालयितॄन्सृजे सृजेऽहमिति॥

भाष्यार्थ—( या उपनिषदांत 'आत्मा वा०' या पहिल्या वाक्यामध्यें ज्याचा निर्देश केला आहे त्या आत्म्याच्या ज्ञानानें संसारी जीव मुक्त केला जाण्यास योग्य आहे, असें सांगावयाचें आहे. कारण असंसारी चेतनाला मोक्षाची मुळीं उपपत्तिच नाहीं. बद्ध नसलेल्याला मुक्त होण्याचेंही कारण नसतें. पण तो संसार—ज्यांत तो करावयाचा ते आधारभूत लोक, संसार-उपाधिभूत लिङ्गशरीर, त्याचे अभिमानी देव, लिंगशरीरादिकांचें अधिष्ठान स्थूलशरीर, संसाररूप अशनाया पिपासा [ क्षुधा-तृषा ] इत्यादि ऊर्मी, व त्या ऊर्मी हा माझा धर्म आहे, असा अभिमान बाळगणारा भोक्ता यांवाचून होऊं शकत नाहीं. म्हणजे निरनिराळ्या शरीरांत प्रवेश करून सुखदुःखानुभवरूप संसार या इतक्या सामग्रीवांचून होऊं शकत नाहीं. यास्तव त्या सर्वांची उत्पत्ति क्रमानें 'अयमावसथः' येथपर्यंत सांगण्याची इच्छा करणारा भगवान् वेद संसाराधिष्ठानभूत—आधारभूत लोकांची उत्पत्ति सांगून आतां त्या लोकांच्या पालक देवांची सृष्टि सांगण्याच्या मिषानें समष्टि स्थूलशरीर, समष्टि लिंगशरीर व त्याचे अभिमानी देव यांची सृष्टि सांगण्यास 'स ईक्षतेमे नु०' या वाक्यानें आरंभ करितो व भाष्यकार त्याचें व्याख्यान करितात—) सर्व प्राण्यांच्या अनुष्ठित कर्मांचें फल, व त्यांचें उपादान—त्यांचें साधन, यांच्या अधिष्ठानभूत —आधाररूप अंमःप्रभृति चार लोकांस उत्पन्न करून तो ईश्वर पुनरपि असें ईक्षण करता झाला. मीं उत्पन्न केलेले हे अम्भःप्रभृति लोक परिपालकांवांचून राहिल्यास नाश पावतील. यास्तव यांच्या रक्षणासाठीं लोकपालांस—लोकांच्या पालकास 'अहं सृजे-' मी उत्पन्न करतों. 'इति-' असें ( त्यानें ईक्षण केलें, असा संबंध. )

एवमीक्षित्वा सोऽद्भ्य एवाप्प्रधानेभ्य एव पंचभूतेभ्यो,येभ्योऽम्भःप्रभृतीन्सृष्टवांस्तेभ्य एवेत्यर्थः । पुरुषं पुरुषाकारं शिरःपाण्यादिमन्तं समुद्धृत्य

अद्भ्यः समुपादाय मृत्पिण्डमिव कुलालः पृथिव्याः अमूर्छयन्मूर्छितवान्संपिंडितवान्स्वावयवसंयोजनेनेत्यर्थः ॥

भाष्यार्थ—(समष्टि लिंगशरीर व त्यावर अभिमान ठेवणाऱ्या देवता यांची उत्पत्ति विराटाच्या अवयवांपासून होणारी असल्यामुळें तिच्याकरितां विराट्सृष्टि लागतात—) याप्रमाणें ईक्षण करून तो जलापासूनच, ज्यांमध्यें जल प्रधान आहे अशा पंचभूतांपासूनच म्हणजे ज्यांच्यापासून अंभःप्रभृति लोकांना त्यानें उत्पन्न केलें त्यांच्याचपासून, असा भावार्थ, पुरुषास—मस्तक, हात इत्यादिकांनीं युक्त असलेल्या पुरुषाकारास वर काढून कुंभार पृथ्वीपासून मातीचा गोळा जसा काढून घेतो त्याप्रमाणें जलापासून पुरुषास काढून घेऊन 'अमूर्छयत्-' साकार–सावयव करता झाला. त्याच्या अवयवांची चांगली योजना करून घट्ट करता झाला. ( भाष्यकारांनीं वर—पृष्ठ ७८—'अण्डमुत्पाद्याम्भःप्रभृतीँल्लोकानसृजत' या भाष्यानें लोकांच्या उत्पत्तीच्या पूर्वींच ब्रह्मांडाची उत्पत्ति जरी सांगितली आहे, तरी येथें लोकपालांची उत्पत्ति सांगण्यासाठीं त्या पूर्वोक्त उत्पत्तीचाच अनुवाद केला आहे. वास्तव भाष्यावर पूर्वोत्तरविरोध हा दोष येत नाहीं. )

तमभ्यतपत्तस्याभितप्तस्य मुखं निरभिद्यत यथाण्डम् । मुखाद्वाग्वाचोऽग्निर्नासिके निरभिद्येतां नासिकाभ्यां प्राणः प्राणाद्वायुरक्षिणी निरभिद्येतामक्षीभ्यां चक्षुश्चक्षुष आदित्यः कर्णौ निरभिद्येतां कर्णाभ्यां श्रोत्रं श्रोत्राद्दिशस्त्वङ्निरभिद्यत त्वचो लोमानि लोमभ्य ओषधिवनस्पतयो हृदयं निरभिद्यत हृदयान्मनो मनसश्चंद्रमा नाभिर्निरभिद्यत नाभ्या अपानोऽपानान्मृत्युः शिश्नं निरभिद्यत शिश्नाद्रेतो रेतस आपः ॥

इत्यैतरेयोपनिषद्यात्मषट्के प्रथमः खण्डः ॥ १ ॥

अर्थ—'तं-' त्या विराट्-पुरुषास उद्देशून 'अभ्यतपत्-' त्यांतील छिद्रें, त्या छिद्रांतील इंद्रियें, त्यांच्या अभिमानी देवता, इत्यादिकांच्या सृष्ट्यर्थ तो परमेश्वर पर्यालोचन करूं लागला. त्याचें पर्यालोचन हेंच तप आहे, असें उपनिषदांत सांगितलेंच आहे. 'तस्य अभितप्तस्य-' ज्याच्याविषयीं सर्वप्रकारें पर्यालोचन

केलें आहे अशा त्या विराट् पिंडाचें 'मुखं-' मुख हें छिद्र 'निरभिद्यत-' झालें, मुखच्छिद्र विदारित झालें. उत्पन्न झालें. तें कसें झालें, हें सुचविण्यासाठीं 'यथा अण्डं-' असा दृष्टान्त दिला आहे. म्हणजे पक्षी, सर्प इत्यादिकांचें परिपक्व झालेलें अंडें जसें आपोआप उकलतें त्याप्रमाणें तें मुखच्छिद्र झालें. 'मुखात् वाक्-' त्या मुखच्छिद्रापासून वाक् हें इंद्रिय निष्पन्न झालें. 'वाचः अग्निः-' वाक्-पासून अग्निदेवता उत्पन्न झाली, त्याचप्रमाणें 'नासिके-' नाकाचीं दोन छिद्रें 'निरभिद्येतां-' फुटलीं. 'नासिकाभ्यां-' त्या नाकाच्या छिद्रांपासून 'प्राणः-' घ्राणेंद्रिय व 'प्राणात्-' प्राणापासून 'वायुः-' वायु देवता झाली. 'अक्षिणी निरभिद्येतां-' नेत्रांचीं छिद्रें झालीं. 'अक्षीभ्यां-' त्या दोन नेत्रांपासून 'चक्षुः-' चक्षुरिन्द्रिय व 'चक्षुषः-' चक्षूपासून 'आदित्यः-' सूर्य उत्पन्न झाला. 'कर्णौ-' कानाचीं छिद्रें, 'निरभिद्येतां-' झालीं. 'कर्णाभ्यां-' दोन्ही कर्णांपासून 'श्रोत्रं-' श्रोत्रेंद्रिय व 'श्रोत्रात् दिशः-' श्रोत्रापासून दिशा झाल्या. 'त्वक् निरभिद्यत-' त्वक् इंद्रिय निष्पन्न झालें. 'त्वचो लोमानि-' त्वचेपासून लोम उत्पन्न झाले. येथें लोमशब्दानें लोमाधारभूत व त्वचेंत असणारें स्पर्शनेन्द्रिय घ्यावें. 'लोमभ्यः ओषधिवनस्पतयः-' स्पर्शनेंद्रियापासून औषधी व वनस्पती झाल्या. 'हृदयं निरभिद्यत-' हृदय निर्माण झालें. 'हृदयात् मनः-' हृदयापासून मन झालें. 'मनसः चन्द्रमाः-' मनापासून चन्द्रमा झाला. 'नाभिः निरभिद्यत-' नाभि हें छिद्र झालें. 'नाभ्या अपानः-' नाभीपासून अपान झाला. 'अपानात् मृत्युः' अपानापासून मृत्यु झाला. 'शिश्नं निरभिद्यत-' शिश्न हें छिद्र झालें. 'शिश्नात्-' त्या छिद्रापासून 'रेतः-' गुह्येंद्रिय झालें आणि 'रेतसः-' गुह्येंद्रियापासून 'आप' झालें. (१)

त पिंडं पुरुषविधमुद्दिश्याभ्यतपत् । तदभिध्यानं संकल्पं कृतवानित्यर्थः । 'यस्य ज्ञानमयं तपः' इत्यादिश्रुतेः । तस्याभितप्तस्येश्वरसंकल्पेन तपसाभितप्तस्य पिंडस्य मुखं निरभिद्यत मुखाकारं सुषिरमजायत । यथा पक्षिणोऽडं निर्भिद्यत एवम् । तस्मान्निर्भिन्नान्मुखाद्वाक्करणमिंद्रियं निरवर्तत तदधिष्ठाताग्निस्ततो वाचो लोकपालः । तथा नासिके निरभिद्येताम् । नासिकाभ्यां प्राणः प्राणाद्वायुः । इति सर्वत्राधिष्ठानं करणं देवता च त्रयं क्रमेण निर्भिन्नमिति । अक्षिणी कर्णौ त्वक् हृदयमन्तःकरणाधिष्ठानं मनोऽन्तःकरणं, नाभिः सर्वप्राणबंधनस्थानम् । तस्मादपानसंयुक्तत्वादपान इति

पाय्विंद्रियमुच्यते । तस्याधिष्ठात्री देवता मृत्युः । यथाऽन्यत्र । तथा शिश्नं निरभिद्यत प्रजननेंद्रियस्थानमिंद्रियं रेतो रेतोविसर्गार्थत्वात्सह रेतसोच्यते रेतस आप इति ॥

भाष्यार्थ—( याप्रमाणें विराटाची उत्पत्ति सांगून त्याच्या अवयवापासून लोकपालांची उत्पत्ति 'तमभ्यतपत्तस्याभितप्तस्य०' या श्रुतिवचनाच्या व्याख्यानानें सांगतात–) 'तं पुरुषविधं पिण्डं उद्दिश्य-' त्या पुरुषाकार पिंडाला उद्देशून 'अभ्यतपत्-तदभिध्यानं संकल्पं कृतवानित्यर्थः-' अभ्यतप, त्याविषयीं चिंतन, संकल्प करता झाला, असा भावार्थ. ( अभ्यतपत् यांतील तपः-शब्दानें अभिध्यान–चिंतन या नांवाचें ज्ञान सांगितलें आहे. कृच्छ्र-चांद्रायणादि शरीरसंतापक तप नव्हे. याविषयीं श्रुतीचें प्रमाण देतात–) ज्याचें तप ज्ञानमय आहे ( ज्ञानच आहे, कृच्छ्रादि नव्हे ) अशा अर्थाची श्रुति आहे. त्या अभितप्त म्हणजे ईश्वराच्या संकल्परूप तपानें संकल्पिलेल्या पिंडाला तोंड फुटलें, मुखाच्या आकाराचें छिद्र झालें. ज्ञणजे ज्याप्रमाणें पक्ष्याचें अंडें आपोआप उकलतें, त्याप्रमाणें (त्या पुरुषाकार पिंडाला तोंड झालें.) त्या फुटलेल्या मुखापासून वाक् इंद्रिय झालें. त्या इंद्रियापासून लोकपाल अग्नि वाणीचा अधिष्ठाता झाला. ( वागादि सर्व इंद्रियें अपंचीकृत भूतांचीं कार्यें जरी असलीं व मुखादि गोलकांचीं तीं कार्यें नसलीं, तरी मुखादि आश्रयांमध्यें–मुखादि स्थानांमध्यें त्यांची अभिव्यक्ति होत असल्यामुळें–तीं व्यक्त होत असल्यामुळें येथें 'मुखात् वाक्' इत्यादि म्हटलें आहे ) त्याचप्रमाणें नासिकाछिद्रें फुटलीं–नाकाचीं भोकें झालीं. नासिकाछिद्रापासून प्राण झाला. ( येथें प्राणशब्दानें प्राणवृत्तिसहित घ्राणेंद्रिय घ्यावें. ) प्राणापासून वायु झाला. आतां यापुढें 'अक्षिणी निरभिद्येतां' इत्यादि श्रुतिवाक्यांत सर्वत्र अधिष्ठान, इंद्रिय व देवता अशीं तीन क्रमानें झालीं, असें सांगितलें आहे, असें समजावें. ( अधिष्ठान म्हणजे गोलक. ) दोन नेत्रगोलक, दोन कर्णगोलक, व त्वक् गोलक उत्पन्न झालें. ( त्यांपासून क्रमानें चक्षुरिंद्रिय, श्रोत्रेंद्रिय व लोम–लोमासह नियमानें असणारें स्पर्शनेंद्रिय, हीं उत्पन्न झालीं. त्या इंद्रियांपासून आदित्य, दिशा व ओषधिवनस्पति, या देवता झाल्या. ओषधिवनस्पति या शब्दानें त्यांची वायु ही अधिदेवता लक्षित होते. आतां 'चित्तं तु चेतो हृदयं,' 'हृदयज्ञं च अहृदयज्ञं च' इत्यादि वचनांमध्यें हृदय हा शब्द अंतःकरण या अर्थीं योजला आहे व तो त्याच अर्थीं

रूढ आहे. यास्तव श्रुतींत 'हृदयान्मनः' असें ह्मणून मनःशब्दानेंही तेंच सांगणें योग्य नव्हे. कारण त्यावर पुनरुक्तता दोष येतो, असें कोणाला वाटेल ह्मणून आचार्य म्हणतात-) 'हृदयं' या शब्दानें अंतःकरणाचें अधिष्ठान व 'मनः' या शब्दानें अन्तःकरण घ्यावें. [ म्ह. हृदयशब्दानें अन्तःकरणाचें अधिष्ठान हृदयकमळ सांगितलें आहे. ] नाभि म्हणजे सर्व प्राणांच्या बंधनाचें स्थान. ( गुदेंचें मूळ, असा याचा अर्थ ) त्या नाभीपासून ( अपान झाला. ) अपानाशीं संयुक्त झालेलें असल्यामुळें येथें 'अपान' या शब्दानें 'पायु' हें इंद्रिय सांगितलें आहे. त्याची अधिष्ठात्री देवता मृत्यु आहे. ( अहो, पण श्रुतींतील 'शिश्नं निरभिद्यत' या पर्यायांत शिश्न व रेत यांचीच उत्पत्ति सांगितल्यास स्त्रीयोनि, शोणित इत्यादिकांची उत्पत्ति सांगितली नाहीं, असें होईल, अशी आशंका घेऊन शिश्नशब्दानें उपस्थेंद्रियाचें स्थान लक्षित होतें, रेत या शब्दानें त्याचा त्याग करण्यास उपयोगी असलेलें उपस्थेंद्रिय लक्षित होतें व 'अप्' या शब्दानें अप्‌उपलक्षित पंचभूतें ही ज्याची उपाधि आहे तो प्रजापति सांगितला जातो, असें सांगतात-) ज्याप्रमाणें पूर्वीच्या इतर पर्यायांमध्यें स्थान, इंद्रिय व देवता, अशा तिघांचा निर्देश केला आहे, त्याप्रमाणें येथेंही 'शिश्नं-प्रजननेन्द्रियस्थानं निरभिद्यत-' शिश्न-प्रजननेंद्रियाचें स्थान-गोलक उत्पन्न झालें. 'रेतः, इति इन्द्रियं उच्यते-' रेत या शब्दानें इंद्रिय सांगितलें जातें. कारण तें इंद्रिय रेताच्या उत्सर्गाकरतां आहे. 'रेतसा सह ( संबद्धं )' रेताशीं संबद्ध आहे. ( म्हणून लक्षणा संभवते. ) 'रेतसः आपः इति-' रेतापासून ह्मणजे उपस्थेंद्रियापासून आप-प्रजापति झाला.

इति श्रीशंकराचार्यकृत ऐतरेयोपनिषद्भाष्याच्या प्रथम खंडाचा विष्णुशर्मकृत सविवरण अर्थ समाप्त झाला.

---

ता एता देवता सृष्टा अस्मिन् महत्यर्णवे प्रापतंस्तमशनापिपासाभ्यामन्ववार्जत् ॥ ता एनमब्रुवन्नायतनं नः प्रजानीहि । यस्मिन् प्रतिष्ठिता अन्नमदामेति ॥ ताभ्यो गामानयत्ता अब्रुवन्न वै नोऽयमलमिति ॥ ताभ्योऽश्वमानयत्ता अब्रुवन्न वै नोऽयमलमिति ॥ ताभ्यः पुरुषमानयत्ता अब्रुवन्

सुकृतं बतेति पुरुषो वाव सुकृतम् ॥ ता अब्रवीद्यथायतनं प्रविशतेति ॥

अर्थ---'ताः एताः देवताः सृष्टाः' त्या ह्या इंद्रियाभिमानिनी देवता उत्पन्न झाल्या असतां 'अस्मिन् महति अर्णवे' वर सांगितलेल्या विराड्देहरूपी मोठ्या-अति विस्तृत समुद्रांत [ विराड्देहांत ] 'प्रापतन्' पडल्या. तेव्हां परमेश्वरानें 'तं' सर्व इंद्रियें व त्यांच्या देवता यांच्या अधिष्ठानभूत अशा त्या विराड्देहास 'अशनापिपासाभ्यां' क्षुधा व पिपासा (तहान) यांच्या योगानें 'अन्ववार्जत्' संयुक्त केलें. (आतां ही श्रुति अल्पदेहांची उत्पत्ति सांगते---) 'ताः' विराड्देहांत पडलेल्या इंद्रियाभिमानी देवता 'एनं' त्या स्रष्ट्या परमेश्वरास 'अब्रुवन्' म्हणाल्या. हे परमेश्वरा ! हा विराड्देह आमच्या भोगास योग्य नाहीं. कारण तो फारच विस्तृत आहे. यास्तव त्याला नखशिखान्त व्यापून आम्ही त्यांत प्रतिष्ठित होण्यास असमर्थ आहों. त्याच-प्रमाणें या एवढ्या देहाला पुरेल इतकें अन्न संपादन करण्यासही आम्ही असमर्थ आहों. यास्तव 'यस्मिन् प्रतिष्ठिताः (सत्यः) अन्नं अदाम' ज्या अल्पदेहांत प्रतिष्ठित होऊन आम्ही अन्न खावूं शकूं [ म्हणजे त्या अल्पदेहास पुरेल इतकें अन्न खाण्यास समर्थ होऊं ] असें 'आयतनं नः प्रजानीहि' शरीर (स्थान) आम्हांकरितां संपादन कर. (असें स्थान कोणतें द्यावा विचार कर.) 'इति' असें त्या बोलल्या. तेव्हां परमेश्वर 'ताभ्यः' त्यां देवतांच्या भोगाकरतां 'गां आनयत्' गायीचा देह आणता झाला. 'ताः अब्रुवन्' तेव्हां त्या देवता म्हणाल्या, 'न वै नः अयं अलं' 'नः' आम्हांला 'अयं' हा देह 'न वै अलं' पुरेसा नाहींच, (आम्हांला जसा पाहिजे तसा हा नाहीं. या शरीराला वरचे दांत नाहींत. यास्तव त्याला दूर्वादि मुळें उपटतां येणें शक्य नाहीं. तस्मात् त्या विराड्देहाप्रमाणें हाही गायीचा देह राहूं दे. ज्याला दोन्ही बाजूंस दांत आहेत, असा दुसराच देह निर्माण कर.) 'इति' असें त्या बोलल्या.त्यानंतर परमेश्वर 'ताभ्यः' त्यांच्याकरितां 'अश्वं आनयत्' अश्व आणता झाला. पण 'ताः अब्रुवन्' त्या म्हणाल्या 'न वै नः अयं अलं इति' हा अश्वदेहही विवेकज्ञानशून्य असल्यामुळें आम्हांला पुरेसा नाहीं. तेव्हां परमेश्वर 'ताभ्यः' त्यांच्यासाठीं 'पुरुषं आनयत्' विवेकसंपन्न पुरुषदेह आणता झाला. 'ताः अब्रुवन्' तेव्हां तेव-

दयानें संतुष्ट झालेल्या त्या देवता म्हणाल्या, ' सुकृतं बत-' अहाहा परमेश्वरानें हें फार चांगलें केलें, येथें ' बत ' या आश्चर्यवाचकशब्दानें आपला संतोष सुचविणाऱ्या त्या ' सुकृतं-' चांगलें केलें ' इति- ' असें बोलल्या. यास्तव ' पुरुषः वाव सुकृतं-' मनुष्यदेहच ' सुकृतं' या संतोषद्योतकशब्दानें सांगतां येण्यासारखा आहे. ( याविषयीं याच आरण्यकांत मागें ' मनुष्य देहांतच आत्मा अधिक प्रकट झाला आहे. कारण तो प्रज्ञानानें अतिशय संपन्न आहे. तो आपल्याला कळलेलें बोलूं शकतो. कळलेली वस्तु पाहूं शकतो. काळची गोष्ट त्याला आज आठवते. त्याला प्रकाश व अप्रकाश यांचें ज्ञान असतें. तो या मर्त्यशरीराच्या योगानें अमृताच्या [ अमरणाच्या ] प्राप्तीची इच्छा करतो, इत्यादि योग्यतेनें तो संपन्न आहे ' असें म्हटलें आहे. आतां ईश्वरानें निर्माण केलेल्या भोगयोग्य शरीरांत त्या देवतांचा प्रवेश व्हावा म्हणून श्रुति ईश्वराची प्रेरणा दाखविते.— ) तो ईश्वर ' ताः यथायतनं प्रविशत इति अब्रवीत्- ' त्या देवतांना ' अहो देवतांनो, आपापल्या यथोचित आयतनांत [ शरीरांत, स्थानांत ] प्रवेश करा, ' असें बोलला. [ म्हणजे विराड्देहाच्या ज्या छिद्रांत जें इंद्रिय उत्पन्न झालें व त्यांत जी देवता उत्पन्न झाली, त्याच्याच अनुरोधानें, त्यांच्या स्थानादिकांचें उल्लंघन न करतां प्रवेश करा, अशी आज्ञा ईश्वरानें केली. ]

ता एता अग्न्यादयो देवता लोकपालत्वेन संकल्प्य सृष्टा ईश्वरेणास्मिन्संसारार्णवे संसारसमुद्रे महत्यविद्याकामकर्मप्रभवदुःखोदके तीव्ररोगजरामृत्युमहाग्राहेऽनादावनन्तेऽपारे निरालम्बे विषयेन्द्रियजनितसुखलवक्षणविश्रामे पञ्चेन्द्रियार्थतृष्णामारुतविक्षोभोत्थितानर्थशतमहोर्मौ महारौरवाद्यनेकनिरयगतहाहेत्यादिकूजिताक्रोशनोद्भूतमहारवे सत्यार्जवदानदयाहिंसाशमदमधृत्याद्यात्मगुणपाथेयपूर्णज्ञानोडुपे सत्संगसर्वत्यागमार्गे मोक्षतीरे एतस्मिन्महार्णवे प्रापतन्पतितवत्यः ॥

भाष्यार्थ—( येणेंप्रमाणें वर—प्रथम खंडांत समष्टि इंद्रियांची व यांच्या अभिमानी देवतांची उत्पत्ति सांगून आतां या दुसऱ्या खंडांत त्या देवतांच्या भोगाला योग्य अशा अल्प व्यष्टि देहांची उत्पत्ति व भोगाकरितां त्यांत देवतांचा व्यष्टिरूपानें प्रवेश, हें सांगण्याची इच्छा करणारा वेद प्रथम त्याच्या उपोद्घातरूपानें क्षुधा व तृषा यांची सृष्टि सांगतो. भाष्यकार 'ता एता देवता सृष्टा अस्मिन्महत्यर्णवे प्रापतन्.।'या पहिल्या वाक्याचें व्याख्यान आरंभितात-)

ईश्वरानें लोकपालत्वानें—लोकपालभावानें संकल्प करून उत्पन्न केलेल्या त्या ह्या अग्नि, वायु इत्यादि देवता या मोठ्या संसारार्णवांत—संसारसागरांत पडल्या. (असा अन्वय. देवतांनीं स्वरूपाज्ञानपूर्वक ब्रह्मांडरूप संसारांत आसक्त होणें, संसार हेंच सर्वस्व आहे, शरीरादि पदार्थच मी आहें इत्यादि अभिमान धरल्यामुळें बद्ध होणें, हेंच संसारार्णवांत पतन आहे. तें अशनायादिकांच्या उत्पत्तीच्या उपयोगी आहे. वास्तव या मोठ्या सागरांत त्या देवता पडल्या, इत्यादि म्हटलें आहे. भाष्यांतील सर्व सप्तम्यन्त पदें सागराचीं विशेषणें आहेत. संसाराचें समुद्राशीं सादृश्य दाखविण्यासाठीं तीं योजलेलीं आहेत.) 'अविद्याकामकर्मप्रभवदुःखोदके-' अविद्या म्हणजे आत्म्याचें विपरीत मान, तिच्यामुळें होणारी विषयेच्छा व विषयेच्छेमुळें होणारें कर्म, यांच्या योगानें उत्पन्न होणारें दुःख, हेंच त्या संसारसागरांतील उदक आहे. (जलांत मोठ्या दुःखानेंच, संकटानेंच प्रवेश करावा लागतो. दुःखांतही कोणी स्वेच्छेनें पडत नाहीं. या साम्यामुळें दुःखाला उदक म्हटलें आहे.) 'तीव्ररोगजरामृत्युमहाग्राहे-' ज्या सागरांत तीव्र रोग, जरा, मृत्यु, हेच मोठमोठे ग्राह [ मकर, सुसरी ] आहेत. 'अनादौ-' जो नित्य, 'अनन्ते-' तत्त्वज्ञानावांचून विनाश पावत नसल्यामुळें अनन्त—अंतरहित, अज्ञांना पुढचा अवधिच नसतो, म्हणून 'अपार' व विश्रांतीचें चांगलें स्थान नसल्यामुळें, जो 'निरालम्ब' आहे; (पण त्यांत विश्रांतीचें चांगलें स्थान जरी नसलें तरी त्याचा आभास आहे, असें भाष्यकार म्हणतात—) विषय व इंद्रियें यांच्या संयोगापासून उत्पन्न झालेला सुखाचा लेश [अंश] हेंच ज्यांत क्षणिक विश्रांतीचें स्थान आहे, पांच इंद्रियांचे अर्थ म्हणजे शब्दादि विषय, त्यांविषयींची तृष्णा हाच वायु, त्याच्या योगानें होणारा जो विक्षेप, त्या विक्षेपापासून उद्भवलेले शेकडों अनर्थ—विषयसंपादनादिकांच्या योगानें होणारे क्लेश, हाच ज्यांत महा ऊर्मी आहेत; ज्यांत महारौरवादि अनेक नरक असून त्यांतील जीवांचें 'हाय हाय' इत्यादि कूजित व आक्रोश यांच्या योगानें ज्यांत मोठे ध्वनि होत आहेत; (गर्भवास, गर्भाशयांतून बाहेर येणें, बाल्य, तारुण्य, जरा, मरण इत्यादि अवस्था दुःखद आहेत, त्यामुळें तेच अनेक निरय असून त्यांतील प्राण्यांचे 'हाय हाय' असे सूक्ष्म व मोठे ध्वनी, यांच्या योगानें ज्या संसारार्णवांत मोठा शब्द होत असतो अशा महासागरांत देवता पडल्या. 'अहो पण संसारसागर जर अशा प्रकारचा आहे तर त्याचें उल्लंघन कोणाकडूनही केव्हांही करतां येणें शक्य नाहीं. वास्तव मोक्षशास्त्र व्यर्थ होतें,' अशी

आशंका घेऊन ' अविवेक्यांविषयीं जरी हें खरें असलें तरी विवेकी पुरुषांनीं यांतून तरून जाण्यास उपाय आहे, ' असें ' सत्यार्जवदान०' इत्यादि विशेषणानें सांगितलें आहे ) सत्य, सरळपणा, दान, दया, अहिंसा, शम, दम, संतोष इत्यादि आत्मगुण, याच पाथेयानें भरलेली ज्ञानरूपी नौका ज्यांत आहे, सत्संग व सर्वत्याग हेंच ज्ञाननौकेचे दोन मार्ग ज्यांत आहेत, व मोक्ष हेंच ज्याचें तीर आहे, अशा या महासागरांत त्या देवता पडल्या. ( पाथेय ह्मणजे प्रवासांत असतांना मार्गांत खाण्याकरितां घेतलेले पदार्थ. सत्संग ह्मणजे गुरुप्राप्ति, व सर्वत्याग ह्मणजे संन्यास. मोक्ष झाल्या असतां पुनः संसारसागराचा स्पर्श होत नाहीं, ह्मणून तोच ज्यांत तीरासारखा आहे, अशा या प्रत्यक्षसिद्ध महासागरांत त्या देवता पडल्या. ह्मणजे आत्मस्वरूपास विसरून संसारांत 'हा मी' अशा अभिमानानें आसक्त झाल्या. )

तस्मात् अग्न्यादिदेवताप्ययलक्षणापि या गतिर्व्याख्याता ज्ञानकर्मसमुच्चयानुष्ठानफलभूता सापि नालं संसारदुःखोपशमाय इत्ययं विवक्षितोऽर्थोऽत्र । यत एवं तस्मादेवं विदित्वा परं ब्रह्म आत्मात्मनः सर्वभूतानां च यो वक्ष्यमाणविशेषणः प्रकृतश्च जगदुत्पत्तिस्थितिसंहारहेतुत्वेन, स सर्वसंसारदुःखोपशमनाय वेदितव्यः ॥ तस्मात् " एष पन्था एतत्कर्मैतद्ब्रह्मैतत्सत्यं " यदेतत्परब्रह्मात्मज्ञानं " नान्यः पन्था विद्यतेऽयनाय " इति मंत्रवर्णात् ॥

भाष्यार्थ—( अहो पण संसारसागरांत पडणें, पुढें सांगितलेल्या अशनाया, पिपासा यांनीं युक्त होणें, इत्यादि सर्व बंध त्यावर अभिमान ठेवणाऱ्या ह्मणजे मी संसारी, अशनाया-पिपासावान् आहें, इत्यादि अभिमान बाळगणाऱ्या जीवाचा आहे, असें ह्मणणेंच योग्य आहे. तो बंध देवतांचा आहे असें म्हणणें योग्य नव्हे. पण 'देवतांचाही त्यावर अभिमान असतो, म्हणून तसें–त्या मोठ्या सागरांत पडल्या–असें म्हटलें आहे,' म्हणून म्हणाल तर तेंही बरोबर नाहीं. कारण मुख्यत्वेंकरून अभिमान ठेवणाऱ्या जीवाला सोडून सामान्यतः त्यावर अभिमान ठेवणाऱ्या देवताविषयीं तसें म्हणणें, यांत कोणता मोठा अभिप्राय आहे तें सांगितलें पाहिजे, असें कोणी म्हणेल ह्मणून श्रीशंकराचार्य ह्मणतात—) ज्याअर्थीं संसारसागरांत पडणें हा त्यांचा धर्म आहे, त्याअर्थीं अग्नि, वायु इत्यादि देवतांच्या स्वरूपांत लय पावणें, हें जिचें लक्षण आहे अशीही जी उपासना व कर्म त्यांचे समुच्चयानें अनुष्ठान केल्यामुळें फलरूपानें प्राप्त होणारी गति पूर्वीं सांगितली आहे तीही संसारदुःखाच्या उपशमास–त्याचें

शमन-शांति-नाश करण्यास समर्थ नाहीं, हा येथें विवक्षित-सांगावयास इच्छिलेला-अर्थ आहे. ( पण अशाप्रकारची विवक्षा असण्याचें तरी प्रयोजन काय? तें सांगतात- ) ज्याअर्थीं असें आहे त्याअर्थीं असें जाणून [ देवतांमध्यें लय पावणें, ही गति संसारदुःखाची शांति करण्यास समर्थ नाहीं, असें जाणून ] आपला व इतर सर्वभूतांचा आत्मा की जो 'आत्मा वा इदमग्र आसीत्' येथून जगाची उत्पत्ति, स्थिति व लय यांचा हेतु या रूपानें प्रकृत आहे, आहे व ज्याला आणखी दुसरीं विशेषणें पुढें दिलीं आहेत तो आत्मा पर ब्रह्म सर्व व्यापी आहे, असें सर्व संसारदुःखाच्या उपशमासाठीं जाणण्यास योग्य आहे.

( अहो पण "एष पन्था एतत्कर्मैतद्ब्रह्मैतत्सत्यं" म्हणजे हाच मार्ग आहे, हेंच कर्म आहे, हेंच ब्रह्म आहे व हेंच सत्य आहे, इत्यादि वर्णन करावयास आरंभ करून 'उक्थमुक्थं०' इत्यादि वाक्यानें कर्मसंबंधि सगुण ब्रह्मात्मज्ञानाचेंच विधान केलेलें असल्यामुळें त्यालाच मोक्षसाधनत्व आहे. 'आत्मा वा इदं०' या वाक्यानें येथें सांगितलेल्या केवळ निरुपाधिक आत्माच्या नुस्त्या ज्ञानाला साक्षात्काराला मोक्षसाधनत्व नाहीं. [ म्हणजे निर्विशेष आत्म्याचें नुसतें ज्ञान हेंच कांहीं मोक्षाचें साधन नव्हे तर कर्मसंबंधी सगुण ब्रह्माचें ज्ञान हें मोक्षाचें साधन आहे, अशी शंका घेऊन भाष्यकार-'एष पन्थाः०' इत्यादि वाक्यानें ब्रह्मात्मसाक्षात्कारच सांगितलेला आहे, कर्मसमुचित ज्ञान कांहीं सांगितलेलें नाहीं; कारण त्या कर्मसमुचित ज्ञानाला संसारहेतुत्व आहे, असा वर सांगितलेल्या फलविषयक व क्यावरून निश्चय होतो आणि त्यामुळेंच त्याला सत्यत्व नाहीं, असें सांगतात-) ज्या अर्थीं कर्मसहित प्राणोपासनेला संसारफलत्व आहे, त्या अर्थीं जें हें 'परब्रह्मच आत्मा आहे,' अशा प्रकारचें ज्ञान तोच हा मार्ग, तेंच कर्म, तेंच ब्रह्म, व तेंच सत्य आहे. ( प्राणोपासनेचें संसार हेंच फल मिळणारें असल्यामुळें 'एष पन्थाः०' इत्यादि वाक्यानें हें जें परब्रह्मात्मविज्ञान तेंच सांगितलें आहे. 'तमेव विदित्वातिमृत्युमेति नान्यः पन्था विद्यतेऽयनाय।' म्हणजे त्यालाच जाणून पुरुष अतिमृत्यूस प्राप्त होतो; म्हणजे मृत्यूचें उल्लंघन करून जातो. त्या गतीस प्राप्त होण्याकरितां अन्य मार्ग नाहीं. या वाक्यानेंही केवळ आत्मविज्ञानावांचून इतर मार्गाचा निषेध केलेला आहे; त्यामुळेंही वर सांगितलेलें ज्ञानच ब्रह्म होण्याचा मार्ग आहे, असें सांगतात-) ब्रह्मरूप होण्यास अन्य मार्ग नाहीं, असा मंत्रवर्ण आहे. ( अशी मंत्राक्षरें आहेत. येथें 'एष पन्थाः०' असा ब्रह्मज्ञानाचा उप-

क्रम करून मध्यें प्राणाची उपासना सांगितली आहे. यास्तव प्राणाच्या उपासनेनें चित्ताचें ऐकाग्र्य झालें असतां व त्याच्या फळाविषयीं वैराग्य आलें असतां 'एष पन्थाः०' इत्यादि वाक्यानें आरंभिलेलें मुख्य ज्ञान सांगतां येणें शक्य आहे. श्रुतीनेंही याच अभिप्रायानें मध्यें प्राणोपासना सांगितली आहे. या वाक्याच्या व्याख्यानाचे वेळीं कर्ममार्गही जरी 'पन्थाः' या शब्दाचा अर्थ म्हणून सांगितलेला आहे, तरी तो ज्ञानमार्गाचा उपाय म्हणून सांगितला आहे, प्रधानतः–मुख्यतः तो सांगितलेला नाहीं. तो ब्रह्मात्मभावाचा मुख्य उपाय आहे, अशा दृष्टीनें त्याचा उपदेश केलेला नाहीं. असा याचा भावार्थ.)

तं स्थानकरणदेवतोत्पत्तिबीजभूतं पुरुषं प्रथमोत्पादितं पिंडमात्मानमशनायापिपासाभ्यामन्ववार्जदनुगमितवान्संयोजितवानित्यर्थः । तस्य कारणभूतस्याशनायादिदोषवत्त्वात्तत्कार्यभूतानामपि देवतानामशनायादिमत्त्वम् ॥ तास्ततोऽशनायापिपासाभ्यां पीड्यमाना एनं पितामहं स्रष्टारमब्रुवन्नुक्तवत्यः । आयतनमधिष्ठानं नोऽस्मभ्यं प्रजानीहि विधत्स्व, यस्मिन्नायतने प्रतिष्ठिताः समर्थाः सत्योऽन्नमदाम भक्षयाम इति ॥

भाष्यार्थ— ('तमशनापिपासाभ्यामन्ववार्जत्ता०' या श्रुतिवाक्याचें व्याख्यान-) स्थान (अधिष्ठान, गोलक), करण, व देवता यांच्या उत्पत्तीचें बीज असलेल्या त्या पुरुषाकार प्रथम उत्पन्न केलेल्या पिंडास म्हणजे आपल्यालाच अशनाया व पिपासा यांनीं 'अन्ववार्जत्' अनुगत करता झाला, संयुक्त करता झाला, असा याचा अर्थ. (अहो पण अशनायादिकांचा योग जर पिंडाशीं आहे तर देवतांना तद्वत्त्व म्हणजे अशनायादिकांनीं युक्तत्व कसें? कीं ज्यामुळें त्यांनीं अन्नभक्षणार्थ आयतनाविषयीं केलेला प्रश्न उपपन्न होईल? अशी शंका कोणी घेईल म्हणून सांगतात– ) त्या कारणभूत पिंडाला अशनायादि दोषवत्त्व असल्यामुळें त्याच्या कार्यभूत देवतांनाही अशनायादिमत्त्व आहे (कारण पिंड अशनायादिमान् असल्यामुळें कार्यभूत देवताही तशाच होतात. )

त्यानंतर क्षुधा व तृषा यांच्या योगानें पीडल्या जाणाऱ्या त्या देवता या उत्पादक पितामहाला–आपला म्हणजे देवतांचा जो जनक पिंड त्याच्या जनकाला म्हणाल्या "आह्मासाठीं शरीरें निर्माण कर" (अहो पण विराड्देहामध्यें त्यांचें आयतन–स्थान आहे. मग त्याकरितां पुनः प्रार्थना करण्याचें कारण काय? अशी आशंका घेऊन 'तें अतिशय मोठें असल्यामुळें त्या सर्वाला व्यापून त्यांत राहण्यास आम्ही असमर्थ आहों, त्याचप्रमाणें त्या देहाला पुरेल

इतकें अन्न निर्माण करण्यासही आम्हीं असमर्थ आहों. यास्तव आम्हांला योग्य अशा व्यष्टिदेहास निर्माण कर,' असें त्या म्हणाल्या, असें सांगतात-) ज्या आयतनांत प्रतिष्ठित-समर्थ होत्सात्या आम्ही अन्न भक्षण करूं. ( यद्यपि आमच्या व्यष्टिशरीरावांचूनही देवता चरु-पुरोडाशादि हवींचें भक्षण करितात तरी तेंही हविर्भक्षण व्यष्टि देवतादेहावांचून होत नाहीं, असा याचा अभिप्राय आहे. )

एवमुक्त ईश्वरस्ताभ्यो देवताभ्यो गां गवाकृतिविशिष्टं पिण्डं ताभ्य एवाद्भ्यः पूर्ववत्पिण्डं समुद्धृत्य मूर्छयित्वानयद्दर्शितवान् । ताः पुनर्गवाकृतिं दृष्ट्वाब्रुवन् । न वै नोऽस्मदर्थमधिष्ठानायान्नमत्तुमयं पिंडोऽलं न वै । अलं पर्याप्तोऽत्तुं न योग्य इत्यर्थः ॥ गवि प्रत्याख्याते ताभ्योऽश्वमानयत्ता अब्रुवन्न वै नोऽयमलमिति पूर्ववत् ॥

भाष्यार्थ--( 'ताभ्यो गामानयत्०' या श्रुतीचें व्याख्यान करितात-) त्या देवतांकडून असें बोलला गेलेला ईश्वर त्या देवतांस, पूर्वीप्रमाणें त्याच आप् तत्त्वापासून-जलप्रधान पंचभूतांपासून गायीच्या आकृतीनें विशिष्ट असलेल्या पिंडास-देहास चांगल्या रीतीनें उद्धृत करून ( परस्परांच्या अवयवांच्या संयोजनेनें, त्या देहाच्या सर्व अवयवांचा परस्पर निकट संयोग करून), 'आनयत्' आणून दाखविता झाला. पण त्या देवता गाईच्या आकृतीस पाहून म्हणाल्या " हा पिंड आमच्यासाठीं अधिष्ठान होण्यास-अन्नखाण्याचें स्थान होण्यास पुरेसा नाहीं." अलं म्हणजे पर्याप्त पुरेसा. ( गाईच्या शरीराला वरचे दांत नसल्यामुळें त्या शरीरानें दूर्वादि मूळांना उपटतां येणार नाहीं, हें वैगुण्य देवतांनीं त्यांत पाहिलें. मनुष्यशरीरात खालचे व वरचे असे दोन्ही बाजूचे दांत असून शिवाय हात हें एक मूळादिकांना उपटावयाचें अधिक साधन आहे. ) यास्तव गाईचा देह सर्व अन्न खाण्यास योग्य नाहीं, असा भावार्थ.

( तेव्हां ईश्वरानें त्यांना पूर्वीप्रमाणेंच कृति करून घोड्याचें शरीर आणून दाखविलें. त्याला दोन्ही बाजूंचे दांत असल्यामुळें त्यांत पूर्वोक्त दोष नव्हता, पण त्यालाही विवेकज्ञान नसल्यामुळें तें शरीरहि अयोग्य आहे, असें जाणून देवतांनीं त्याचाही निषेध केला, असें सांगतात--) गाईचा निषेध केला असतां त्यांना घोडा आणून दाखविला. पण देवतांनीं पूर्वीप्रमाणेंच हेंही स्थान योग्य नाहीं, असें म्हटलें.

